# हिन्दी संस्कृति आणि अहिंसा

लेखक

धर्मानन्द कोसम्बी

शके १८५७ मार्गशीर्ष शुक्ल दशमी,

ता० ५ दिसेम्बर १९३५.

आवृत्ति पहिली १००० प्रती ]

[ किंमत दीड रुपया.

# प्रस्तावना



सामान्य माणसाच्या अन्तःकरणाला भगवान् बुद्धानें निगा नसलेल्या शालवनाची उपमा दिली आहे. भगवान् म्हणतो, "भिक्षुहो, समजा कीं, एकाद्या गांवाजवळ किंवा नगराजवळ एक शालवन एरण्डांनी आच्छादित होऊन गेलेलें असेल. एकादा माणूस त्याची सुधारणा व अभिवृद्धि करूं इच्छील. तो त्या वनांतील वांकडीं विनाशक झाडें तोडून बाहेर काढील, व जंगल साफ करून शालवृक्षांच्या सरळ रोपांना वाढूं देईल. तेणेंकरून तें शालवन कांहीं काळानें वृद्धिंगत होईल. त्याचप्रमाणें, भिक्षुहो, तुम्ही अकुशल विचारांचा त्याग करा, व कुशल विचारांची वाढ करण्यास झटा. तेणेंकरून तुमची अभ्युन्नति होईल." [ मज्झिम नि० ककचूपमसुत्त ]

ह्या उपमेंतील एरण्डाच्छादित शालवनासारखी हिन्दी संस्कृतीची स्थिति झाली आहे. शेंकडों वर्षें तिची हेळसांड करण्यांत आल्यामुळें तिच्यांत कुसंस्कारांचें रान माजून राहिलें आहे; आणि तें तोडून टाकल्याशिवाय तिच्यांतील सुसंस्कारांचा विकास होणें शक्य नाहीं. तिच्या संशोधनकार्यांत भावी संशोधकांना जर प्रस्तुत पुस्तकाचा अल्प-स्वल्प उपयोग झाला, तर माझ्या परिश्रमाचें सार्थक होईल.

हें पुस्तक लिहिण्याचा विचार चार पांच वर्षें मनांत घोळत होता. परंतु अनेक अडचणींमुळें त्याला मूर्त स्वरूप देतां आलें नाहीं. तेव्हां कांहीं आप्तमित्रांचें आर्थिक साहाय्य घेऊन काशीवास पतकरला; आणि येथें काशी विद्यापीठाच्या संचालकांनी माझ्या रहाण्यासवरण्याची उत्तम व्यवस्था लावून दिल्यामुळें हें काम विनायासें तडीस गेलें. यास्तव

आर्थिक मदत करणाऱ्या आप्तमित्रांचे व काशी विद्यापीठाच्या संचालकांचे मी मनःपूर्वक आभार मानतों.

ज्ञानमण्डल छापखान्यांतील कार्यकर्त्यांनी व कामगारांनी छापण्याचें काम कसोशीनें केल्याबद्दल त्यांचाहि मी आभारी आहें. सावधानता ठेवली असतांनाहि यांत कांहीं चुका राहून गेल्या. त्यांजबद्दल वाचक क्षमा करतील अशी आशा बाळगतों.

काशी विद्यापीठ, बनारस,
मार्गशीर्ष शुक्ल १०,
ता० ५ दिसेम्बर १९३५.

# अनुक्रमणिका

## विभाग पहिला

### वैदिक संस्कृति



## विभाग दुसरा

### श्रमणसंस्कृति

# विभाग तिसरा

## पौराणिक संस्कृति

## विभाग चौथा

### पाश्चात्य संस्कृति



## विभाग पांचवा

### संस्कृति आणि अहिंसा

# विभाग पहिला

# वैदिक संस्कृति

## प्रास्ताविक

१. आर्य कधीं व कोठून आले यासंबंधीं अनेक मतें प्रचलित आहेत. ख्रिस्ती शकाच्या पूर्वी बाराशें वर्षांपासून तहत वीस पंचवीस हजार वर्षांपर्यंत आर्यांच्या आगमनाचे अनेक काळ अनेक लेखकांनी मानले आहेत. त्याच प्रमाणें सिंध-पासून तहत उत्तर ध्रुवापर्यंत आर्यांचीं अनेक मूळ वसतिस्थानें मानण्यांत येतात. हा विषय महत्त्वाचा आणि मनोवेधक असला तरी प्रस्तुत ग्रंथाशीं त्याचा विशेष संबंध येत नाहीं. तथापि केवळ सत्यान्वेषणाच्या बुद्धीनें येथें कांहीं मुद्यांसंबंधानें चर्चा करणें योग्य वाटतें. कां कीं, अहिंसेचा विकास होण्यास सत्यज्ञानाची फार आवश्यकता आहे.

२. वैदिक वाङ्मयाशीं माझा फारसा परिचय नव्हता. अशा परिस्थितींत चि० दामोदर यानें १९२७ सालीं जातक-अट्ठकथें-तील खालील गाथा माझ्या निदर्शनास आणून दिली.

अन्तरा छिन्नं अयुज्झपुरानं पञ्चविधा ठपिता अभिरक्खा ।
उरगकरोटि पयस्स च हारी मदनयुता चतुरो च महन्ता ॥

त्या वेळीं आम्ही दोघे अमेरिकेंत होतों; व तो जर्मन भाषेचें विशेष अध्ययन करण्यासाठीं जातक-अट्ठकथेचें भाषांतर वाचीत

होता. त्याला वाटलें कीं, ह्या गाथेंत कांहीं तरी ऐतिहासिक तथ्यांश असावा. टीकाकारानें लावलेला ह्या गाथेचा अर्थ [1]मला पटला नाहीं; व अद्यापिहि पटत नाहीं. तथापि ह्या गाथेंत ऐतिहासिक तथ्यांश आहे हें मला पटलें. पण त्या वेळीं विसुद्धिमग्गाच्या संस्करणाच्या कामीं गुंतलों असल्यामुळें वैदिक वाङ्मयांत प्रवेश करून ह्यासंबंधीं विशेष विचार करण्यास मुळींच सवड नव्हती.

३. तदनन्तर १९२८ सालीं गुजराथ विद्यापीठांत रहात असतांना मी ऋग्वेद वाचूं लागलों. त्यांत एक गोष्ट मला दिसून आली ती ही कीं, वरील गाथेंत वर्णिल्याप्रमाणें इन्द्र हा एके काळीं मनुष्य होता; आणि त्याच्या हयातींतच किंवा मरणोत्तर त्याला देवत्व मिळालें. यासंबंधीं माझा 'वैदिक इन्द्र, देव कीं मनुष्य' हा लेख त्या सालच्या सप्टेंबरच्या विविधज्ञानविस्तारांत प्रसिद्ध झाला. त्यावर बरीच चर्चा होईल असें वाटलें होतें. परन्तु अद्यापि ती माझ्या निदर्शनास आली नाहीं.

४. नागरीप्रचारणी पत्रिकेच्या संवत् १९८६ च्या वैशाखकार्तिकच्या अंकांत श्री जयशंकर प्रसाद यांचा 'प्राचीन आर्यावर्त और उसका प्रथम सम्राट्' हा लेख माझ्या पहाण्यांत आला. पण त्यांत प्रस्तुत चर्चेला उपयोगीं पडेल इतक्या महत्त्वाचा मजकूर मला सांपडला नाहीं. इन्द्र हा एके काळीं सम्राट् होता ही गोष्ट मला मान्य आहे. परन्तु त्याच्या साम्राज्याची मजल सिंध आणि पंजाब यांच्या पलीकडे जाऊं शकली नाहीं असें वाटतें.

५. ऋग्वेद वाचीत असतांना मला अशी शंका आली कीं, त्यांतील कांहीं गोष्टींचा बाबिलोनियन संस्कृतीशीं निकट संबंध

---

१ वि० ११५६-५७ पहा.

असावा. गेल्या ( १९३४ ) वर्षाच्या ऑगस्ट महिन्यांत जेव्हां मी हिंदु युनिव्हर्सिटींत राहण्यास आलों, तेव्हां यासंबंधीं डॉ० प्राणनाथ यांच्याशीं बोललों. सिंध आणि पंजाब प्रांतांत सांपडलेल्या प्राचीन नगरावशेषांतील मुद्रांवरील लिपि वाचण्याचा त्यांचा प्रयत्न आज बरींच वर्षें चालू आहे. त्या भाषेचा संबंध 'ॐ, ह्रां, ह्रीं' इत्यादिक तांत्रिक पारिभाषिक शब्दांशीं ते लावीत असत. ह्याच विषयावर त्यांचीं एक दोन व्याख्यानें पुण्यास झालीं, असें मी ऐकलें होतें. पण त्या मुद्रांवरील अक्षरांचा जर कशाशीं संबंध असेल तर तो ऋग्वेदाशीं असावयास पाहिजे असें माझें ह्मणणें होतें. कांहीं अंशीं तें त्यांना पटलें असावें; व तेव्हांपासून ऋग्वेदाचा आणि बाबिलोनियन वाङ्मयाचा संबंध जोडण्याचा त्यांनी प्रयत्न चालविला आहे. या विषयावर त्यांचे कांहीं लेख काशी येथील 'सनातन धर्म' साप्ताहिकांत प्रसिद्ध झाले. पुढें सनातन्यांनी विरोध केल्यामुळें ही लेखमाला त्यांना बंद ठेवावी लागली. त्यांचें म्हणणें असें दिसतें कीं, ऋग्वेदांतील पुष्कळशा ऋचा बाबिलोनियन ऋचांशीं जुळतात, इतकेंच नव्हे तर 'सृण्येव जर्भरी तुर्फरीतू' ऋ० १०।१०६।६ इत्यादिक ऋचांचा सायणादिकांना जो अर्थ मुळींच समजला नाहीं, तो बाबिलोनियन ऋचांवरून स्पष्ट होतो. बाबिलोनियन भाषांचें मला मुळींच ज्ञान नसल्यामुळें या विषयावर साधक बाधक मत देणें धार्ष्ट्याचें होईल. तथापि बाबिलोनियन आणि वैदिक संस्कृतीचा अत्यन्त निकट संबंध आहे याविषयीं मात्र माझी खात्री होत चालली आहे.

६. परलोकवासी लो० टिळक यांनी 'Sir R.G. Bhandarkar Commemoration Volume' मध्यें १९१७ सालीं 'The Chaldean and Indian Vedas' या नांवाचा लेख

लिहिला आहे. काशी विद्यापीठाचे अध्यापक पं० रुद्रदेव शास्त्री यानीं हा लेख नुकताच माझ्या निदर्शनास आणून दिला. त्याचा विचार योग्य स्थळीं करण्यांत येईलच.[1]

## बाबिलोनियन संस्कृति

७. ख्रिस्तापूर्वी चार पांच हजार वर्षें आजकालच्या मेसोपोटेमियाच्या आग्नेय दिशेला वसाहत करणाऱ्या लोकांना सुमेरियन ही संज्ञा लावण्यां येते. हे सुमेरियन लोक कोठून आले याविषयीं बराच वाद आहे. ते मध्य एशियांतून आले असावे असें अधिकतर तज्ज्ञांचें मत आहे. कारण आर्य लोकांशीं त्यांचें बरेंच साम्य होतें असें सिद्ध झालें आहे. ह्या लोकांनी प्रथमतः आपल्या वसाहती युफ्रेतिस आणि तैग्रिस या नद्यांच्या [2]मुखाजवळ केल्या; व त्या हळू हळू उत्तरेकडे पसरत

---

१ वि० १।२०–२३ पहा.

२ आजकाल या दोन नद्या समुद्राला मिळण्यापूर्वीच एकत्र होतात. पण प्राचीन काळीं त्या निरनिराळ्या ठिकाणीं समुद्राला मिळत. आज समुद्रहि १२५ मैल हटला आहे.

When Sumeria was beginning to flourish, these two rivers had separate outlets, and Eridu, the seat of the cult of the sea god Ea, which now lies 125 miles inland, was seaport at the head of the Persian Gulf. A day's journey separated the river mouths when Alexander the Great broke the power of the Persian Empire.

Myths of Babylonia and Assyria. p. 22–23

गेल्या. हे लोक लहान लहान शहरांतून रहात असत; आणि त्या शहरा-शहरांमध्यें वारंवार लढाया होत.

८. अशा स्थितींत सेमेटिक जातीचे लोक येऊन त्यांनी उत्तरेकडील टापू काबीज केला. हे लोक आले कोठून याविषयींहि बराच वाद आहे. तरी त्यांचा प्राचीन आरब लोकांशीं निकट संबंध दिसतो. हे लोक कांहीं अंशीं जंगली होते. उत्तरेकडील सुमेरियन लोकांना त्यांनी जिंकलें खरें, परंतु सुमेरियन संस्कृति त्यांना जशाच्या तशीच घ्यावी लागली. भाषा मात्र त्यांनी आपली ठेवली. सुमेरियन भाषा देखील चालू होतीच. पुढें जेव्हां या लोकांनी दक्षिणेकडील सुमेरियन राजांना जिंकलें, तेव्हां बहुतेक ठिकाणीं याच लोकांच्या भाषेचा प्रसार झाला, व सुमेरियन भाषा आजकालच्या आमच्या संस्कृत भाषेसारखी मृत भाषा झाली. ती समजण्यासाठीं कोष व व्याकरणें रचावीं लागलीं.

९. या सेमेटिक लोकांनी प्रथमतः जो उत्तरेकडील टापू जिंकला, त्याला अक्काड ( Akkad ) किंवा अगादे ( Agade ) म्हणत, व दक्षिणेकडील सुमेरियनांच्या टापूला सुमेर ( Summer ) किंवा शुमेर ( Shumer ) म्हणत. ह्या दोन्ही प्रांतांना मिळून बाबिलोनिया म्हणण्याचा प्रघात आहे; आणि त्याच अर्थी हा शब्द ह्या विभागांत वापरला आहे.

१०. इ० स० पूर्वी अठराव्या शतकाच्या आरंभीं केशी ( Kassi ) लोकांच्या बाबिलोनियावर स्वाऱ्या होऊं लागल्या, व १७६० च्या सुमारास गंदश ( Gandash ) नांवाच्या केशी राजानें आपलें सार्वभौम राज्य स्थापन केलें. त्या पूर्वीं एक दोन शतकें केशी लोक उदरनिर्वाहासाठीं बाबिलोनियांत येत असत. ते पिकाच्या वेळीं शेताच्या कापणीला व धान्य गोळा

करण्याला मदत करीत, व पुन्हा आपल्या पहाडी मुलुखांत जात. पर्शिया आणि बाबिलोनिया यांच्या दरम्यान एलाम ( Elam ) नांवाच्या प्रदेशांत त्यांचें वसतिस्थान होतें. हे लोक बाबिलोनियनांपेक्षां मागसलेले असले तरी एका बाबतींत ते फार पुढें गेले होते. त्यांच्या आगमनापर्यंत बाबिलोनियन लोकांना घोडा कसा तो मुळींच माहीत नव्हता; आणि केशी लोक तर घोड्यावर बसण्यांत इतके पटाईत होते कीं, घोडदळाच्याच साहाय्यानें त्यांनी बाबिलोनियन देश जिंकला.

११. प्रथमतः केशी लोक बाबिलोनियन लोकांत मिसळत नसत. त्यांनी सारा-वसुलींत कांहीं सुधारणा केल्या; पण इतर बाबतींत बाबिलोनियन लोकांची सर्व संस्कृति हळू हळू आत्मसात् केली. अक्केडियन किंवा सेमेटिक लोकांनी सुमेरियनांना जिंकलें. परंतु सुमेरियन संस्कृतीनें सेमेटिकांना जिंकलें. त्याचप्रमाणें केशी लोकांनी जरी बाबिलोनियन लोकांना जिंकलें तरी बाबिलोनियन संस्कृतीनें त्यांना जिंकलें. म्हणजे देवदेवतांच्या व इतर सामाजिक बाबतींत सुमेरियन परंपरा तशीच कायम राहिली. केशी लोकांनी आपल्या भाषेचाहि प्रसार करण्याचा प्रयत्न केला नाहीं. त्यांचा सर्व व्यवहार अक्केडियन भाषेंतच चालत होता. आरंभीं आरंभीं त्यांचीं नांवें मात्र बाबिलोनियन नांवांहून भिन्न असत. आमच्या इकडील शक, मालव, हूण, गुर्जर, पर्शियन इत्यादिक भिन्न भिन्न जातींच्या लोकांनी हिंदुस्तानांत प्रवेश केल्यावर आपली मूळ संस्कृति सोडून हिंदु संस्कृति स्वीकारली, त्याप्रमाणें ह्या केशी लोकांनी बाबिलोनियांत गेल्यावर हळू हळू सर्व बाबिलोनियन संस्कृति पूर्णपणें अंगिकारली.

# आर्यांचें स्थळ व काळ

१२. या केशी लोकांशीं आर्यांचा निकट संबंध असला पाहिजे. कां कीं, आर्य देखील घोड्यावर बसण्यांत पटाईत होते. तेव्हां आर्यांचें स्थळ एलाममध्यें, व आर्यांचा उदयकाळ इ० स० पूर्वी दोन हजार पासून सतराशें वर्षांपर्यंतचा धरावा लागतो. केशींच्या व आर्यांच्या भाषेमध्यें बरेंच साम्य होतें अशी एक कल्पना प्रचलित आहे. परन्तु केशी बाबिलोनियन लोकांमध्यें पूर्णपणें मिसळून गेल्यामुळें त्यांच्या कांहीं राजांच्या नांवांशिवाय त्यांची भाषा कशा प्रकारची होती हें समजण्याचा मार्ग राहिला नाहीं.

१३. ऋग्वेदांत अनेक ठिकाणीं इंद्राच्या घोड्यांना केशी हें विशेषण लावण्यांत आलें आहे. त्याचा अर्थ सायणाचार्यांनी आयाळ असलेले असा केला आहे. पण घोड्यांना आयाळ असते हें सांगणाची जरूर कां असावी ? केशी लोकांनी शिकवून तयार केलेले किंवा केशींच्या देशांतून आणलेले असा याचा अर्थ असावा. हिंदुस्थानांत मध्ययुगांत सिंधच्या घोड्यांची ( सैन्धवांची ) जशी ख्याति होती, तशी वैदिक काळीं केशी घोड्यांची होती असें वाटतें. 'अवावचीत्सारथिरस्य केशी' ऋ० १०।१०२।६, यावरून केशी सारथिहि सारथ्यांत पटाईत होते असें दिसतें.

१४. शूष आणि शुष्म हे दोन शब्द ऋग्वेदामध्यें बलवाचक दिसतात. पण 'प्र मन्महे शवसानाय शूषमाङ्गूषं' ऋ० १।६२।१ इत्यादि ठिकाणीं शूष हें इंद्राचें विशेषण दिसतें. शुष्म शब्दाची व्युत्पत्ति बरोबर समजत नाहीं. शुषन् ( Shushan ) ही एका काळीं एलामची राजधानी होती. तेहां त्या शब्दाचा आणि या

दोन शब्दांचा कांहीं संबंध असावा असें वाटतें. इंद्र हा शूष ह्मणजे शुषन् येथील रहाणारा. शुष्म ह्मणजे शुषन्चें सामर्थ्य, अर्थात् बळ. तेव्हां आर्यांचें मूळ स्थान शुषाच्या आसपास असावें; व तेथेंच त्यांनी प्रथमतः इंद्राच्या नेतृत्वाखालीं आपलें वर्चस्व स्थापन केलें असावें.

१५. मितज्ञूचा उल्लेख ऋग्वेदांत चार ठिकाणीं आला आहे. या शब्दाचा अर्थ सायणाचार्य मितजानुक किंवा संकुचित-जानुक असा करतात. परन्तु एलामच्या वायव्येस असलेल्या मितन्नि (Mitanni) लोकांचा हा उल्लेख असावा असें दिसतें. हे लोक आर्यांचे दोस्त. त्यांच्या राजांचीं नांवेंहि आर्यन् होतीं. बोघझ्-कोई ( Boghaz-Koi ) येथें सांपडलेल्या एका मितन्नि राजाच्या लेखावरून असें दिसतें कीं, हे लोक आर्यांप्रमाणेंच मित्र, वरुण, इंद्र व नासत्य या देवतांची पूजा करीत असत.

१६. येथें असा प्रश्न उपस्थित होतो कीं, आर्य अतिप्राचीन काळीं उत्तर ध्रुवाकडे किंवा मध्य एशियांत रहात असून नंतर एलाममध्यें आले नसावे कशावरून? गोष्ट संभवनीय आहे. परंतु आर्यांच्या ऐतिहासिक काळांतील निवासस्थानाचा आम्हांस विचार कर्तव्य आहे; मूळ स्थानाचा नव्हे. त्यांच्या घोड्यावर बसण्यांत पटाईतपणामुळें व केशी आणि मितज्ञु या लोकांशीं त्यांचा जो संबंध दिसतो त्यामुळें ऐतिहासिक काळीं त्यांचें वसतिस्थान एलाममध्येंच धरणें सोइस्कर आहे.

१७. एलामच्या दक्षिणेला असलेल्या बाबिलोनियन लोकांशीं ह्या आर्य लोकांची बरीच दोस्ती दिसते. उर् ( Ur ) आणि उम्मा ( Umma ) या शहरांत रहाणाऱ्या लोकांचा ऋग्वेदांत बऱ्याच ठिकाणीं उल्लेख आहे 'चित्रसेना इषुबला अमृध्राः सतोवीरा उरवो व्रातसाहाः' ऋ० ६।७५।९, 'ये

अश्वमास उरवो वहिष्ठास्तेभिर्न इन्द्राभि वक्षि वाजम्' ऋ० ६।२१।१२, इत्यादि ऋचांतून ह्या उरु लोकांचीं वर्णनें, व 'विश्वेभिरूमेभिरा गहि' ऋ० ५।५१।१, 'प्रथमास ऊमाः' ऋ० १०।६।७, 'अनु यं विश्वे मदन्त्यूमाः' ऋ० १०।१२०।१, इत्यादि ठिकाणीं उम्मांमधील लोकांचीं वर्णनें सांपडतात; आणि त्यां-वरून आर्य लोकांचा ह्या शहरांतील लोकांविषयीं किती आदर होता याचें चांगलें अनुमान करतां येतें.

१८. पश्चिमेकडील मितन्नु किंवा मितान्नि आणि दक्षिणेक-डील उरु, ऊमा इत्यादिक शहरांतील बाबिलोनियन लोक यांच्यांशीं आर्यांचें सख्य असलें, तरी उत्तरेकडील त्यांच्याच-पैकीं पर्शियन लोकांशीं त्यांचें हाडवैर होतें, असें 'सं मा तप-न्त्यभितः सपत्नीरिव पर्शवः' ऋ० १।१०५।८ या ऋचेवरून दिसतें. आवेस्ता ग्रंथांत इन्द्राचा उल्लेख दोन ठिकाणीं आला आहे; व तेथें त्याला दैत्य किंवा राक्षस म्हटलें आहे. देव म्हणजे कुकृत्यांत प्रवृत्त करणारे राक्षस; अहुर मज्दाच्या प्रार्थनेनें व यज्ञादिक साधनांनी त्यांना घालवून देऊन सुख कसें मिळवावें याचीं वर्णनें आवेस्तांत अनेक ठिकाणीं सांपडतात. यावरूनहि वरील विधानाला बळकटी येते.

१९. एका काळीं एलाममधील आर्य आणि पर्शियांतील आर्य मित्र व वरुण या देवतांची प्रार्थना करीत होते. पैकीं मित्र ह्मणजे सूर्य. त्याची उपासना भिन्न भिन्न रूपांनी त्या काळच्या सर्व लोकांत पसरली होती. वरुण आर्यांना एक-वटणारा अतिप्राचीन कालचा एक पुढारी किंवा राजा असावा. एलाममध्यें इन्द्रानें आपलें राज्य स्थापित केल्यानें त्याचें महत्त्व वाढलें. पण त्यामुळें पर्शियन लोकांना तो अत्यन्त अप्रिय झाला असावा.

# आर्य आणि बाबिलोनियन लोकांचे देवादेव

२०. वर निर्दिष्ट केलेल्या लो० टिळकांच्या लेखांत 'असितस्य तैमातस्य बभ्रोरपोदकस्य च' अथर्व० ५।१३।६ या ऋचेंतील तैमात शब्दाचा सबंध त्यांनी तिअमात् ( Tiamat ) या शब्दाशीं लावलेला आहे. तिअमात् ही एक राक्षसी असून तिची पाताळ लोकीं सत्ता चालत असे, अशी बाबिलोनियन लोकांची समजूत होती. तीच ही राक्षसी अथर्व वेदांत तैमात शब्दानें उल्लेखलेली आहे, असें लोकमान्यांचें म्हणणें. पण तिअमात् शब्द स्त्रिलिंगी व तैमात पुल्लिंगी आहे; व तिअमात् राक्षसीचें संतान ( अपत्य ) तैमात असा अर्थ घेतला तर तो चांगला जुळतो. तिअमात् शब्दाचें रूपांतर दुर्मति शब्दांत झालें असावें. उदाहरणार्थ 'जहि यो नो अघायति…यामन्नप भूतु दुर्मतिर्विश्वाप भूतु दुर्मतिः' ऋ० १।१३१।७, 'अपामीवामप स्त्रिधमप सेधत दुर्मतिम्' ऋ० ८।१८।१०, इत्यादि ऋचा पहाव्या.

२१. तिअमात् राक्षसीचा नवरा अप्सु. त्याचा उल्लेख 'अप्सुजित्' ऋ० ८।१३।२, ऋ० ९।१०६।३, 'अप्सुक्षित्' ऋ० १।१३९।११, इत्यादि ठिकाणीं सांपडतो, हें लोकमान्यांनी आपल्या लेखांत दाखवून दिलेंच आहे. तरी पण कित्येक ठिकाणीं अप्सूचें रूपांतर 'अभ्व' शब्दांत झालें असावें. 'बाधते कृष्णमभ्वम्' ऋ० १।९२।५, 'द्यावा रक्षतं पृथिवी नो अभ्वात्' ऋ० १।१८५।२–८, 'गूहन्तीरभ्वमसितं रुशद्भिः' ऋ० ४।५१।९, इत्यादि ऋचांतून याचा उल्लेख सांपडतो.

२२. यह्व शब्दाचा संबंध लोकमान्य बायबलमधील जेहोवा ( Jehovah ) शब्दाशीं लावतात. पण मला वाटतें कीं, त्याचा संबंध सुमेरियन 'एअ' किंवा 'य' ( Ea ) शब्दाशीं असावा.

हा सुमेरियांतील प्राचीनतम देव. त्याचा संबंध ऋग्वेदांत अनेक ठिकाणीं अग्नीशीं आला आहे. 'त्वं देवानामसि यह्व होता' ऋ० १०।११०।३, या ऋचेंत 'तूं यह्व नांवाचा देव' असा अर्थ दिसतो; व इतर पुष्कळ ठिकाणीं यह्व आणि यह्वी हीं विशेषणें दिसतात. य देवाच्या बाजूचे किंवा य देवापासून उत्पन्न झालेले असा त्यांचा अर्थ करतां येण्यासारखा आहे. 'पावकया यश्चितयन्त्या कृपा क्षामन्रुरुच उषसो न भानुना' ऋ० ६।१५।५ या ऋचेंत तर खास य देवाचाच उल्लेख आहे अशी शंका येते.

२३. उर्वशी या शब्दाचा अर्थ लोकमान्य जलदेवता ( Watery Nymph ) असा करतात. परंतु उर्वशी हा शब्द उरु + अस् याला ई प्रत्यय लागून साधलेला आहे. सुमेरियन भाषेंत अस् याचा अर्थ मनुष्य असा होतो. तेव्हां या शब्दाचा अर्थ उरु मधील स्त्री असा असला पाहिजे. ही स्त्री पुरूरवस् ऐल याच्या बरोबर एलाममध्यें आली. पण पुरूरवस् याचें जंगली वर्तन तिला आवडलें नाहीं, व ती तेथून निघून गेली. ती जातेवेळीं तिचा व पुरूऱ्याचा झालेला संवाद ऋ० १०।९५ मध्यें आहे. त्यावरून उरूमधील स्त्रियांची व एलाममधील पुरुषांची विचारसरणी कशी असेल याचें थोडेसें अनुमान करतां येतें.

२४. येथपर्यंत लोकमान्यांच्या लेखांतील शब्दांचा विचार झाला. आतां दुसऱ्या बाबिलोनियन देवतांचीं जीं नांवें ऋग्वेदांत सांपडतात त्यांचें थोडक्यांत दिग्दर्शन करतों. बाबिलोनियन अंशन ( Anshan ) हा ऋग्वेदांतील अंश आहे. 'त्वमंशो विदथे देव भाजयुः' ऋ० २।१।४, येथें सायणाचार्य 'अंश' याचा 'एतन्नामको देवोऽसि' असा स्पष्ट अर्थ करतात. एतन (Etana) याचा संबंध एतश याच्याशीं असावा. 'स एतशो रजांसि

देवः सविता महित्वना' ऋ० ५।८१।३ इत्यादि ऋचांतून त्याचा उल्लेख पहावा.

२५. परंतु बाबिलोनियांतील मुख्य देवता म्हणजे इश्तर (Ishtar) व तम्मूज् (Tammuz) किंवा दमुत्सि (Damuzi) या होत. [1]त्यांचा संबंध उषः आणि दमूनः यांच्याशीं आहे. 'पुनः पुनर्जायमाना पुराणी' ऋ० १।९२।१० 'उषा याति स्वसरस्य पत्नी' ऋ० ३।६१।४, 'यां त्वा जज्ञुर्वृषभस्या रवेन' ऋ ७।७९।४. इत्यादि ठिकाणीं उषोदेवीचीं जीं वर्णनें आहेत त्यांचा इश्तरच्या दंतकथांशीं अत्यंत निकट संबंध दिसतो. इश्तर सहा महिने पाताळांत जाते व पुन्हा पृथ्वीवर येते ह्या कथेचा व उषोदेवीच्या कथेचा संबंध आहे असें गृहीत धरलें, तर आर्य उत्तर ध्रुवाकडून आले असें समजण्याचें मुळींच कारण रहात नाहीं.

२६. तम्मूज् किंवा दमूनः याचीं वर्णनें ऋग्वेदांत थोड्या ठिकाणीं आढळतात. 'अपश्चिदेष विभ्वो दमूनाः प्र सध्रीचीरसृजद्विश्वश्चन्द्राः' ऋ० ३।३१।१६, 'नित्यश्चाकन्यात्स्वपतिर्दमूना यस्मा उ देवः सविता जजान' ऋ० १०।३१।४, इत्यादि ऋचांतून तम्मूजचें वर्णन असावें.

२७. याशिवाय अनेक ठिकाणीं इन्द्राला मेष ही संज्ञा लावलेली दिसते. 'अभि त्यं मेषं पुरुहूतमृग्मियमिन्द्रं' ऋ० १।५१।१, इत्यादि ऋचांतून हा उल्लेख सांपडतो. येथें सायणाचार्य मेष पदाचा 'शत्रुभिः स्पर्धमानं' असा अर्थ करतात. पण तो कसा होऊं शकतो हें समजत नाहीं. सुमेरियांतील मेष ( Mes ) देवतेचा हा उल्लेख असला पाहिजे. त्याचप्रमाणें पाताळदेवता अल्लतु (Allatu) हिचें वैदिक रूपांतर अराति ह्या शब्दांत झालें असावें.

---

1 See Myths of Babylonia p: 93

२८. येथें केलेलीं सर्वच अनुमानें तंतोतंत बरोबर आहेत असा माझा आग्रह नाहीं. एकतर मजपाशीं सुमेरियन आणि अक्केडियन इतिहास-पुराणावर लिहिलेले दोनच ग्रन्थ आहेत,[1] व बाबिलोनियन इतिहास आणि पुराण यांचा बोध होण्यास ते पुरेसे नाहींत. याशिवाय मला सुमेरियन व अक्केडियन भाषांचें ज्ञान नाहीं. तेव्हां त्या भाषांतील ऐतिहासिक स्थळांचीं व देवतांचीं नांवें वेदांत कोणत्या रूपानें आलीं हें सांगतां येणें शक्य नाहीं. बाबिलोनियन इतिहास-पुराणाचा निकट संबंध वैदिक वाङ्मयाशीं आहे एवढेंच दाखवण्याचा माझा उद्देश आहे. तो सिद्धीस गेला आहे कीं काय हें तज्ज्ञांनी सांगावें.

## आर्यांची सप्तसिंधूवर स्वारी

२९. आजकालच्या सिंध आणि पंजाब प्रांताला वैदिक काळीं सप्तसिंधु म्हणत असत असें दिसतें. ऋ० १।३२।१२, ऋ० १।३५।८, ऋ० २।१२।१२, इत्यादि ठिकाणीं 'सप्तसिंधून्' असा प्रयोग आढळतो. ऋ० ८।२४।२७ येथें 'सप्तसिन्धुषु' असाहि प्रयोग सांपडतो. अर्थात् ऋग्वेदकाळीं पंजाब व सिंध देशाला सप्तसिंधु नांव होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. आवेस्ता ग्रंथांत ह्याच प्रदेशाला हप्तहिन्दु म्हटलें आहे. ऋग्वेदांत चवथ्या मंडलाच्या सतरा, अठरा व एकोणीसाव्या सूक्तांत अनुक्रमें १, ७ व ८ या ऋचांतून सिन्धून् असाच प्रयोग

---

१ हे दोन ग्रंथ, म्हटले म्हणजे History of Summer and Akkad, and History of Babylon, by L. W. King हा एक, आणि Myths of Babylonia and Assyria, by D. A. Mackenzie हा दुसरा.

आढळतो. यावरून सप्तसिंधु याच्या ऐवजीं सिंधु म्हणण्याचा प्रघात पडला असावा. त्याचें प्राचीन पर्शियन रूपान्तर हिंदु; व यावरूनच सध्या प्रचलित असलेले हिंदु आणि हिंदुस्थान शब्द बनले आहेत.

३०. एलाममधील आर्यांची एक शाखा मितन्नि देशांत गेली व तेथें त्यांनी एक बलाढ्य साम्राज्य स्थापन केलें. याचा-दाखला वर निर्दिष्ट केलेल्या बोघझकोईच्या शिलालेखांत सांपडतो. दक्षिणेला तर केशींचें ( Kassite ) बलाढ्य राष्ट्र असल्यामुळें त्यांच्यांशीं ऐल ( Elamite ) आर्यांना मैत्रीनें वागणें भाग पडलें असावें. पर्शियन आर्यांशीं त्यांच्या बऱ्याच झटापटी झाल्या. पण त्यांत फारसें यश न आल्यामुळें त्यांचा मोर्चा पूर्वेकडे वळला असल्यास नवल नाहीं. ते सिंध प्रांतांत कोणत्या मार्गानें आले हें नक्की सांगतां येत नाहीं. तथापि शक, हूण इत्यादिकांच्या स्वाऱ्या जशा खैबर घाटांतून झाल्या तशा आर्यांच्याहि त्याच मार्गानें झाल्या असल्या पाहिजेत, या अनुमानाला कुठेंच आधार सांपडत नाहीं. वर निर्दिष्ट केलेल्या एकतिसाव्या जातकांत इन्द्राची जी कथा आहे तिजवरून आर्य पर्शियन आखाताच्या किनाऱ्या किनाऱ्यानें सिंध देशांत आले असावे असें अनुमान करतां येतें; आणि ऋग्वेदांत जीं समुद्राचीं वर्णनें सांपडतात त्यांवरून या अनुमानाला बळकटी येते.

३१. या सप्तसिंधूच्या प्रदेशावर वृत्राचें प्रभुत्व होतें. याला अहि असेंहि म्हणत. 'वृत्रं जघन्वाँ असृजद्वि सिंधून्' ऋ० ४।१९।८ या ठिकाणीं त्याला वृत्र म्हटलें आहे, तर 'यो हत्वाहिमरिणात् सप्तसिंधून्' ऋ० २।१२।३, येथें त्याला अहि म्हटलें आहे. तो ज्या लोकांचा पुढारी किंवा राजा होता त्या लोकांना दास किंवा दस्यु म्हणत असत. अर्थात् वृत्रालाहि अनेक ठिकाणीं

दास किंवा दस्यु हीं विशेषणें लावण्यांत आलीं आहेत. 'विश्वा अपो अजयद्दासपत्नीः' ऋ० ५।३०।५, 'दासपत्नीरहिगोपाः' ऋ० १।३२।११, इत्यादि वाक्यांवरून सप्तसिंधूवर दासांचें स्वामित्व होतें हें स्पष्ट होतें. दास म्हणजे क्रूर व जंगली लोक अशी आजकालची समजूत आहे. पण दास शब्दाचा तसा मूळचा अर्थ दिसत नाहीं. दास म्हणजे दाता (ज्याला इंग्रजींत 'नोबल' म्हणतात) असा अर्थ असला पाहिजे.

३२. महाभारतांत वृत्रगीता नांवाचें एक प्रकरण आहे. त्यांत भीष्म वृत्राची फार स्तुति करतो. आणि ती ऐकून धर्मराज उद्गारतो—

अहो धर्मिष्ठता तात वृत्रस्यामिततेजसः।
यस्य विज्ञानमतुलं विष्णौ भक्तिश्च तादृशी ॥[१]

(हे पितामह! अमिततेज वृत्राची धर्मिष्ठता काय सांगावी? त्याचें तें अतुल विज्ञान! आणि त्याची ती विष्णूवर भक्ति!)

३३. त्यानंतर युधिष्ठिर भीष्माला विचारतो कीं, अशा बुद्धिमान् आणि विष्णुभक्त वृत्राला इन्द्रानें मारलें कसें? तेव्हां भीष्म, 'महादेव ज्वर होऊन वृत्राच्या अंगांत शिरला व विष्णु इन्द्राच्या वज्रांत शिरला, आणि त्यामुळें वृत्राचा वध करतां आला', इत्यादि कथा सांगतो. पुढें जेव्हां वृत्राचा वध करण्यांत आला, तेव्हां वृत्राच्या शरीरांतून ब्रह्महत्या निघाली व तिनें इन्द्राला घेरलें, इत्यादि कथा आली आहे.

३४. या कथेला वैदिक वाङ्मयांत आधार सांपडला नसता तर तिची गणना शुद्ध दंतकथेंत करणें योग्य झालें असतें. पण ऐतरेय ब्राह्मणाच्या पसतिसाव्या अध्यायांतील दुसऱ्या खंडांत

१ कुंभकोण, शान्ति प० अ० २८७; औंध, अ० २८१, श्लोक १.

देवांनी इंद्रावर विश्वरूपाला मारल्याचा, वृत्राला मारल्याचा, यतींना कुत्र्यांना खाऊं घातल्याचा, अरुर्मघांना ठार मारल्याचा व बृहस्पतीवर प्रतिप्रहार केल्याचा असे पांच आरोप ठेवले अशी कथा आहे. तिजवरून वृत्र ब्राह्मण होता असें ठरतें. सुमेरियन लोकांत कधीं कधीं पुजारी लोकांनीच राजसत्ता बळकावल्याचीं उदाहरणें आढळतात, व राजाहि कधीं कधीं देवाचा पुजारी होत असे. म्हणजे ब्राह्मण आणि क्षत्रिय यांचीं कर्में अत्यन्त भिन्न आहेत अशी समजूत नव्हती. परशुरामाची कथाहि या विधानाला बळकटी आणते. तेव्हां वृत्र हा ब्राह्मण होता असें समजण्यास कोणतीच हरकत नाहीं.

३५. त्या काळच्या निरनिराळ्या लोकांत सूर्योपासना चालू असे. बाबिलोनियांत मर्दुक ( Marduk ) देवाच्या रूपानें, एेल आणि पर्शियन देशांत मित्राच्या रूपानें, व सिंध देशांत ती विष्णूच्या रूपानें प्रचारांत होती असें दिसतें. 'अथाब्रवीद्वृत्रमिन्द्रो हनिष्यन्त्सखे विष्णो वितरं वि क्रमस्व' ४।१८।११ येथें सायणाचार्यांनी 'विक्रमस्व' पदाचा अर्थ 'पराक्रम कर' असा केला आहे. परन्तु त्याचा 'दूर हो' असा अर्थ असणें संभवनीय आहे. आणि तसा तो केला असतां वरील महाभारताच्या कथेशीं या वाक्याचा संबंध जोडतां येईल. वृत्राला मारीत असतां इंद्र विष्णूला म्हणाला, 'सखे विष्णो, तूं पूर्णपणें दूर हो.' म्हणजे तूं तुझ्या भक्ताला वृत्राला मदत करूं नकोस, असा याचा अर्थ होईल, व त्यायोगें महाभारतांतील कथेला बळकटी येईल.

३६. महिन्जो-दारो आणि हरप्पा या दोन ठिकाणीं सांपडलेले नगरावशेष दास लोकांच्या वेळचे असें जर गृहीत धरलें, तर कांहीं बाबतींत दासांची संस्कृति उच्च दर्जाची होती असें

म्हणावें लागेल. दास हे सुमेरियनांपैकींच असणेंहि संभवनीय आहे. युफ्रेतिस आणि तैग्रिस नद्यांच्या मुखांजवळ सुमेरियन लोकांनी वसाहती केल्यानंतर कांहीं काळानें त्यांच्यांतीलच ह्या दास लोकांनी सप्तसिंधु देशांत वसाहती केल्या असाव्यात. पण सुमेर देशांत अक्केडियन सेमेटिक लोकांचें महत्त्व वाढल्यावर सुमेरियन वसाहतींचा व दासांच्या वसाहतींचा संबंध तुटला असावा. बाबिलोनियन लोकांना केशी लोक येण्यापूर्वी जसा घोडा माहीत नव्हता तसाच तो आर्य लोक येण्यापूर्वी दासांनाहि माहीत नव्हता असें दिसतें. कां कीं, महिन्जो-दारो आणि हरप्पा येथें मिळालेल्या मुद्रांवर इतर जनावरांचीं चित्रें सांपडतात, पण घोड्याचें चित्र मुळींच सांपडत नाहीं, तेव्हां दास लोकांच्या पराभवाला जीं अनेक कारणें झालीं, त्यांपैकीं त्यांजकडे घोडदळ नव्हतें हें मुख्य असावें.

३७. अक्केडियन सेमेटिकांनी सुमेरियावर जय मिळवल्यावर सुमेरियांतील जीं लहानसहान शहरें होतीं तीं एकवटलीं गेलीं; आणि सुमेर व अक्काड एका साम्राज्यछत्राखालीं आले. तेव्हांपासून तेथील बहुतेक सार्वभौम राजांची पूजा सुरू झाली. तोच प्रकार सप्तसिंधु प्रदेशांतहि झाला असावा. दास लोक लहानसहान शहरांतून रहात असत; व या शहरा-शहरांत लढाया होत असत. वृत्र हा जरी नांवाचा प्रमुख होता, तरी सर्व शहरांवर त्याची सत्ता होती असें दिसत नाहीं. तेव्हा आर्य लोकांना वृत्राचा पराभव करणें सोपें गेले.

३८. दास लोक रजपुतांप्रमाणें शूर होते असें दिसतें. पण एकोपा नसल्यामुळें व घोडदळ नसल्यामुळें आर्यांना तोंड देणें त्यांना शक्य नव्हतें. नमुचि दासानें तर आपल्या राज्यांतील स्त्रियांना देखील इन्द्राबरोबर लढावयास लावलें, याचा उल्लेख

ऋ० ५।३०।९, येथे सांपडतो. 'स्त्रियो हि दास आयुधानि चक्रे किमा करन्नबला अस्य सेनाः।' ( दासानें स्त्रियांना देखील लढायाला लावलें. पण असली दुर्बळ सेना काय करणार ? ) अर्थात् नमुचि या लढाईंत मारला गेला.

३९. शंबर दासाचीं तर इन्द्रानें नव्याण्णव शहरें तोडलीं. 'नवतिं च नवेन्द्रः पुरो व्यैरच्छम्बरस्य' ऋ० २।१९।६. दुसऱ्या एका ऋचेंत शंभर शहरें तोडलीं असा उल्लेख आहे. 'यः शतं शम्बरस्य पुरो विभेदाश्मनेव पूर्वीः' ऋ० २।१०।६. असें असतांहि शंबरानें चाळीस वर्षं पर्यन्त इन्द्राला दाद दिली नाहीं. 'यः शम्बरं पर्वतेषु क्षियन्तं चत्वारिंश्यां शरद्यन्वविन्दत्' ऋ० २।१२।११. म्हणजे शंबराचा मैदानांत पराभव झाल्यावर पर्वतांचा आश्रय धरून तो चाळीस वर्षेपर्यन्त इन्द्राच्या आर्यांवर छापे घालीत होता, व चाळीसाव्या वर्षी त्याला पकडून इन्द्रानें ठार केलें.

४०. साम्राज्याच्या अन्तिम काळचीं स्थिति म्हटली म्हणजे आपसांतील फुटाफूट होय. ही सर्व साम्राज्यांच्या इतिहासांत दिसून येते. दासांनी साम्राज्य स्थापन केलें होतें असें दिसत नाहीं. पण त्यांच्यांत आपसांतील दुही मात्र मुबलक होती. उदाहरणार्थ, त्वष्टा हा ब्राह्मण असून वृत्राला मारण्यासाठीं वज्र तयार करतो व तें इन्द्राला देतो. 'त्वष्टास्मै वज्रं स्वर्यं ततक्ष' ऋ० १।३२।२. हें वज्र कशा तऱ्हेचें होतें तें समजत नाहीं. झेंघिझ खानानें चीन देश काबीज केला व तेथील कारागिरांच्या मदतीनें त्यानें एक लांकडी यंत्र तयार केलें. तटबन्दीचीं शहरें तोडण्यासाठीं तो त्याचा उपयोग करीत असे. जेथें दगड नसत तेथें त्याच्या पदरचे लोक उंटावरून किंवा खटाऱ्यांतून बाहेरून दगड आणीत, व त्या यंत्रावरून ते दगड भराभर तटबंदीच्या

शहरांत फेंकीत. त्याचप्रमाणें शहरांतील घरें जाळण्यासाठीं त्या यंत्रावरून मोठमोठाले जळके कांकडे फेंकीत असत. त्वष्ट्यानें इन्द्रासाठीं तयार केलेलें वज्र अशाच प्रकारचें असावें. त्यायोगें इन्द्रानें दासांचीं शहरें उध्वस्त करून टाकलीं. याचा मोबदला त्वष्ट्याला असा मिळाला कीं, त्याच्या मुलाला—त्रिशीर्षाला—इन्द्रानें आपलें पौरोहित्य दिलें.

४१. पुढें त्रिशीर्षा आपल्या विरुद्ध बंड करील असें वाटल्यावरून त्याला इन्द्रानें ठार केलें. या त्रिशीर्षाला विश्वरूप असेंहि म्हणत असत. त्याचा उल्लेख तैत्तिरीय संहितेंत आला आहे तो असाः—"विश्वरूपो वै त्वाष्ट्रः पुरोहितो देवानामासीत् स्वस्रीयोऽसुराणां......तस्मादिंद्रोऽबिभेदीदृङ् वै राष्ट्रं वि परावर्तयतीति तस्य वज्रमादाय शीर्षाण्यच्छिनत्......तं भूतान्यभ्यक्रोशन्ब्रह्महन्निति ।" ( विश्वरूप नांवाचा त्वष्ट्याचा मुलगा व असुरांचा भाचा देवांचा पुरोहित होता......तो बंड करील अशी भीति पडल्यामुळें इन्द्रानें त्याचीं डोकीं तोडलीं[१]...तेव्हां लोक इन्द्राची ब्रह्महा म्हणून निंदा करूं लागले. ) [ तै० सं० काण्ड २।५।१ ]

४२. ही त्रिशीर्षाची कथा महाभारतांतील उद्योग पर्वांत आली आहे. त्रिशीर्षाला मारल्यावर तक्ष इन्द्राला म्हणतो, 'ऋषिपुत्रमिमं हत्वा ब्रह्महत्याभयं न ते ?' ( ह्या ऋषिपुत्राला मारल्यानें तुला ब्रह्महत्येचें भय वाटत नाहीं काय ? ) त्यावर इन्द्र उत्तर देतो, 'पश्चाद्धर्मं चरिष्यामि पावनार्थं सुदुश्चरम्.'[२] ( मी मागा-

१ विश्वरूप त्रिशीर्षाचीं डोकीं तोडल्याचा उल्लेख ऋ० १०।८।८–९ येथें सांपडतो. 'त्वाष्ट्रस्य चिद्विश्वरूपस्य गोनामा चक्राणस्त्रीणि शीर्षा परा वर्क्'.

२ औंध उद्योग प० अ० ९ श्लोक ३४–३५

हून सुदुश्चर धर्माचें आचरण करणार आहें. ) म्हणजे सध्या झालें आहे तें ठीक आहे; याचें प्रायश्चित्त काय करायचें तें मागाहून पाहून घेऊं ! येथें क्लाइव्ह आणि त्याचा मित्र उमीचंद यांची आठवण होते.

४३. शंभर दासाचीं तरी शहरें इन्द्रानें तोडलीं कोणासाठीं ? दिवोदासासाठीं. 'भिनत्पुरो नवतिमिन्द्र पूरवे दिवोदासाय महि दाशुषे' ऋ० १।१३०।७; 'शतमश्मन्मयीनां पुरामिन्द्रो व्यास्यत् । दिवोदासाय दाशुषे' ऋ० ४।३०।२०. दिवोदासानन्तर सुदाः हा त्याचा मुलगा राज्यावर आला. त्यालाहि इन्द्रानें मदत केल्याचा उल्लेख ऋ० ७।८३ मध्यें आहे. त्याचप्रमाणें त्रसदस्यु, पुरुकुत्स इत्यादिकांना मदत करून इन्द्रानें सार्वभौम राज्य संपादलें असावें. ऋ० ४।३०।१७–१८ ऋचांत ऋषि म्हणतो कीं, तुर्वश आणि यदु दास असून त्यांना इन्द्रानें बचावलें, व अर्ण आणि चित्ररथ आर्य असून त्यांचा वध केला. यावरून साम्राज्य स्थापन करण्यासाठीं इन्द्र ब्राह्मण आणि अब्राह्मण, यति आणि गृहस्थ, आर्य आणि दास यांच्यामध्यें कांहीं भेद मानीत नसे हें स्पष्ट होतें.

## सप्तसिंधूचा पहिला सम्राट्

४४. वरील विवेचनावरून असें दिसून येईल कीं, एलाममधील इन्द्रानें आर्यांचा पुढाकार घेऊन सप्तसिंधूमधील दास राजांचा पराजय केला, व आपलें साम्राज्य स्थापित केलें. इन्द्राच्या प्रार्थनेचीं सूक्तें ऋग्वेदांत भरपूर आहेत. परन्तु त्यांत इन्द्राच्या बालपणची किंवा राज्यप्राप्तीची अशी फारशी माहीती मिळत नाहीं. एका ऋचेंत इन्द्राला कौशिक[1] म्हटलें आहे.

---

१ आ तू न इंद्र कौशिक ऋ० १।१०।११

यावरून तो कौशिक कुळांत जन्मला असावा असे वाटतें. पण दुसऱ्या अनेक ऋचांतून त्याला श्येन म्हटलें आहे. वैदिक काळीं श्येन आणि कौशिक हा एकच पक्षी समजत होते कीं काय ?

४५. 'सद्यो ह जातो वृषभः कनीनः' ऋ० ३।४८।१, येथें कनीन शब्दाचा अर्थ सायणाचार्य कमनीय ( सुन्दर ) असा करतात. तरी कनीन शब्दाचा अर्थ कानीन ( कन्यावस्थेंत जन्मलेला ) असा असणें शक्य आहे. कारण 'अवद्यमिव मन्यमाना गुहाकरिंद्रं माता वीर्येणा न्यृष्टम्' ऋ० ४।१८।५ ( आपल्या अब्रूला हानिकारक अशा समजुतीनें आईनें त्या सामर्थ्य संपन्न इन्द्राला लपविलें ! ) ह्या ऋचेंत आईनें इन्द्राला जन्मल्याबरोबर लपवलें असें म्हटलें आहे. याच सूक्ताच्या दहाव्या ऋचेंत गाईनें वासराला जन्म दिला तद्वत् इन्द्राला आईनें दिला असें ऋषि म्हणतो. ह्यावरून ख्रिस्ताप्रमाणें इन्द्रहि गोठ्यांत जन्मला असावा. कन्यावस्थेंत हें मूल जन्मल्यामुळें गोठ्यांत जन्म देऊन त्याला लपवण्याचा आईवर प्रसंग येणें साहजिक होतें.

४६. कस्ते मातरं विधवामचक्रच्छयुं कस्त्वामजिघांसच्चरन्तं ।
कस्ते देवो अधि मार्डीक आसीद् यत्प्राक्षिणाः पितरं पादगृह्य ॥
ऋ० ४।१८।१२

( तुझ्या आईला विधवा कोणी केलें ? निजला असतां आणि फिरत असतां तुला मारण्याला कोण पाहात होता ? ज्या तूं पित्याला पायाला धरून ठार मारलेंस, त्या तुझ्याहून अधिक सुख देणारा अन्य कोण देव ? ) यावरून असें अनुमान करतां येणें शक्य आहे कीं, कौशिकगोत्री कोणा तरी लहानशा संस्थानिकाला एका कन्येपासून हा मुलगा झाला. पण जन्माच्या वेळीं त्या कन्येचा त्यानें अंगिकार केला नाहीं. शकुंतलेला

जसें दुष्यन्तानें घालवून दिलें, तसेंच या तरुणीलाहि त्या संस्थानिकानें घालवून दिलें असावें; पण पुढें तिचा अंगिकार केला असला पाहिजे. मात्र आपल्या आईचा केलेला अपमान इन्द्र विसरला नाहीं; व संधि मिळतांच बापाला पायाला धरून त्यानें ठार मारलें, आणि त्याचें राज्य बळकावलें. अशा रीतीनें सुरुवात करून इन्द्रानें एलाममधील आर्य लोकांचें स्वामित्व संपादिलें असलें पाहिजें.

४७. इन्द्रानें जे अनेक पराक्रम केले त्यांत सर्वांत मोठा म्हटला म्हणजे वृत्राला मारण्याचा होय. यावरून त्याला वृत्रहा हें नांव पडलें. त्याच्या खालोखाल दासांचीं नगरें मोडून सगळा देश मोकळा करणें हा पराक्रम असावा. यावरून त्याला पुरंदर ( शहरें तोडणारा ) ही संज्ञा मिळाली. इन्द्राच्या पराक्रमाचा परिणाम असा झाला कीं, दास लोक पराभूत होऊन नीच पदाला पावले ('विशो दासीरकृणोरप्रशस्ताः' ऋ० ४।२८।४ 'दासं वर्णमधरं गुहाकः' ऋ० २।१२।४ ), आणि दास हा शब्द गुलाम या अर्थी वापरण्यांत येऊं लागला. इन्द्राच्या विजयामुळें आर्यांचें वर्चस्व वाढलें व आर्यांची गणना बऱ्या लोकांत होऊं लागली; जो तो आपणास आर्य म्हणवण्यांत भूषण मानूं लागला.

४८. सप्तसिंधूच्या प्रदेशांत इन्द्राची सत्ता पूर्णपणें स्थापित झाल्यावर त्यानें आपला मोर्चा सप्तसिंधूच्या पूर्वेकडे वळवला असल्यास नवल नाहीं. त्यांत इन्द्राचा पराजय किती ठिकाणीं झाला हें समजणें शक्य नाहीं. कां कीं, ऋग्वेदांतील इन्द्रावरील सूक्तें म्हणजे इन्द्राच्या स्तुतीनें भरलेलीं; त्यांत इन्द्राच्या पराजयाची कथा येईल हें संभवनीय नाहीं. तथापि खालील तीन ऋचा विचारणीय आहेत.

अव द्रप्सो अंशुमतीमतिष्ठदियानः कृष्णो दशभिः सहस्रैः।
आवत्तमिन्द्रः शच्या धमन्तमप स्नेहितीर्नृमणा अधत्त ॥
द्रप्समपश्यं विषुणे चरन्तमुपह्वरे नद्यो अंशुमत्याः।
नभो न कृष्णमवतस्थिवांसमिष्यामि वो वृषणो युध्यताजौ ॥
अध द्रप्सो अंशुमत्या उपस्थेऽधारयत्तन्वं तित्विषाणः।
विशो अदेवीरभ्या चरन्तीर्बृहस्पतिना युजेन्द्रः ससाहे ॥
ऋ० ८।९६।१३-१५

४९. येथें सायणाचार्य तन्व याचा अर्थ शरीर असा करतात. पंधराव्या ऋचेंत अभि उपसर्गाचा ससाहे याच्याशीं संबंध लावून 'जघान' ह्मणजे ठार मारता झाला असा अर्थ करतात. पण असा अर्थ कां? तर 'प्रसंगादवगम्यते' (ह्या प्रसंगावरून जाणला जातो) असें म्हणतात. म्हणजे जेथें जेथें इन्द्राचा त्याच्या शत्रूंशीं प्रसंग येतो तेथें तेथें इन्द्रानें शत्रूला ठार मारलेंच असलें पाहिजे असें सायणाचार्य गृहीत धरतात! परन्तु तो अर्थ 'सह' धातूंतून कसा निघतो हें समजत नाहीं. सह धातूचा अर्थ सहन करणें किंवा जिंकणें असा असूं शकेल; परन्तु ठार मारणें असा असेल असें वाटत नाहीं.

५०. या ऋचांचें सरळ भाषांतर असें करता येईल—"तो जलद चालणारा कृष्ण दहा हजार सैन्यासह अंशुमती नदीजवळ आला (व त्यानें तेथें तळ दिला). जिकडे तिकडे महाशब्द करणाऱ्या त्या कृष्णाजवळ इन्द्र आला; आणि सल्ला करण्याच्या हेतूनें त्यानें कृष्णाशीं स्नेहाचें बोलणें चालविलें. तो आपल्या सैन्याला म्हणाला, 'अंशुमती नदीच्या खोऱ्यांत जंगलांत दडून बसलेल्या त्या द्रुतगामी व आकाशाप्रमाणें तेजस्वी कृष्णाला मी पहात आहें; आणि, शूरहो, तुम्ही आतां त्याच्याशीं लढाई करावी अशी माझी इच्छा आहे.' त्यानंतर

त्या कृष्णानें आपली सेना अंशुमतीच्या खोऱ्यांत एकत्र केली, व मोठा पराक्रम दाखवला. चारी बाजूला चालून येणाऱ्या ह्या देवेतर सेनांचा इन्द्रानें बृहस्पतीच्या मदतीनें पराजय केला. ( किंवा इन्द्रानें या सैन्याचे हल्ले सहन केले. )"

५१. यावरून असें दिसतें कीं, इन्द्र आपल्या देशांतून कृष्णावर हल्ला करण्यासाठीं अंशुमती नदीपर्यंत गेला असतां तेथें कृष्णानें आपल्या सैन्याची अशा बिकट जागीं रचना केली व इन्द्राला त्याच्यावर हल्ला करणें मुष्किलीचें झालें. आपला पराजय झाला नाहीं हाच आपला जय समजून इन्द्र मागें हटला; किंवा या संकटांतून बृहस्पतीनें त्याला वांचवलें, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

५२. दुसऱ्या एका ऋचेंत इन्द्रानें कृष्णाच्या गरोदर बायकांना मारल्याचा उल्लेख आहे ( 'यः कृष्णगर्भा निरहन्' ऋ० १।१०१।१ ). म्हणजे अंशुमती नदीवर कृष्णाला जिंकणें शक्य न झाल्यामुळें कृष्णाच्या देशांतील कांहीं गरोदर बायकांना ठार मारून व दुसरे अशाच प्रकारचे कांहीं अत्याचार करून इन्द्र मागें हटला असावा.

५३. भागवतांतील दशम स्कन्धांत चोवीस आणि पंचवीस अध्यायांत अशी कथा आली आहे कीं, 'नन्दादिक गोपालांनी इन्द्राला यज्ञानें तुष्ट करावें असा बेत केला. पण कृष्णाला ही गोष्ट पसन्त पडली नाहीं. त्यानें साधें जेवण करावयास लावलें, व गोप-गोपींना घेऊन तो गोवर्धन पर्वताकडे गेला. इन्द्राला हें कृत्य आवडलें नाहीं, व मुसळधार पाऊस पाडून त्यानें गोकुळाचा नाश करण्याचा प्रयत्न केला. तेव्हां कृष्णानें गोवर्धन पर्वत हातावर उचलून धरला, व त्याच्याखालीं गोकुळाला आश्रय देऊन इन्द्राचें कांहीं चालूं दिलें नाहीं.' या

भागवतांतील दन्तकथेचा व वरील ऋचांचा निकट संबंध असावा.

५४. इंद्राला देवत्व मिळाल्यानंतरची भागवताची गोष्ट आहे. तथापि तिच्यांत थोडासा ऐतिहासिक अंश असला पाहिजे. ही गोष्ट वरील ऋचांबरोबर वाचली म्हणजे निष्कर्ष निघतो तो असाः—"इन्द्रानें पराक्रमी कृष्णावर हल्ला चढवला. इन्द्राजवळ घोडदळ असल्यामुळें इन्द्राचें सैन्य बळकट होतें. कृष्णाचें बळ म्हटलें म्हणजे गाई व बैल, आणि अत्यन्त जलद चालणारें सैन्य. पण कृष्णानें अशी जागा शोधून काढली कीं, इन्द्राचें त्याच्यापुढें कांहीं चाललें नाहीं; त्याच्या घोडदळाचा काहीं उपयोग झाला नाहीं. त्याला आपलें सैन्य घेऊन मागें जावें लागलें." त्यानंतर पूर्वेकडे हल्ले करण्याची इन्द्रानें खटपट केली नसावी.

५५. इंद्राचे मदतनीस म्हटले म्हणजे मरुत् होत. ते कुठल्या प्रदेशांत रहात होते हें समजत नाहीं. पर्शिया आणि एलाम यांच्या दरम्यान जो मीडिया म्हणून देश होता त्यांतील किंवा आजकालच्या बलुचिस्तानांतील रहाणारे हे लोक असावेत. ऋग्वेदांत एक दोन ठिकाणीं मरुतांना शाक म्हटलें आहे. 'अस्य शाकैर्यदीं सोमासः सुषुता अमन्दन्' ऋ० ५।३०।१०, 'अस्य शाकैरिह नूनं वाजयन्तो हुवेम' ऋ० ६।१९।४, या दोन ठिकाणीं शाक शब्द मरुद्वाचक आहे असें सायणाचार्य म्हणतात. शाकांचा संबंध शकांशीं होता कीं काय? असें असलें तर मरुतांचा पुढारी जो रुद्र तोच शकांचा महादेव असणें संभवनीय आहे.

५६. एकतिसाव्या जातकांत जी कथा आली आहे, व जिचा उल्लेख या विभागाच्या आरंभीं करण्यांत आला आहे, ती अशी—

अन्तरा द्विन्नं अयुज्झपुरानं पञ्चविधा ठपिता अभिरक्खा ।
उरगकरोटि पयस्स च हारी मदनयुता चतुरो च महन्ता ॥

टीकाकारानें या गाथेचा अर्थ असा लावला आहे कीं, देवांचें आणि असुरांचे अशीं दोन अयोध्य नगरें, त्यांच्या दरम्यान इंद्रानें उरग ( नाग ), करोटि ( सुपर्ण ), पयस्स हारी ( कुंभण्ड = दानव राक्षस ), मदनयुत ( यक्ष ), व चार महन्त म्हणजे चार दिक्पाल रक्षणासाठीं ठेवले.

५७. येथें असा प्रश्न येतो कीं, दोन अयोध्य नगरें कोणतीं ? एक पर्शियाची राजधानी व दुसरी एलामची राजधानी अशीं हीं दोन अयोध्य ( जिंकण्यास कठीण ) नगरें होतीं कीं काय ? दरम्यान इंद्रानें पांच ठिकाणीं रक्षक ठेवले. टीकाकाराच्या अर्थाप्रमाणें उरग, करोटि वगैरे निरनिराळे लोक होते. पण पयस्स हारी करोटि नांवाचें नाग आणि मदन म्हणजे मीडियन ( Median किंवा Medes ) यांचे चार पुढारी मिळून पांच कीं काय ? आजला इंग्रज सरकार ज्याप्रमाणें हिंदुस्थानच्या बचावासाठीं सरहद्दीवरील निरनिराळ्या लोकांशीं सलोख्यानें वागतें, त्याप्रमाणें इंद्रानेंहि आपल्या साम्राज्याच्या बचावासाठीं ह्या लोकांशीं तह केला असावा.

५८. सप्तसिंधूवरील स्वारीचें काम संपल्यावर इंद्र एलाममध्यें जाऊन राहिला असला पाहिजे. त्यानें स्थापलेल्या संस्थानिकांत त्याची पूजा होणें स्वाभाविक होतें. आजकाल जशी पंचम जॉर्ज राजाची जयन्ती सर्वत्र साजरी करण्यांत येते, तशी ती सप्तसिंधु प्रदेशांत इंद्राची साजरी करण्यांत येत होती, यांत संशय बाळगण्याचें कारण नाहीं. रामलीलेंत ज्याप्रमाणें रावणाला व इतर राक्षसांना मारण्याचा तमाशा दर वर्षी दसऱ्याच्या दिवसांत संयुक्त प्रांतांत अनेक ठिकाणीं होत असतो, त्याप्रमाणें

इंद्रानें वृत्र आणि त्याचे अनुयायी यांना मारल्याचा तमाशा सप्तसिंधु प्रदेशांत संस्थानिकांतच नव्हे तर सामान्य लोकांतहि होत असावा. 'क इमं दशभिर्ममेन्द्रं क्रीणाति धेनुभिः। यदा वृत्राणि जङ्घनदथैनं मे पुनर्ददत् ॥' ऋ० ४।२४।१० ( दहा गाई देऊन हा माझा इंद्र कोण विकत घेईल? वृत्राच्या सैन्याला मारल्यावर या माझ्या इंद्राला त्यानें परत करावें. ) या ऋचेवरून असें दिसतें कीं, कारागीर लोक मोठमोठाले इंद्र करून इंद्रलीलेच्या वेळीं भाड्याला देत असत; व ती लीला संपल्यावर पुन्हा त्या इंद्राच्या मूर्ति दुसऱ्या वर्षासाठीं जपून ठेवीत असत.

५९. इंद्राच्या मागोमाग दुसऱ्या तशाच बलाढ्य राजाची स्वारी हिंदुस्थानावर झाली असती, तर या सर्व लीलेचा लोप होऊन तिच्या जागीं नवीन जेत्याची लीला सुरू झाली असती. परंतु इंद्रापासून चंद्रगुप्तापर्यंतच्या काळांत हिंदुस्थानांत दुसरें साम्राज्य स्थापलें गेलें नाही, व त्यामुळें इंद्राचें नांव अमर झालें. तरी कांहीं काळानें ब्रह्मणस्पति किंवा बृहस्पति याचा दर्जा वरचा होऊन इंद्राचा दर्जा त्याच्या खालीं आला.

६०. बाबिलोनियन इतिहासाचा ज्याला थोडाबहुत परिचय आहे, त्याला इंद्राची गणना देवांत झाल्याबद्दल मुळींच आश्चर्य वाटणार नाहीं. बाबिलोनियामधील पुष्कळशा सम्राटांची त्यांच्या हयातींतच देवांत गणना करण्यांत आली होती. त्यांना सोमपानासाठीं निमंत्रण देण्याचा मोठा विधि होत असे. अशा विधींचीं बरींच कोरींव चित्रें बाबिलोनियांत सांपडलीं आहेत. तेथील सम्राटांच्या पद्धतीस अनुसरून इंद्रानेंहि आपली गणना देवांत करून घेतली, व तिचा फैलाव आपल्या साम्राज्यांत केला असला पाहिजे.

६१. एलाममध्यें अनेक घडामोडी घडून आल्यामूळें इंद्र, त्याचे अनुयायी देव व मदतनीस मरुत् यांचें नांव देखील त्या प्रदेशांत राहिलें नाहीं. परंतु वैदिक वाङ्मयाच्या रूपानें हिंदुस्थानांत आजलाहि तें अस्तित्वांत आहे. यांत आश्चर्य मानण्याजोगें कांहीं नाहीं. बुद्धाचा धर्म हिंदुस्थानांत उदय पावला, व आरंभीं त्याचा विस्तारहि येथेंच झाला. असें असतां मुसलमानी कारकिर्दीत सामान्य लोकांत त्याचें नांव देखील राहिलें नाहीं. इंद्राला आणि देवांना जसे पर्शियन लोक राक्षस समजूं लागले, त्याप्रमाणें हिंदुस्थानचे लोक बौद्धांना नास्तिक म्हणूं लागले. पण त्या बौद्ध धर्माचा विजय दक्षिणेकडे सिलोन, उत्तरेकडे तिबेट व पूर्वेकडे ब्रह्मदेश, सयाम, चीन, जपान वगैरे देशांत झाला. त्याचप्रमाणें इंद्राचा आणि देवांचा त्यांच्या देशांत लोप होऊन हिंदुस्थानांत विजय झाला, असें म्हटलें पाहिजे.

६२. येथें असुरांसंबंधानें दोन शब्द लिहिणें अप्रस्तुत होणार नाहीं. सध्या सुर म्हणजे देव, व जे देव नव्हत, देवांचे शत्रु ते असुर अशी सामान्य लोकांची समजूत आहे. पण तिला वैदिक वाङ्मयांत मुळींच आधार नाहीं. सुर हा शब्द वैदिक वाङ्मयांत कोठेंहि सांपडत नाहीं; व असुर हें विशेषण इंद्र, वरुण, मित्र, अग्नि इत्यादि देवांना लावण्यांत आलें आहे. 'अनायुधासो असुरा अदेवाः' ऋ० ८।९६।९, या वाक्यांत तर सर्व देवांचा समावेश असुरांतच केलेला दिसतो. असुरांपैकींच देव, तेव्हां त्यांच्याशिवाय जे इतर असुर, असा याचा अर्थ होतो. ब्राह्मणें, आरण्यकें व उपनिषदें या ग्रंथांतून 'देवासुराः' असा प्रयोग अनेक ठिकाणीं सांपडतो. त्याचप्रमाणें प्राचीन बौद्ध वाङ्मयांत 'देवासुरसंगामो' इत्यादि प्रयोग सांपडतात. म्हणजे खिस्तापूर्वी सरासरीं दहाव्या शतकानंतर देवांपासून

असुरांना भिन्न करण्याचा रिवाज सुरू झाला असावा. त्याला कारणें काय झालीं असावीं हें सांगतां येणें शक्य नाहीं. तरी असीरियन लोकांच्या बाबिलोनियावर स्वाऱ्या होऊन त्यांचा दरारा सर्वत्र बसल्यावर, त्यांचा मुख्य देव असुर अल्यामुळें, असुरांसंबंधानें एलाममध्यें व एलामच्या पूर्वेला सप्तसिंधूंत तिटकारा होत गेला असल्यास नकळे. बाकी असुर शब्दाचा खरा अर्थ प्राणवान्, बलवान्, सामर्थ्यवान् असा आहे. असु म्हणजे प्राण; त्या पासून हा शब्द साधला आहे.

# वैदिक संस्कृतीचा उगम व विकास

६३. वरील विवेचनावरून दिसून येईल कीं, वैदिक संस्कृतीचा उगम बाबिलोनियन संस्कृतींत आहे. बाबिलोनियन भाषेचें नीट अध्ययन केल्याशिवाय पुष्कळशा वैदिक ऋचांचा अर्थ बरोबर समजणार नाहीं, अशी माझी ठाम समजूत आहे. इन्द्राचें देव्हारें, सोमपानाचा विधि इत्यादिकांचें मूळ बाबिलोनियन संस्कृतींतच आहे. त्या संस्कृतीच्या आधारें एलाममधील लोकांनी आपली संस्कृति बनवण्यचा प्रयत्न केला, व तेथेंच पुष्कळशा ऋचा रचल्या गेल्या असाव्या.

६४. वामदेव ऋषि एलाममधील रहाणारा दिसतो. ऋ० ४।१८ ह्या सूक्ताचा तो कर्ता समजला जातो. त्या सूक्ताच्या शेवटीं तो म्हणतो—

अवर्त्या शुन आंत्राणि पेचे न देवेषु विविदे मर्डितारं ।
अपश्यं जायाममहीयमानामधा मे श्येनो मध्वा जभार॥

( खाण्याला कांहीं न मिळाल्यामुळें मी कुत्र्याचीं आंतडीं शिजविलीं. देवामध्यें रक्षण करणारा मला कोणी सांपडेना.

माझ्या बायकोनें केलेली माझी विडंबना मी पाहिली. अशा स्थितींत श्येनानें ( इंद्रानें ) मला मध दिला. ) यावरून असें दिसतें कीं, हा ऋषि पूर्ववयांत अत्यंत दरिद्री होता. पुढें इंद्राचीं स्तोत्रें रचण्याचा धंदा त्यानें पतकरला; आणि इंद्रानें त्याला मोठी देणगी दिली. त्याच्या नांवांत देव शब्द आल्यामुळें तो मूळचा एलाममधीलच रहाणारा असावा.

६५. परंतु वसिष्ठ ऋषि किंवा वसिष्ठाचें कूळ दासांपैकीं असावें. कारण तो व त्याचे भाऊबंद दिवोदासाचे व सुदासाचे आश्रित दिसतात. 'एवेन्नु कं दाशराज्ञे सुदासं प्रावदिंद्रो ब्रह्मणा वो वसिष्ठाः' ऋ० ७।३३।३ ( त्याचप्रमाणें, हे वसिष्ठहो, दहा राजे युद्धास आले असतां तुमच्या स्तोत्रामुळें इंद्रानें सुदासाचें रक्षण केलें ). ह्याच सूक्तांत पांचव्या ऋचेंत स्तवन करणाऱ्या वसिष्ठाचें वचन इंद्रानें ऐकलें असें म्हटलें आहे. यावरून सुदासाच्या वतीनें वसिष्ठ किंवा वसिष्ठ कुलापैकीं कांहींजण इंद्रापाशीं रहात असत असें वाटतें.

६६. वर एका ठिकाणीं सांगितल्या प्रमाणें इंद्र जर चाळीस वर्षेंपर्यंत शंबराशीं लढत होता तर तो बराच दीर्घायुषी असला पाहिजे. त्याच्या मरणानंतर कांहीं काळपर्यंत इन्द्राची परंपरा चालली असणें संभवनीय आहे. उद्योगपर्वांत इन्द्र नष्ट झाल्यावर नहुषाला देवांनी अभिषेक केल्याची कथा आहे. त्यामुळें असें दिसून येतें कीं, एक इन्द्र मेल्यावर एलामांतील सरदार लोक त्यांच्यापैकीं जो कोणी श्रेष्ठ असेल त्याला इन्द्रपद देत असत. पण ही परंपरा दीर्घ काळपर्यंत चालली नसावी. तसें असतें तर इन्द्राचा उल्लेख बाबिलोनियन वाङ्मयांत बऱ्याच ठिकाणीं आला असता.

६७. इन्द्राच्या पदरचे स्तुतिपाठक असोत किंवा दासांपैकीं

स्तुतिपाठक असोत, त्यांचा मुख्य धंदा म्हटला म्हणजे स्तोत्रें रचून ती इन्द्रासमोर किंवा जेथें जेथें इन्द्राचा उत्सव होत असे तेथें तेथें गावयाचीं. याचमुळें वेदांत जवळ जवळ एक चतुर्थांश सूक्तें इन्द्राचीं सांपडतात. त्याच्या मागोमाग अग्नि, वरुण वगैरे देवतांचीं सूक्तें आहेत. यापैकीं उषोदेवीचीं सूक्तें बाबिलोनियांतून आलीं असावीं. मित्र, वरुण व नासत्य हे आर्यांचे देव. त्यांचीं सूक्तें एलाममध्येंच तयार झालीं असलीं पाहिजेत. आणि विष्णु दासांचा देव होता; तेव्हां आर्यांनी सप्तसिंधु प्रदेश जिंकल्यावर त्याचीं जीं तेथें स्तोत्रें गाण्यांत येत होतीं, त्यांचें रूपांतर ऋग्वेदांतील विष्णुसूक्तांत झालें असावें. अग्निपूजा आर्य लोकांत प्रचलित होती खरी, तथापि वेदांत जीं अग्निसूक्तें आहेत त्यांत बाबिलोनियांतील य, दमुतिस वगैरे देवतांचें मिश्रण झालें असावें.

६८. अशा तऱ्हेनें बाबिलोनियन, आर्य व दास या तीन लोकांच्या संस्कृतीच्या मिश्रणानें मूळ वैदिक संस्कृति बनली, व ती सप्तसिंधु प्रदेशांत दृढमूळ झाली. एलाममध्यें क्रान्ति होऊन इन्द्र आणि इतर देवता नामशेष झाल्या, तरी सप्तसिंधूवर त्यांचा कायमचा छाप बसला. इन्द्राचें साम्राज्य मोडल्यावर सप्तसिंधूंतील संस्थानिक स्वतंत्र झाले असावेत. तरी पण इंद्राचीं व इतर देवतांचीं स्तोत्रें गाण्याचा परिपाठ तसाच कायम राहिला. मुसलमान बादशहांनी तलवारीच्या जोरावर इस्लाम धर्म हिंदुस्थानांत फैलावला. आजकालचे बहुतेक मुसलमान एकाकाळीं हिंदु होते. परंतु मुसलमान बादशाही पूर्णपणें नष्ट झाली असली, तरी हिंदी मुसलमान कडवेपणांत खुद्द महंमद पैगंबराच्या वंशजांनाहि हार जावयाचे नाहींत ! तुर्कांनी खलीफाला हद्दपार केलें, तरी येथें खिलाफत कायमचीच

होऊन बसली आहे. तेव्हां इन्द्राची भक्ति सप्तसिंधु प्रदेशांत कायम होऊन राहिली यांत आश्चर्य मानण्याजोगें कांहीं नाहीं.

६९. येथें असा प्रश्न येतो कीं, वृत्र, त्वष्टा वगैरे मूळचे सप्तसिंधु प्रदेशाचे ब्राह्मण शास्ते, असें असतां त्यांच्याच वंशजांनी इन्द्राला उचलून धरलें कसें? याला उत्तर सोपें आहे. पेशवे ब्राह्मण राजे होते कीं नाहीं? पण पेशवाई नष्ट झाल्याबरोबर त्यांच्याच घराण्यांतील सांगलीकर इत्यादि संस्थानिकांनी इंग्रजांशीं तह करून इंग्रजांचें आधिपत्य स्वीकारलें कीं नाहीं? गरीब व मध्यम वर्गांतील ब्राह्मण भराभर इंग्रजी नोकरींत शिरले कीं नाहींत? या नोकऱ्यांचें प्रमाण अतिशय वाढत गेल्यामुळें ब्राह्मणेतरांना त्यांतील चतकोर आपल्या वांट्याला यावी म्हणून निराळा पक्ष स्थापन करावा लागला कीं नाहीं? तेव्हां इन्द्राचें वर्चस्व दास ब्राह्मणांनी पतकरलें यांत आश्चर्य कसलें?

७०. परन्तु इन्द्र येण्यापूर्वी आपण कोणत्या स्थितींत होतों ह्याची सप्तसिंधूतील ब्राह्मणांना विस्मृति झाली नसावी; याचा दाखला पुरुषसूक्ताच्या खालील प्रसिद्ध ऋचेंत सांपडतो.

'ब्राह्मणोऽस्य मुखमासीद्बाहू राजन्यः कृतः।
ऊरू तदस्य यद्वैश्यः पद्भ्यां शूद्रो अजायत॥'

ऋ० १०।९०।१२

(एके काळीं ब्राह्मण ह्या विराट पुरुषाचें मुख होता; बाहु राजन्य असे; वैश्य मांड्या; व त्याच्या पायांपासून शूद्र झाला.) ही घडी इन्द्राच्या आगमनानें बिघडली. ब्राह्मणांचें वर्चस्व नष्ट झालें व राज्यकर्त्यांचें वाढलें. परन्तु त्यामुळें ब्राह्मणांचें नुकसान झालें नसून एका अर्थी फायदा झाला. पुजारी आणि पुरोहितपणामुळें लोकांत त्यांचा मान राहिला, आणि राज्य-

शासनाची जबाबदारी व दगदग राहिली नाहीं. लढाई झाली तर क्षत्रियांनी रक्षण करावें; ब्राह्मणांनी त्यांत पडूं नये, असा जवळ जवळ नीतिधर्मच होऊन बसला. याचमुळें वाङ्मयाची अभिवृद्धि करण्यालाहि ब्राह्मणांना सवड सांपडली.

७१. इन्द्र हिंदुस्थानांत आला त्यावेळीं दोन प्रकारचे ब्राह्मण होते; एक राज्यकर्ते असून पौरोहित्यहि करणारे, व दुसरे यति म्हणजे अरण्यांत राहून मंत्रतंत्रादिकांचें पठण करणारे. इजिप्त, बाबिलोनिया वगैरे ठिकाणीं पुजारी वर्ग असेच. परंतु त्यांतून यतिवर्ग निघाला असावा असें वाटत नाहीं. तेव्हां यति हा सप्तसिंधूंतच निघालेला एक खास ब्राह्मणवर्ग समजला पाहिजे. इन्द्र आला तेव्हां या यति लोकांनींहि त्याला विरोध केला; व त्यामुळें इंद्रानें पुष्कळशा यतींना कुत्र्यांना खाऊं घातलें. ह्या अनुभवामुळें पुढें ह्या यतिवर्गानें राजकारणांत शिरण्याचें सोडून दिलें; व केवळ यज्ञयागांतच समाधान मानून घेतलें असावें.

७२. पूर्वीच्या ऋषींच्या आश्रमांचीं जीं वर्णनें जातकादि बौद्ध ग्रंथांतून सांपडतात त्यांवरून असें दिसून येतें कीं, हे यति लोक अरण्याजवळ, नदीच्या काठीं, किंवा अशाच अन्य रम्य ठिकाणीं आश्रम करून रहात असत. वाङ्मयाचा आणि इतर शास्त्रांचा त्यांजपाशीं अभ्यास करण्यासाठीं दूर दूरच्या प्रदेशांतून विद्यार्थी येत, व त्यांना ते तयार करून पाठवीत असत.

७३. येथें असा प्रश्न येतो कीं, ज्या यतींना इन्द्रानें कुत्र्यांस खाऊं घातलें, त्यांच्याच परंपरेंतील यतींनी अरण्यांत राहून त्याच इन्द्राचीं स्तोत्रें गावीं हें विलक्षण नव्हे काय? पण त्याला इलाज नव्हता. इन्द्राचें साम्राज्य स्थापन झाल्यावर इन्द्राची पूजा

सर्वत्र पसरली. ब्राह्मणांना देखील उपजीविकेसाठीं इन्द्राचीं स्तोत्रें रचावीं लागलीं, व आश्रयदात्या राजांच्या दरबारांत तीं गावीं लागलीं. तेव्हां अरण्याचा आश्रय करून रहाणाऱ्या यतींनाहि तोच मार्ग पतकरावा लागला. आजकाल जे जटाधारी बुवा आहेत, त्यांचा बुद्धसमकाळीं अग्निपूजा करण्याचा धर्म होता. म्हणजे हे यतींनाच अनुसरणारे लोक होते. परंतु कालान्तरानें शिव आणि विष्णु या देवतांचें महत्त्व हिंदुस्थानांतील राजांच्या दरबारांत वाढत गेल्यावर ब्राह्मणांनीच नव्हे तर ह्या जटिलांनीहि शिवाची आणि विष्णुची पूजा स्वीरली. तेव्हां यतींना सामान्य जनतेचा इंद्रादिकांना पुजण्याचा धर्म स्वीकारावा लागला असला, तर त्यांत आश्चर्य कोणतें ?

७४. हे यति किंवा अरण्यवासी ब्राह्मण वैदिक संस्कृतीचा फैलाव कसा करीत असत याचें एक उदाहरण बौद्ध वाङ्मयांतील सुत्तनिपातांत आलें आहे. बावरी नांवाचा एक ब्राह्मण कोसल देशांतून गोदावरीतीरावर जाऊन अरण्यांत एक आश्रम स्थापन करतो. हळू हळू त्या आश्रमाच्या आजूबाजूला लोकवस्ती वाढत जाते, व त्या लोकांच्या साहाय्यानें तो ब्राह्मण मोठा यज्ञ करतो. गोष्ट बुद्धसमकालीन आहे. तरी बुद्धापूर्वी कांहीं शतकें आरण्यक ब्राह्मण वैदिक संस्कृतीचा कसा प्रचार करीत असत, ह्याचा तो एक चांगला नमूना आहे.

७५. सप्तसिंधूंतील दास लोक बाबिलोनियन लोकांप्रमाणें मोठमोठालीं मन्दिरें बांधून त्यांत आपल्या देवतांची पूजा करीत असत. आजला जे दोन नगरावशेष सांपडलेले आहेत, त्यांतील मन्दिरें समजण्यांत आलेल्या इमारतींत कोणत्याहि देवतेच्या मूर्ति सांपडल्या नाहींत. एका ठिकाणीं लिंगाच्या आकाराचा एक स्तंभ सांपडला आहे असें म्हणतात. पण त्यावरून दास

लोक लिंगपूजक होते असें समजणें चुकीचें होईल. ते आपल्या देवळांत कोणत्या प्रकारें पूजा करीत असत याचा अद्यापि थांग लागलेला नाहीं. काहीं असो, त्यांचीं मन्दिरें होतीं असें गृहीत धरून चालण्यास हरकत नाहीं.

७६. इन्द्राची स्वारी आल्यावर हा प्रकार बदलला. एक मंडप घालून त्याच्यांत यज्ञयाग करण्याची प्रथा सुरू झाली. दास लोकांत जे यति असत, ते यज्ञ करीत होते किंवा नाहीं हें सांगतां येत नाहीं. शतपथ ब्राह्मणांत एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, 'यज्ञ हा विष्णु होता, व तो वामन ( ठेंगणा ) होता. पुढें तो हळू हळू वाढत गेला, व त्याचा सर्वत्र प्रसार झाला.'[1] याच्यावरून असें दिसतें कीं, इन्द्राच्या आगमनानंतर यज्ञसंस्था फारशी जोरांत नव्हती. पण पुढें ती हळू हळू विस्तार पावत गेली. साध्या अग्निहोत्रापासून तहत पुरुषमेधापर्यंत तिची मजल पोंचली.

७७. एकादा ऋषि नदीच्या काठीं किंवा दुसऱ्या अशाच रम्य ठिकाणीं जाऊन राहिला तर तो आपलें साधें अग्निहोत्र सुरू करी. पुढें त्याची प्रसिद्धि होत गेली तर एकामागून एक असे निरनिराळे याग करण्यास तो सुरुवात करी. एकादा राजा यजमान सांपडला तर त्या यागांना नुसता ऊत येत असे. पुरुषमेधाच्या रूपानें नरबली देण्यालाहि हे ब्राह्मण लोक कमी करीत नसत ! याशिवाय भुताखेतांच्या परिहाराला देखील या यज्ञाचा उपयोग होत असे. याप्रमाणें हळूहळू लग्नाकार्यांत, जातसंस्कार व मृतसंस्कार इत्यादि सर्व संस्कारांत

---

१ यज्ञमेव विष्णुं पुरस्कृत्येयुः ।...वामनो ह विष्णुरास ।...तेनेमां सर्वां पृथिवीं समविन्दन्त ।... [ शतपथ ब्रा० १।२।३।३-७ ]

यज्ञाचा प्रवेश झाला, व त्याबरोबर धार्मिक कृत्यांत ब्राह्मणाचा दर्जाहि वाढत गेला.

७८. सप्तसिंधु प्रदेशांत गाई मारून यज्ञ करण्याचा प्रघात दास लोकांत होता कीं नाहीं हें सांगतां येणें शक्य नाहीं. मात्र गंगा यमुनेच्या बाजूला गोहत्येला बराच विरोध होता, असें वर दिलेल्या कृष्णाच्या गोष्टीवरून दिसून येतें.[1] ह्याच देवकी-पुत्र कृष्णाला घोर आंगिरस ऋषीनें यज्ञाची एक साधी पद्धति शिकवली. त्या यज्ञाच्या दक्षिणा म्हणजे तपश्चर्या, दान, सरळ-पणा ( आर्जव ), अहिंसा आणि सत्य वचन ह्या होत.[2] ह्यांत कृष्णाला सांगितलेली अहिंसा म्हणजे केवळ गोहत्या न करण्या पुरती असावी; आणि याचसाठीं इन्द्राबरोबर त्यानें युद्ध केलें असावें. इन्द्राचें स्वामित्व पतकरून त्याच्या नांवें यज्ञयाग सुरु केले असते, तर दिवोदासाप्रमाणें कृष्णहि ऋग्वेदांतील एक नामांकित व्यक्ति होऊन राहिली असती. गाई मारून यज्ञ करणें त्याला पसंत नसल्यामुळें तो इन्द्राचा शत्रु बनला, व त्याची गणना असुर–राक्षसांत करण्यांत आली. तथापि मध्य हिंदुस्थानांत कृष्णाची पूजा अव्याहत चालू राहिली.

७९. कृष्णाचा गुरू नेमिनाथ नांवाचा जैन तीर्थंकर होता असा उल्लेख जैन ग्रंथांत अनेक ठिकाणीं सांपडतो. तेव्हां तो व घोर आंगिरस हे एकच होते कीं काय, अशी शंका येते.

८०. कृष्ण पांडवसमकालीन समजला जातो. परंतु ही समजूत चुकीची आहे. कुरु देशांत कौरवांचें किंवा पांडवांचें साम्राज्य व त्याचाच शेजारीं एकाच काळीं कंसाचें साम्राज्य

---

१ वि० १।४८–५४ पहा. २. अथ यत्तपो दानमार्जवमहिंसा सत्यवचनमिति ता अस्य दक्षिणाः । छां० उ० अ० ३।१७।४–६.

असणें शक्य नाहीं. महाभारतांत कंसाचा आणि कौरवांचा कांहीं एक संबंध दाखवलेला नाहीं. पौराणिक काळीं कृष्णाच्या व पांडवांच्या कथांची भेसळ करण्यांत आली. पण ती विश्वसनीय मानण्याला कोणताहि आधार नाहीं.

८१. दास व आर्य यांच्या संघर्षापासून उत्पन्न झालेल्या बलिदानपूर्वक यज्ञाला विरोध करणारी एतद्देशीय व्यक्ति म्हटली म्हणजे देवकीपुत्र कृष्ण ही समजली पाहिजे. परंतु केवळ गोपूजेनें संस्कृतीची अभिवृद्धि होणें शक्य नव्हतें. भपकेदार यज्ञयागांसमोर अशी ही साधी संस्कृति टिकली नाहीं.

८२. परिक्षित् राजाच्या वेळेला यज्ञयागांची प्रथा यमुनेच्या तिरावर येऊन धडकली. ह्या राजाचें वर्णन अथर्ववेदांत सांपडतें तें असें—

राज्ञो विश्वजनीनस्य यो देवो मर्त्यां अति ।
वैश्वानरस्य सुष्टुतिमा सुनोता परिक्षितः ॥ ७ ॥
परिच्छिन्नः क्षेममकरोत्तम आसनमाचरन् ।
कुलायन्कृण्वन्कौरव्यः पतिर्वदति जायया ॥ ८ ॥
कतरत्त आहराणि दधि मन्थां परिश्रुतम् ।
जायाः पतिं विपृच्छति राष्ट्रे राज्ञः परिक्षितः ॥ ९ ॥
अभीवस्वः प्रजिहीते यवः पक्वः पथो बिलम् ।
जनः स भद्रमेधति राष्ट्रे राज्ञः परिक्षितः ॥१०॥

—अथर्व० काण्ड २०, सू० १२७

"सगळ्या मर्त्य लोकांत श्रेष्ठ अशा सार्वभौम वैश्वानर परिक्षित् राजाची उत्तम स्तुति मन लावून ऐका (७). हा कौरव राजा गादीवर आला तेव्हां अंधकाराला बंधन घालून लोकांचीं घरें यानें सुरक्षित केलीं, असें बायकोला नवरा सांगतो (८). परिक्षित् राजाच्या राष्ट्रांत बायको नवऱ्याला

विचारते, तुझ्यासाठीं दहीं आणूं कीं लोणी आणूं ? ( ९ ). परिक्षित् राजाच्या राज्यांत भरपूर पिकलेला जवस रस्त्याच्या बाजूला पडलेला असतो. ( अशा रीतीनें ) परिक्षिताच्या राज्यांत लोकांच्या सुखाची अभिवृद्धि होत आहे ( १० )."

८३. हें भाषांतर जेमतेम आहे. कां कीं, शंकर पांडुरंग पंडित यांच्या अथर्व वेदाच्या संस्करणांत या श्लोकांवर भाष्य नाहीं. हेमचन्द्र रायचौधरी यांनी या श्लोकांचें भाषांतर केलें आहे; [1] परन्तु तें निर्दोष वाटत नाहीं. मूळ श्लोकांत 'परिच्छिन्नः' याच्या बद्दल 'परिक्षिन्नः' असा पाठ असता तर बरें झालें असतें. अभीवस्वः याचा अर्थ समजत नाहीं. 'क्षेममकरोत्तमः' याचा अर्थ अत्यन्त सुरक्षित करता झाला असाहि असणें संभवनीय आहे.

८४. ह्या अर्थ लावण्याच्या प्रयत्नांत विशेष खोल जाण्याचें कारण नाहीं. परिक्षित् राजाचें राज्य अत्यन्त समृद्ध होतें एवढा निष्कर्ष यांतून निघतो; व तेवढाच आम्हाला पाहिजे. अशा सुसम्पन्न राष्ट्रांत घोर आंगिरसानें कृष्णाला शिकवलेली तप, दान, ऋजुभाव, अहिंसा व सत्य, या गुणांनी मण्डित साधी संस्कृति टिकाव कशी धरणार ? अशा संपन्न राजाला भपकेदार यज्ञयागांची संस्कृति प्रिय झाली, व यज्ञयागांत प्रवीण असलेल्या ब्राह्मणांना आणून त्यानें यज्ञयागाचें स्तोम माजवलें, तर त्यांत विशेष कोणता ?

८५. सुत्तनिपातांत ब्राह्मणधम्मिक नांवाचें एक सुत्त आहे. त्याचा सारांश याठिकाणीं देणें अप्रस्तुत होणार नाहीं. "एकदां भगवान् बुद्ध श्रावस्तींत रहात होता. त्या वेळीं कोसल देशां-

---

[1] Political History of Ancient India, p. 7.

तील कांहीं वयोवृद्ध ब्राह्मण बुद्धाजवळ आले, आणि कुशल प्रश्नादिक विचारल्यावर त्यांनी भगवन्ताला प्रश्न केला कीं, आजकालचे ब्राह्मण प्राचीन ब्राह्मणधर्माला अनुसरत आहेत काय? त्यावर भगवंतानें नकारार्थी उत्तर दिलें. तेव्हां त्यांनी प्राचीन ब्राह्मणधर्म सांगण्याची भगवंताला विनंति केली. भगवान् म्हणाला—

८६. "प्राचीन ऋषि संयमशील व तपस्वी असत. चैनीचे पदार्थ सोडून ते आत्मचिंतन करीत. त्या ब्राह्मणांजवळ पशु व धनधान्य नसे. स्वाध्याय हेंच त्यांचें धनधान्य असे, व ब्रह्मरूपी ठेव्याचें ते पालन करीत.... ते ब्राह्मण एकपत्नीव्रती असत. ते बायकोला विकत घेत नसत. खरें प्रेम असलेल्या स्त्रीशींच ते लग्न करीत. ते ऋतुकालाभिगामी असत....

८७. "परंतु त्यांची प्रकृति बिघडत गेली. राजवैभव, अलंकृत स्त्रिया, उत्तम घोडे जोडलेले रथ, चांगलीं घरें इत्यादि उपभोग्य वस्तूंचा ब्राह्मणांना लोभ सुटला. त्यांनी मंत्र तयार करून ओक्काक राजाला यज्ञ करण्यास सांगितलें. तेव्हां राजानें अश्वमेध, पुरुषमेध, वाजपेय इत्यादि यज्ञ केले....

८८. "पुढें या ब्राह्मणांनी लोभवश होऊन ओक्काक राजाला गोमेध करण्यास लावलें. मेंढ्यांसारख्या गरीब गाईंना ओक्काक राजानें शिंगें पकडून यज्ञांत ठार केलें. जेव्हां गाईवर शस्त्रपात झाला, तेव्हां देव, पितर, इंद्र, असुर आणि राक्षस या सर्वांनी अधर्म झाला अशी एकच आरोळी ठोकली. पूर्वी इच्छा, भूक व जरा, हे तीनच रोग असत. परंतु पशुयज्ञाला सुरुवात झाल्यापासून ते अठ्ठ्याणव झाले....

८९. "जेथें अशी गोष्ट होते, तेथें लोक याजकाची निंदा करतात. या रीतीनें धर्माचा विपर्यास झाल्यामुळें शूद्र व वैश्य

हे निरनिराळे झाले. क्षत्रियहि निराळे पडले; आणि पत्नी पतीची अवगणना करूं लागली. क्षत्रिय व ब्राह्मण यांना गोत्राचें रक्षण असे ( ते कुलधर्माप्रमाणें वागत ). परन्तु (पशु-वधानंतर ) कुलप्रवादाचें भय सोडून ते लोभवश झाले."

९०. या सुत्तावरून असें अनुमान करतां येतें कीं, गंगायमुनेच्या प्रदेशांत एका काळीं पशुयज्ञ करीत नसत; साधें अग्निहोत्र पाळीत असत. कृष्णाच्या कथेवरूनहि या अनु-मानाला बळकटी येते. परिक्षित् राजानें पशुवधाची प्रथा प्रथमतः सुरू केली असावी. ओक्काक म्हणजे इक्ष्वाकु समजला जातो. तो परिक्षित् नव्हे. पण सुत्तकर्त्याला कोणी तरी एक राजा पाहिजे होता; व परिक्षिताचें नांव त्याला माहीत नव्हतें. तेव्हां त्यानें इक्ष्वाकूचें नांव या सुत्तांत घातलें असावें. एवढी गोष्ट खरी कीं, परिक्षित् व त्याचा मुलगा जनमेजय यांनी प्रथमतः ब्रह्मावर्तांत यज्ञयागांचें स्तोम माजवलें. असें नसतें तर अथर्व वेदांत व तदनंतरच्या वैदिक वाङ्मयांत या दोन राजांना इतकें महत्त्व मिळालें नसतें. त्यांच्या प्रयत्नांमुळें पूर्वीची साधी संस्कृति लोप पावली, व ही यज्ञयागांची भपकेदार नवी संस्कृति ब्राह्मावर्तांत दृढमूळ झाली.

९१. या नवीन संस्कृतीमुळें वरील सुत्तांत म्हटल्या प्रमाणें ब्रह्मावर्ताची अवनति झाली असें समजण्यास विशेष आधार नाहीं. पूर्वीची संस्कृति खरोखरच बळकट असती, तर तिनें ह्या नव्या संस्कृतीशीं टक्कर देऊन तिचा पराजय केला असता. दुसरें असें कीं, यज्ञयाग करणाऱ्या ब्राह्मणांबद्दल बुद्धकाळीं जो सर्वत्र आदर होता तो दिसला नसता. त्या काळीं शिक्षणाचें सर्व काम ब्राह्मणांच्या हातीं होतें. केवळ वेद शिकवण्याचेंच नव्हे, तर धनुर्विद्या, वैद्यक इत्यादि विद्या शिकवण्याचें कामहि ब्राह्मणच

करीत असत. ब्राह्मणांचीं जिकडे तिकडे गुरुकुलें असत व त्यांत शेंकडों विद्यार्थी अध्ययन करीत असत. तक्षशिला येथील विश्वविद्यालयांत बहुतेक सर्व आचार्य ब्राह्मण होते. ब्राह्मणांच्या गुरुकुलांची व तक्षशिला येथील आचार्यांचीं वर्णनें जातक-अट्ठकथेंत जिकडे तिकडे सांपडतात. या आचार्यांचें राजे लोकांवर देखील किती वजन असे, हें खालील गोष्टीवरून दिसून येईल.

९२. "वाराणसीच्या ब्रह्मदत्त राजाच्या मुलाचें नांवहि ब्रह्मदत्तच होतें. पूर्वीचे राजे आपले मुलगे निरभिमानी, शीतोष्ण सहन करणारे व लोकव्यवहार जाणणारे व्हावे अशा हेतूनें त्यांचें शिक्षण आपल्या राजधानींत न करतां त्यांना दूरच्या राष्ट्रांत पाठवीत असत. त्याप्रमाणें ब्रह्मदत्त राजानेंहि आपल्या मुलाला तक्षशिलेला पाठविलें. तेथें एका आचार्यगृहीं तो विद्याभ्यास करूं लागला. तो आचार्याबरोबर स्नानाला जात होता. वाटेंत एका बाईनें पांढरे तीळ वाळत टाकले होते. राजकुमारानें त्यांतले मूठभर तीळ खाल्ले. म्हातारी कांहीं बोलली नाहीं. दुसऱ्या दिवशींहि तोच प्रकार झाला. पण तिसऱ्या दिवशीं जेव्हां राजकुमारानें तीळ खाल्ले, तेव्हां म्हातारीनें आपले तीळ चोरतात, अशी आरडाओरड केली. या प्रकरणीं चौकशी करून आचार्य तिला म्हणाला, 'बाई, उगाच रडूं नकोस. त्यांची किंमत तुला दिली जाईल.' ती म्हणाली, 'महाराज ! मला किंमत नको आहे. पण हा कुमार पुन्हा हें कृत्य करणार नाहीं असा याला दण्ड करा.' आचार्यानें बांबूच्या काठीचा राजकुमाराच्या पाठीवर त्या बाई समोर तीनदां प्रयोग केला. राजकुमाराच्या पायांच्या तळव्यांची आग मस्तकाला पोंचली !

९३. "शिक्षण संपल्यावर राजकुमार वाराणसीला आला. वडील ब्रह्मदत्तानें आपल्या हयातींतच त्याला अभिषेक केला.

तेव्हां त्याला आपल्या गुरूनें केलेल्या अपराधाची आठवण झाली. दूत पाठवून त्या नवीन राजानें आचार्याला वाराणसीला येण्याचें आमंत्रण केलें. त्याप्रमाणें आचार्य वाराणसीला आला. राजसभेंत प्रवेश केल्यावर त्याला पाहून राजा आपल्या मंडळीला म्हणाला, 'भो ! याच्या मारण्यानें आज देखील माझी पाठ दुखत आहे. आचार्य कपाळावर मरण घेऊन आलेला आहे. ह्यांतून तो कसा वांचणार ?' आचार्य म्हणाला, 'महाराज, त्या वेळीं जर मी तुम्हाला शिक्षा केली नसती, तर हळू हळू चोरीची संवय वाढत जाऊन तुम्ही प्रसिद्ध चोर झालां असतां; व राजपदाला मुकलां असतां.' तें ऐकून राजाचे अमात्य म्हणाले, 'महाराज ! आचार्य म्हणतो तें सत्य आहे. हें वैभव आचार्यामुळेंच तुम्हाला मिळालें असें समजलें पाहिजे.' महाराजाला ही गोष्ट पटली, व आपलें सर्व राज्य आचार्याला देण्याला तो प्रवृत्त झाला. परन्तु आचार्यानें त्याचा स्वीकार केला नाहीं. तेव्हां राजानें तक्षशिलेहून आचार्याच्या बायकांमुलांना वाराणसीला आणवीलें, व आचार्याला आपलें पुरोहितस्थान दिलें."[१]

९४. ब्राह्मणवर्गांत अशा रीतीच्या निस्पृह व न्यायी व्यक्ति निपजत असत याचें कारण वाङ्मयसेवेला व धार्मिक चिंतनाला जी सवड पाहिजे असते ती जास्तींत जास्त ब्राह्मण वर्गालाच मिळत असे. क्षत्रियांचा वेळ लढाईंत व राज्यकारभारांत जात असे. वैश्य शेतींत व व्यापारांत दंग असत. शूद्र तर निवळ पायांखालीं तुडवले जाणारे. तेव्हां सगळ्या समाजाचें पुढारीपण ब्राह्मण वर्गाकडे येणें साहजिक होतें. पण त्यामुळें

---

१ तिलमुट्ठिजातक, क्रमांक २५२.

समतेचें तत्त्वज्ञान उत्पन्न झालें नाहीं; विषमता कायम राहिली, आणि संहितेच्या काळापासून वैदिक वाङ्मयांत ब्राह्मणाचें वर्चस्व ठेवण्याचा सारखा प्रयत्न सुरू झाला.

९५. वर एके ठिकाणीं उल्लेख आलाच आहे कीं, वृत्राला मारल्याचा विश्वरूपाला मारल्याचा, यतींना कुत्र्यांना खाऊं घातल्याचा, अरूर्मघांना ठार मारल्याचा व बृहस्पतीवर प्रतिप्रहार केल्याचा असे देवांनी इंद्रावर पांच आरोप ठेवले[1]. तैत्तिरीय संहितेचें आणि ऐतरेयादिक ब्राह्मण ग्रंथांचें असें म्हणणें कीं, या पापांबद्दल इंद्राला प्रायश्चित्त घ्यावें लागलें. पण जो इंद्र आपल्याच बापाला पायाला धरून ठार मारतो, तो वृत्रादिक ब्राह्मणांना ठार मारल्याबद्दल प्रायश्चित्त घेईल, हें संभवतच नाहीं. "मी यतींना कुत्र्यांना खावूं दिलें.... आणि त्या बाबतींत माझा लोम देखील वांकला नाहीं....मातृ-वधानें, पितृवधानें, चोरीनें, भ्रूणहत्येनें देखील ( माझ्या-सारख्या माणसाला ) पाप लागत नाहीं; चेहऱ्याचा नूरहि पालटत नाहीं"[2]. हें जें वाक्य कौषीतकी-उपनिषत्कारानें इंद्राच्या तोंडीं घातलें आहे, तेंच इंद्राच्या आचरणाला अधिक साजण्या-जोगें वाटतें. पण त्यामुळें ब्राह्मणांकडे कमीपणा येतो. कारण ज्या इंद्रानें ब्रह्महत्या केली, त्याचीच पूजा ब्राह्मणांनी करावी कशी ? ह्यासाठींच इंद्राच्या प्रायश्चित्ताची गोष्ट रचावी लागली.

---

१ वि० १।३४ पहा.

२ यतीन्सालावृकेभ्यः प्रायच्छं...तस्य मे तत्र न लोम च नामीयते... न मातृवधेन न पितृवधेन न स्तेयेन न भ्रूणहत्यया नास्य पापं च चकृषो मुखान्नीलं वेत्तीति । [ कौषी० उ० ३ । १ ]

९६. ब्राह्मणें व आरण्यकें यांच्या काळीं तर हा ब्राह्मणवर्गाचा प्रयत्न फारच वाढला. त्यामुळें सामान्य जनतेची हेळसांड झाली. जेथें निरूपाय असे तेथें क्षत्रियांशीं नमतें घ्यावें, व वैश्य आणि शूद्र या जातींना दाबून टाकावें, असा प्रयत्न ह्या वैदिक वाङ्मयांत सर्वत्र दिसून येतो. ह्यासंबंधीं प्रोफेसर वैजनाथ काशिनाथ राजवाडे ह्यांचा विविधज्ञानविस्तारांतील ( नोव्हेंबर १९२७ ) 'ब्राह्मणकालीन जातिभेद' हा लेख मननीय आहे. प्रो० राजवाडे यांचा वैदिक वाङ्मयाचा व्यासंग दांडगा आहे, व त्यांचा निःपक्षपातीपणा आणि समतोलपणा सर्वत्र प्रसिद्ध आहे. तेव्हां त्यांच्या लेखांतील कांहीं उतारे येथें देणें योग्य वाटतें. ज्या वाचकांना मूळ लेख वाचणें शक्य असेल, त्यांनी तो अवश्य वाचावा.

९७. प्रो० राजवाडे म्हणतात, "यज्ञक्रिया व पौरोहित्य हीं ब्राह्मणांकडेच रहावीं अशी सारखी खटपट....ज्या राजापाशीं पुरोहित नसेल त्याचें अन्न देव खात नाहींत. तेव्हां यज्ञ करूं इच्छिणाऱ्या राजानें कोण्या तरी ब्राह्मणाला पुरोहित करावें. पुरोहित संपादन केल्यानें स्वर्गास नेणारे अग्निच तो संपादन करतो. सर्व अग्नि तृप्त होऊन त्याला स्वर्गाला नेतात. त्याचें क्षात्रतेज, बल, वीर्य व राष्ट्र वाढतें. पुरोहित नसेल तर हें सर्व नष्ट होतें व त्याला स्वर्गांतून हांकलून लावतात. पुरोहिताच्या वाणींत, पायांत, कातडींत, हृदयांत व आणखी एके ठिकाणीं असे पांच क्रोधाग्नि असतात. या बसा म्हणण्यानें, पाद्यानें, वस्त्रांनी व अलंकारांनी, धनानें व राजवाड्यांत ऐषआरामांत राहूं दिल्यानें हे अग्नि शांत होतात. ( शत० ब्रा० ३।२।४०-१ ) व त्याच्या राज्याला बळकटी येऊन सर्व त्याच्या ताब्यांत रहातात. ( ३।२।४०-२ ) [ पृष्ठ ४१०-११ ]

९८. "क्षत्रियाला ताब्यांत ठेवण्याकरतां आपण देव आहोंत असेंहि म्हणावयाला ब्राह्मण चुकले नाहींत. देव दोन प्रकारचे— एक ज्यांना आपण नेहमीं देव म्हणतों ते. पढित विद्वान् ब्राह्मण हे मनुष्यदेव. आहुतींनी देवांना खूष केलें पाहिजे, दक्षिणा देऊन मनुष्यदेवांचें समाधान केलें पाहिजे. दोन्ही देव तृप्त होऊन यजमानाला सुस्थितींत ठेवतात. (शत० ब्रा० २।२।२।६) व त्याला स्वर्गाला पोंचवितात (शत० ब्रा० ४।३।४।४). [ पृष्ठ ४१२ ]

९९. "आपलें वर्चस्व राखण्यासाठीं ब्राह्मणांना अशी खटपट करावी लागली व युक्त्या लढवाव्या लागल्या. ते आपल्याला ओळखून होते. 'न वै ब्राह्मणो राज्यायालं' ( शत० ब्रा० ५।१।१।१२ ) ब्राह्मण राज्य करण्याला अयोग्य. क्षत्रियाशिवाय आपण काय करणार ? आपलें वीर्य वाणींत. 'ब्राह्मणो मुखतो हि वीर्यं करोति मुखतो हि सृष्टः' ( ताण्ड्य० ब्रा० ६।१।६ ) 'बाहुवीर्यो राजन्यो बाहुभ्यो हि सृष्टः' ( ताण्ड्य० ब्रा० ६।१।७ ) क्षत्रियाच्या दंडांत जोर, तेव्हां त्याच्याशीं एकोप्यानेंच वागलें पाहिजे. याकरितां ते जेव्हां तेव्हां क्षत्रियाची बढाई गात. 'एष वै प्रजापतेः प्रत्यक्षतमां यद्राजन्यस्तस्मादेकः सन्बहूनामीष्टे यद्वेव चतुरक्षरः प्रजापतिश्चतुरक्षरो राजन्यः' ( शत० ब्रा० ५।१।५।१४ ) राजा हा प्रत्यक्ष प्रजापति; म्हणून एक असून पुष्कळांवर राज्य करतो; प्रजापतीच्या नांवांत चार अक्षरें, राजन्य ह्या नांवांतहि चार. ऐन्द्राभिषेकानें राजा प्रत्यक्ष इन्द्र होतो. 'क्षत्रं वा इन्द्रः' ( शत० ब्रा० ४।३।३।७ ). ह्याला साम्राज्य मिळालें, स्वाराज्य मिळालें, वैराज्य मिळालें; हा खुद्द परमेष्ठी झाला; खरा क्षत्रिय झाला; सगळ्या विश्वाचा अधिपति, पुरन्दर, असुरांना मारणारा,

ब्राह्मणप्रतिपालक, धर्मरक्षक जन्माला आला अशा अभिषेकानन्तर आरोळया ठोकीत. ( ऐ० ब्रा० ३८-१ ) [ पृष्ठ ४१२ ]

१००. "जेथें अशा प्रकारचें परस्परावलंबित्व, अशा प्रकारचें सख्य, डोकें व बाहु, बुद्धि व शौर्य ह्यांची जोडी, तेथें इतर जातींचें काय चालणार ? वैश्याला यज्ञयागादि करण्याचा अधिकार होता तरी ब्राह्मण व क्षत्रिय ह्याच्यांशीं टक्कर द्यावयाची त्याची प्राज्ञा नव्हती. पुरुषसूक्तांत वैश्य मांड्यांपासून झाला असें म्हटलें आहे. ऋ० सं० १०।९०।१२, पण ताण्ड्य ब्राह्मणांत ( ६।१।१० ) ह्याहीपेक्षां कमाल केली आहे. तो प्रजननापासून झाला असें तेथें म्हटलें आहे. ह्यामुळेंच त्याचे जवळ पुष्कळ जनावरें असतात. ब्राह्मणांचा व क्षत्रियांचा तो भक्ष. कारण ब्राह्मण मुखांतून व क्षत्रिय ऊर व दंड ह्यांतून जन्मल्यावर ह्याहूनहि खालच्या भागांतून तो जन्मला. त्याला कितीहि खाल्लें तरी तो कमी व्हावयाचा नाहीं. ( ऐ० ब्रा० ३८।१ )

१०१. "वैश्य हा गाढव, नेहमीं लादलेला. ब्रह्म व क्षत्र दोघे वैश्यावर अवलंबून, त्याच्यावांचून गत्यतर नाहीं. तथापि वैश्य नेहमीं दबलेला ( शत० ब्रा० ११।२।३।१६ ). वैश्याला जरबेंत कसा ठेवावयाचा हा प्रयत्न. [ पृष्ठ ४१३ ]

१०२. 'जेथें वैश्याची ही दशा तेथें शूद्राला कोण विचारतो! पायांपासून उत्पत्ति. त्याला देवता नाहीं यज्ञ नाहीं. अग्नि व ब्राह्मण मुखापासून, इंद्र व क्षत्रिय ऊर व बाहू ह्यांपासून, वैश्य व विश्वेदेव प्रजननापासून; पण पायांपासून फक्त शूद्रच; देवता नाहीं. म्हणून शूद्रानें इतर जातीचे पाय धुवावे. ( ताण्ड्य ब्रा० ६।१।१।११ ) त्याचा भक्ष पाणी. जर पाणी भक्ष म्हणून घेशील तर तुझी प्रजा शूद्रासारखी होईल असें राजाला बजाविलें जाई. नेहमीं इकडून तिकडे हेलपाटे घालावयाला लावावें,

हवें त्यानें वाटेल तेव्हां गचांडी देऊन घालवावें, पाहिजे तर ताडन करावें किंवा ठार सुद्धां मारावें ( ऐ० ब्रा० ३५।३ ). त्याला दान देण्याला, विकण्याला कांहीं हरकत नाहीं. पद्युह वा एतच्छ्मशानं यच्छूद्रः। तस्माच्छूद्रसमीपे नाध्येतव्यं' ( आप० श्रौ० ). शूद्र हा चालतें बोलतें श्मशान; त्याला ऐकूं येईल इतकें जवळ अध्ययन करूं नये. जर मुद्दाम होऊन त्यानें श्रुति ऐकली तर त्याचे कानांत लाख किंवा कथील वितळवून ओतावें ( कात्या० श्रौ० व आप० श्रौ० )". [ पृष्ठ ४१४ ]

# वैदिक वाङ्मयाचा काळ

१०३. ऋग्वेदांत खिस्तापूर्वी साडेचार हजार वर्षांच्या ऋचा असणें संभवनीय आहे. पण त्या स्वतंत्र नसून त्यांचा निकट संबंध सुमेरियन ऋचांशीं असावयास पाहिजे. ऋग्वेदांतील पुष्कळशा ऋचा सुमेरियन ऋचांवरून घेतल्या आहेत असें जें डॉ० प्राणनाथ ह्यांचें म्हणणें, त्यांत बरेंच तथ्य असावें असें वाटतें. ज्या ऋचांत घोड्याचा संबंध येतो त्या ऋचा खिस्ती शकापूर्वी अठराव्या किंवा एकोणिसाव्या शतकापलिकडे जाऊं शकणार नाहींत. त्यांपैकीं एलाममध्ये किती व सप्तसिंधु प्रदेशांत किती रचल्या गेल्या हें सांगता येणें शक्य नाहीं. तथापि बाबिलोनियन वाङ्मयाच्या मदतीनें वैदिक ऋचांचा थोडा बहुत इतिहास मिळवतां येणें शक्य आहे.

१०४. यजुर्वेद व अथर्ववेद सप्तसिंधूच्या प्रदेशांत रचले गेले यांत शंका नाहीं. त्यांचा काळ खिस्ती शकापूर्वी चौदाव्या-पासून नवव्या शतकापर्यंत असावा. परिक्षित् राजाच्या सुसंपन्न राज्याचें अथर्ववेदांत आलेलें वर्णन वर दिलेंच आहे. अर्थात

हे श्लोक परिक्षित् राजा गादीवर आल्यावर रचले गेले असें सिद्ध होतें. परिक्षित् राजाच्या काळाची बरीच चर्चा करून हेमचन्द्र रायचौधरी यानीं वैदिक वाङ्मयास अनुसरून असा सिद्धांत काढला आहे कीं, त्याचा काळ खिस्ती शकापूर्वी नवव्या शतकापलीकडे जाऊं शकत नाहीं.[1] अर्थात् अथर्ववेद परिक्षित् राजाच्या वेळीं पुरा झाला असला पाहिजे. त्याच्या पूर्वी एक दोन शतकें यजुर्वेद व सामवेद हे तयार झाले असावेत.

१०५. ब्राह्मणें, आरण्यकें व उपनिषदें यांचा काळ बुद्धापूर्वीचा समजला जातो. परंतु ही समजूत फार चुकीची आहे. गुणाख्य शांख्यायन हा बुद्धसमकालीन होता असें हेमचन्द्र रायचौधरी याचें म्हणणें. त्याच्या गुरूचा गुरु उद्दालक आरुणी हा विदेहाच्या जनक राजाचा समकालीन. म्हणजे जनक राजा बुद्धापूर्वी दोन पिढ्या होता असें ठरतें. आणि शतपथ ब्राह्मण व बृहदारण्यक उपनिषद् यांत जो गुरुपरंपरा सांगितली आहे तींत सांजीवीपुत्र हा उद्दालकापासून पांचव्या पिढींतील ऋषि आहे. त्यावरून बुद्धानंतर तीन पिढ्यांनी शतपथ ब्राह्मण व बृहदारण्यक उपनिषद् रचलें गेलें असें सिद्ध होतें.

१०६. ह्याला दुसरा एक चांगला आधार ऐतेरेय आरण्यकांत सांपडतो तो असा—

तदुक्तमृषिणा—

प्रजा ह तिस्रो अत्यायमीयुर्न्यन्या अर्कमभितो विविश्रे ।
बृहद्ध तस्थौ भुवनेष्वन्तः पवमानो हरित आ विवेशेति ॥

ऋ० ८।१०१।१४

---

1 Political History of Ancient India, p. 16-17.

ह्या ऋग्वेदांतील ऋचेचा अर्थ ऐतेरेय आरण्यकांत ( आरण्यक २, अध्याय १ ) असा केला आहे. 'प्रजा ह तिस्रो अत्यायमीयुरिति या वै ता इमाः प्रजास्तिस्रो अत्यायमायंस्तानीमानि वयांसि वङ्गावगधाश्चेरपादाः ।' याचा अर्थ सायणाचार्यांनी असा केला आहे कीं, 'तीन प्रजा श्रद्धारहित झाल्या ( वैदिक कर्मांवर त्यांचा विश्वास राहिला नाहीं ). तीं हीं त्यांची तीन शरीरें. वयांसि म्हणजे कावळे वगैरे पक्षी; वङ्गा म्हणजे अरण्यगत वृक्ष; व अवगधा म्हणजे तांदूळ जवस वगैरे. चेरपादा = च + इरपादा. इरपादा म्हणजे बिळांत रहणारे सर्प वगैरे. हे सगळे वैदिक कर्मे न केल्यामुळें नरक अनुभवतात.' हा अर्थ विचित्रच नव्हे तर हास्यास्पदहि आहे. कांहीं कारणांनी ह्या आरण्यकाची सदोष प्रत सायणाचार्यांच्या हातीं आली, किंवा हें वाक्य त्यांना बरोबर वाचतां आलें नाहीं. यांत 'वङ्गा मगधाश्चेरपादाः' असा मूळचा पाठ असावयास पाहिजे. येथें अंग देशालाच वंग म्हटलें आहे, किंवा मगधाच्या पूर्वेकडील सर्वच देशाला वंग म्हटलें आहे. त्यानंतर मगध येतो, व मागाहून चेरपादा म्हणजे वज्जींचा देश. वज्जी हा शब्द वृजिनः ( फिरस्ते ) यापासून आलेला आहे. चेर किंवा चेल हा धातुहि गत्यर्थ आहे. तेव्हां चेरपादाः म्हणजे वृजिनः असें सिद्ध होतें. च निराळा धरून इरपादाः किंवा ईरपादाः असा पदच्छेद केला तरीहि तोच अर्थ निघतो. तथापि चेरपादाः हाच पाठ इष्ट दिसतो.

१०७ ऋग्वेदांतील ऋचेंत ज्या तीन प्रजा सांगितल्या त्या कोणत्या हें सांगतां येंत नाहीं. ऐतेरेय आरण्यकाची टीका बरोबर धरली तर ही वैदिक ऋचा बुद्धानंतर तिसऱ्या किंवा चौथ्या पिढींत रचली असावी, व ती प्रक्षिप्त असावी असें धरावें लागेल. मात्र ह्या आरण्यकाच्या काळाबद्दल शंका रहात

नाहीं. बुद्धाच्या वेळीं मगध देशांत मोठमोठाले यज्ञयाग होत असत, याला दाखला दीघ निकायांतील कूटदंत सुत्तांत आहे. कूटदंत ब्राह्मणानें मोठा यज्ञ आरंभिला होता; गाई, बैल वगैरे शेंकडो प्राणी यज्ञांत बळी देण्यासाठीं यूपांना बांधले होते. त्यानंतर बुद्धाची कीर्ति ऐकून तो बुद्धाजवळ येतो. त्याच्या विनंतीवरून बुद्ध त्याला, 'प्राचीन काळीं महाविजित राजानें निरामिष यज्ञ कसा केला, व त्यामुळें त्याच्या राज्यांतील प्रजा कशी सुखी झाली', ही गोष्ट सांगतो. बुद्धाचा धर्मोपदेश ऐकून ब्राह्मण बुद्धाचा उपासक होतो, व बलिदानासाठीं आणलेल्या पशूंना जीवदान देतो. यावरून असें दिसतें कीं, बुद्धसमकालीं मगध देशांत यज्ञयाग होत असत, व बुद्धाच्या धर्मोपदेशामुळें ते बंद पडले. तेव्हां ऐतरेय आरण्यक व तत्समकालीन इतर वैदिक वाङ्मय बुद्धानंतर तीन चार पिढ्यांनी रचलें गेलें याबद्दल शंकाच रहात नाहीं.

१०८. येथें वैदिक वाङ्मय म्हणजे चार वेद, ब्राह्मणें, आरण्यकें व उपनिषदें. आजकाल पुराणांचीहि वैदिक वाङ्मयांत गणना करण्यांत येते. पण त्यांची गणना वैदिक वाङ्मयांत करणें योग्य नाहीं. तें एक निराळेंच वाङ्मय आहे, व त्याचा विचार ह्या पुस्तकाच्या तिसऱ्या विभागांत करण्यांत येईल.

---

# विभाग दुसरा

# श्रमणसंस्कृति

## अहिंसाधर्माचा उगम

१. घोर आंगिरसानें कृष्णाला आत्मयज्ञ शिकवला. त्या यज्ञाच्या दक्षिणा म्हटल्या म्हणजे तपश्चर्या, दान, ऋजुभाव, अहिंसा व सत्य वचन.[1] कृष्णाचा गुरु नेमिनाथ नांवाचा तीर्थंकर होता असें जैन ग्रंथकरांचें म्हणणें आहे. हा नेमिनाथ व घोर आंगिरस एकच होते कीं काय ?

२. दुसरा एक उतारा जैन ग्रंथांत सांपडतो तो असा— भरहेरवएसुं णं वासेसु पुरिमपच्छिमवज्जा मज्झिमगा बावीसं अरहंता चाउज्जामं धम्मं पण्णवेंति । तं जथा—सव्वातो पाणातिवायाओ वेरमणं, एवं मुसावायाओ वेरमणं, सव्वातो अदिन्नादाणावो वेरमणं, सव्वातो बहिद्धादाणाओ वेरमणं ॥ स्थानांग सूत्र, क्रमांक २६६ ॥ ( भरत आणि एरवत या प्रदेशांत पहिला व शेवटचा खेरीज करून बाकी बावीस तीर्थंकर चातुर्याम धर्म उपदेशितात तो असा—सर्व प्राणघातापासून विरति; याप्रमाणें असत्यापासून विरति, सर्व अदत्तादानापासून ( चोरी पासून ) विरति, सर्व बहिर्धा आदानापासून ( परिग्रहापासून ) विरति.)

---

१ वि० १।७८ पहा.

ही नुसती दंतकथा असूं शकेल. परंतु छांदोग्य उपनिषदांतील घोर आंगिरसाचा उपदेश व ही परंपरागत आलेली जैनांची गोष्ट एकत्र केली तर असा निष्कर्ष निघतो कीं, निदान कृष्णाच्या वेळीं तरी उत्तर हिंदुस्थानांत अहिंसा म्हणजे काय हें माहीत होतें.

३. ऋषभदेवापासून नेमिनाथापर्यंत बावीस तीर्थंकर होतात. त्यांचीं चरित्रें जैन ग्रंथांत विस्तारपूर्वक दिलीं आहेत. तीं पूर्णपणें दंतकथात्मक दिसतात. उदाहरणार्थ, ऋषभदेवाची उंची पांचशें धनुष्यें होती; आयुष्य चौसष्ट लक्ष वर्षें; साधु शिष्य चौऱ्याऐंशीं हजार, व साध्वी शिष्य तीन लाख; श्रावक शिष्य तीन लाख पांच हजार, व श्राविका शिष्य पांच लाख चौपन हजार. ही उंची कमी कमी होत जाऊन बावीसाव्या तीर्थंकराची ( नेमिनाथाची ) दहा धनुष्यें झाली. ह्याचें आयुष्य एक हजार वर्षें; साधु शिष्य अठरा हजार; साध्वी शिष्य चाळीस हजार; श्रावक एक लक्ष एकुणसत्तर हजार, व श्राविका तीन लक्ष छत्तीस हजार.[१] हे आंकडे पाहिले म्हणजे हीं चरित्रें दंतकथात्मक आहेत असें सांगण्याचें कारणच रहात नाहीं. आपली परंपरा अतिप्राचीन काळची आहे हें दाखविण्याच्या उद्देशानें तीं जैन साधूंनी रचलीं असावींत.

४. तीर्थंकरांच्या उंच्या व आयुर्मर्यादा सोडून दिल्या तरी देखील त्याजपाशीं लहान किंवा मोठे संघ होते, हें पण संभवत नाहीं. तसे संघ असते तर परिक्षित् राजापासून बुद्धकाळापर्यंत कुरु देशांतून त्यांचा पूर्णपणें लोप होणें शक्य नव्हतें. याच कारणास्तव ह्या कथा ऐतिहासिक गणतां येत नाहींत. नेमिनाथ

१ श्रीकाललोकप्रकाश, सर्ग ३२.

किंवा त्याच्यासारखे दुसरे तपस्वी तपाच्या रूपानें अहिंसेचें आचरण करीत, व जे कोणी भक्तिभावानें त्यांजपाशीं येत त्यांनाहि अशा गोष्टींचा उपदेश करीत, हें संभवनीय आहे.

५. मज्झिम निकायांतील ( बाराव्या ) महासीहनाद सुत्तांत बुद्धानें बोधिसत्त्वावस्थेंत चार तऱ्हेचें तप आचरण केल्याचें वर्णन आहे. चार तऱ्हेचें तप म्हणजे तपस्विता, रूक्षता, जुगुप्सा आणि प्रविविक्तता. नग्न रहाणें, ओंजळींतच भिक्षा घेऊन खाणें, केस उपटून काढणें, कंटकशय्येवर निजणें इत्यादि प्रकारांनी देह दंडन करणें याला तपस्विता म्हणत. अनेक वर्षांची धूळ तशीच अंगावर बसूं देणें व ती कोणाला काढूं न देणें याला रूक्षता म्हणत. तिचीं अतिशयोक्तीचीं उदाहरणें पुराणांतहि आढळतातच. ऋषींच्या शरीरांवर वारुळें वाढत असत, व त्यांचे डोळे मात्र बाहेरून दिसत, अशीं वर्णनें पुराणांत कित्येक ठिकाणीं आलीं आहेत. पाण्याच्या थेंबावर देखील दया करणें याला जुगुप्सा म्हणत. अर्थात् जुगुप्सा म्हणजे हिंसेचा तिटकारा. अरण्यांत एकाकी रहाणें याला प्रविविक्तता म्हणत.

६. यावरून असें दिसून येईल कीं, अहिंसा किंवा दया हा एक तपाचरणाचा प्रकार होता, आणि तें तप आचरण करणारे बुद्धकालापूर्वीं एक दोन शतकें तरीं अस्तित्वांत होते. त्यांपैकीं कृष्णाचा गुरु घोर आंगिरस—किंवा जैनांच्या म्हणण्याप्रमाणें नेमिनाथ—हा एक असणें संभवनीय आहे. पण त्यांचे संघ नव्हते; व संघटितपणें अहिंसेचा प्रचार करण्याचा ते प्रयत्न करीत नसत. त्यामुळें कुरु देशांत यज्ञयागाचें स्तोम माजलें, व अहिंसेचें वातावरण नष्ट झालें.

७. जैनांचा तेवीसावा तीर्थंकर पार्श्व, हा ऐतिहासिक आहे असें बहुतेक पाश्चात्य पंडितांचें मत आहे. त्याच्या चरित्रांतहि

दंतकथा आहेतच. परन्तु त्या पूर्वीच्या तीर्थकरांच्या चरित्रां-
तील दंतकथांपेक्षां पुष्कळच कमी आहेत. पार्श्वाचें शरीर नऊ
हात उंच होतें; आयुष्य शंभर वर्षें होतें; सोळा हजार साधु
शिष्य, अडतीस हजार साध्वी शिष्य, एक लक्ष चौसष्ट हजार
श्रावक, व तीन लक्ष एकोणचाळीस हजार श्राविका होत्या.
या सगळ्यांत मुख्य ऐतिहासिक भाग म्हटला म्हणजे चोवि-
साव्या वर्धमान तीर्थंकराच्या जन्मापूर्वी एकशें अठ्ठ्याहत्तर वर्षें
पार्श्वतीर्थंकराचें परिनिर्वाण झालें.

८. वर्धमान किंवा महावीर तीर्थंकर बुद्धसमकालीन होता,
हें सर्वविश्रुतच आहे. बुद्धाचा जन्म वर्धमानाच्या जन्मानंतर
कमींत कमी पंधरा वर्षांनी झाला असला पाहिजे. म्हणजे
बुद्धाचा जन्म आणि पार्श्व तीर्थंकराचें परिनिर्वाण यांच्यामध्यें
एकशें त्र्याण्णवद वर्षांचा फरक पडतो. पार्श्व तीर्थंकर मरणा-
पूर्वी पन्नास वर्षें तरी उपदेश करीत असावा. म्हणजे बुद्धजन्मा-
पूर्वी सरासरी दोनशें त्रेचाळीस वर्षें पार्श्व मुनीनें उपदेशाला
सुरुवात केली. निर्ग्रंथ श्रमणांचा संघहि प्रथमतः त्यानेंच
स्थापन केला असावा.

९. परिक्षित् राजाचा काळ बुद्धापूर्वी तीन शतकें जाऊं
शकत नाहीं, हें वर दाखविलेंच आहे.[1] परिक्षित् राजानंतर
जनमेजय आला, व त्यानें कुरु देशांत महायज्ञ करून वैदिक
धर्माची ध्वजा उभारली. त्याच सुमारास काशी देशांत पार्श्व
एका नव्या संस्कृतीचा पाया घालीत होता. पार्श्वाचा जन्म
वाराणसी नगरींत अश्वसेन राजाच्या वामा नांवाच्या राणीच्या
उदरीं झाला अशी कथा जैन ग्रंथांत आहे.[2] त्याकाळीं राजा

---

१ वि० १।१०४ पहा. २ श्रीकाललोकप्रकाश, सर्ग ३२।८८७–८८.

म्हणजे अधिकारी जमीनदार असे. तेव्हां अशा एका राजाला हा मुलगा झाला असल्यास नवल नाहीं. पार्श्वाची नवीन संस्कृति काशी राष्ट्रांत टिकाव धरून राहिली असावी. कां कीं, बुद्धालाहि आपले पहिले शिष्य शोधून काढण्यासाटीं वाराणसीला यावें लागलें.

१०. पार्श्वाचा धर्म अगदीं साधा होता. हिंसा, असत्य, स्तेय व परिग्रह या चार गोष्टींचा त्याग करावा असा तो उपदेश करी.[1] इतक्या प्राचीन काळीं अहिंसेला सुसंबद्ध स्वरूप दिल्याचें हें पहिलेंच उदाहरण आहे.

११. सिनाई पर्वतावर मोझेसला परमेश्वरानें ज्या दहा आज्ञा ( Ten Commandments ) सांगितल्या त्यांत हत्या करूं नकोस हिचाहि समावेश आहे. परन्तु त्या आज्ञा स्वीकारून मोझेस आणि त्याचे अनुयायी पॅलेस्टाइनमध्यें शिरले, व तेथें त्यांनी नुसत्या रक्ताच्या नद्या वाहविल्या! किती लोकांची कत्तल केली व कितीतरी तरुण स्त्रिया पकडून नेऊन त्यांना आपल्या लोकांना वांटून दिलें! ह्या कृत्यांना जर अहिंसा म्हणावयाचें तर मग हिंसा ती कसली? तात्पर्य पार्श्वापूर्वी जगांत खऱ्याखुऱ्या अहिंसेनें ओथंबलेला असा कोणताहि धर्म किंवा तत्त्वज्ञान नव्हतें असेंच म्हणावें लागतें.

१२. दुसरी एक गोष्ट पार्श्वमुनीनें केली ती ही कीं, अहिंसेची सांगड सत्य, अस्तेय व अपरिग्रह या तीन नियमांशीं घालून दिली. म्हणजे पूर्वी जी अहिंसा केवळ रानांवनांत रहाणाऱ्या ऋषिमुनींच्या आचरणांत होती, व व्यवहारांत जिला

---

१ पार्श्वाच्या उपदेशाला चातुर्यामसंवरवाद म्हणत. वि० २।२ व २८ पहा.

M-1904.

फारशी किंमत नव्हती, तीच अहिंसा ह्या तीन नियमांच्या सहवासानें सामाजिक बनली; तो व्यवहार्य झाली.

१३. तिसरी गोष्ट म्हटली म्हणजे ही कीं, पार्श्व मुनींनें आपल्या ह्या नवधर्माच्या प्रसारासाठीं संघ बनवला. बौद्ध वाङ्मयावरून असें दिसून येतें कीं, बुद्धाच्या वेळीं जे कांहीं संघ अस्तित्वांत होते, त्या सर्वांत जैन साधूंचा व साध्वींचा संघ मोठा होता.

१४. पार्श्वापूर्वी ब्राह्मणांचे मोठमोठाले समुदाय होतेच. पण ते यज्ञयागाच्या प्रचारासाठीं. यज्ञयागांचा तिटकारा येऊन जे जंगलांत जाऊन तपस्या करीत असत त्यांचेहि संघ होते. तपस्येचें एक अंग ह्या दृष्टीनें ते अहिंसा पाळीत असत; परंतु सामान्य जनतेला अहिंसेचा उपदेश करीत नसत. ते क्वचितच लोकांत मिसळत असत.

१५. बुद्धकालापूर्वी अस्तित्वांत असलेल्या चार प्रकारच्या श्रमणब्राह्मणांचें सोदाहरण वर्णन निवापसुत्तांत सांपडतें. त्याचा थोडक्यांत सारांश असा—"बुद्ध भगवान् श्रावस्ती-मध्यें अनाथ पिंडिकाच्या आरामांत रहात असतां भिक्षूंना उद्देशून म्हणाला, 'भिक्षुहो, कुरण लावणारा मनुष्य मृगांच्या कल्याणासाठीं कुरण लावीत नाहीं. त्याचा हेतु असा असतो कीं, या कुरणांतील गवत खाऊन मृगांनी प्रमत्त व्हावें व आपल्या ताब्यांत यावें.'

१६. "अशा एका कुरणामध्यें एका कळपांतील मृग येऊन यथास्थित गवत खाऊन प्रमत्त झाले, व त्यामुळें कुरणाच्या मालकाच्या पाशांत सांपडले. तें पाहून दुसऱ्या कळपांतील मृगांनी असा विचार केला कीं, या कुरणांत शिरणें सर्वथैव अनिष्ट आहे. त्यांनी तें कुरण सोडून दिलें, व ते ओसाड अरण्यांत

शिरले. परंतु उन्हाळयाचे दिवस आल्यावर तेथें चारापाणी मिळेनासें झाल्यामुळें त्यांच्या शरीरांत बळ राहिलें नाहीं. उदर-पीडेनें त्रस्त होऊन ते त्या कुरणांत शिरले, व प्रमत्त होऊन कुरणाच्या मालकाच्या पाशांत सांपडले. तिसऱ्या कळपांतील मृगांनी हे दोन्ही मार्ग सोडून देऊन कुरणाच्या जवळच जंगलाचा आश्रय केला, व ते मोठ्या सावधगिरीनें कुरणांतील गवत खाऊं लागले. बराच काळपर्यंत ते त्या कुरणाच्या मालकाच्या ताब्यांत गेले नाहींत. पण त्याला जेव्हां त्यांचें आश्रयस्थान समजलें, तेव्हां त्यानें त्याभोंवतीं जाळीं पसरून त्या मृगांना आपल्या हस्तगत केलें. हें पाहून चौथ्या कळपांतील मृगांनी कुरणापासून दूर अंतरावर गहन अरण्यांत वस्ती केली, व ते मोठ्या सावधगिरीनें कुरणांतील गवत खाऊं लागले. कुरणाच्या मालकाला त्यांच्या आश्रयस्थानाचा पत्ता लागला नाहीं.

१७. "हें रूपक आहे. कुरण म्हणजे उपभोग्य वस्तु. कुरणाचा मालक मार. पहिल्या कळपांतील मृग म्हणजे उपभोग्य वस्तूंचा यथास्थित उपभोग घेणारे श्रमण-ब्राह्मण. उपभोग्य वस्तूंचें भय वाटून त्यांपासून विरत होऊन ज्यांनी अरण्यवास पतकरला ते श्रमण-ब्राह्मण दुसऱ्या कळपांतील मृगांसारखे होत. ते कांहीं काळपर्यंत गवत, गोमय, फलमूलादिक भक्षण करून अरण्यांत राहिले. पण त्यांचीं शरीरें दुर्बळ झालीं; विचार करण्याचें सामर्थ्य राहिलें नाहीं; व ते त्याच कुरणांत शिरले. तिसऱ्या वर्गांतील श्रमण-ब्राह्मणांनी अशा रीतीनें जंगलाचा आश्रय केला नाहीं. ते उपभोग्य पदार्थांचा अत्यन्त सावधगिरीनें उपभोग घेऊं लागले. पण ते अशा वादांत पडले कीं, हें जग शाश्वत आहे, हें जग शाश्वत नाहीं; या जगाचा

अंत होणार, या जगाचा अंत होणार नाहीं; जीव आणि शरीर एक आहे, जीव आणि शरीर भिन्न आहे; तथागत मरणानंतर रहातो, तथागत मरणानंतर रहात नाहीं, इत्यादि. अशा वादांनी हे श्रमण-ब्राह्मणहि तिसऱ्या कळपांतील मृगांप्रमाणें मारपाशांत सांपडले. चौथ्या वर्गातील श्रमण-ब्राह्मणांनी या सर्व गोष्टी वर्ज्य केल्यामुळें चौथ्या कळपांतील मृगांप्रमाणें ते मारपाशांत सांपडले नाहींत."

१८. ह्या सुत्तांत सांगितलेले पहिले श्रमण-ब्राह्मण म्हटले म्हणजे वैदिक यज्ञयागादि कृत्यें करून मांसाहार व सोमपान करणारे ब्राह्मण व यति हे असले पाहिजेत. अशा चैनीला कंटाळून व भिऊन अरण्यवास पतकरणारे जे तपस्वी संघ असत, ते दुसरे श्रमण-ब्राह्मण होत. जंगलांत जोंपर्यंत खायला मिळे, तोंपर्यंत त्यांचें ठीक चाले. पण जेव्हां फलमूलांची न्यूनता पडे तेव्हां पुनः ग्रामवास पतकरून ते चैनींत शिरत. पुराणांतरीं पराशरादिकांचीं उदाहरणें आहेतच. तिसरे श्रमण-ब्राह्मण म्हटले म्हणजे बुद्धसमकालीन निरनिराळ्या संघांत रहाणारे संन्यासी होत. ते ब्रह्मचर्यादिक नियम पूर्णपणें पाळीत, व उपभोग्य वस्तूंचा मितपणें उपभोग घेत. परंतु आत्मा आहे कीं नाहीं, जग शाश्वत कीं अशाश्वत इत्यादि वादांत शिरत, व त्यामुळें ते माराच्या पाशांत सांपडत. चौथे श्रमण-ब्राह्मण म्हणजे बुद्धाचे शिष्य. ते आत्मवादांत शिरत नसत, व त्यामुळें ते माराच्या पाशांत सांपडत नसत.

१९. बुद्धसमकालीन श्रमणांचें वर्णन पुढें येणारच आहे.[1] येथें एवढेंच दाखवावयाचें आहे कीं, बुद्धापूर्वी यज्ञयागांचा धर्म

---

१ वि० २।२३–३५ पहा.

मानणारे ब्राह्मण होते, व त्यानन्तर यज्ञयागांना कंटाळून अरण्याचा आश्रय करणारे तपस्वी होते. बुद्धसमकालीं असे ब्राह्मण व तपस्वी नव्हते असें नाहीं. परन्तु या दोन पंथाचे दोष पहाणारे तिसऱ्या प्रकारचे संन्यासी लोकहि होते; आणि त्या लोकांत पार्श्व मुनीच्या शिष्यांची गणना प्रामुख्यानें केली पाहिजे.

२०. कपिल मुनि बुद्धापूर्वी एक दोन शतकें तरी जन्मला असला पाहिजे. कारण त्याचें नांव शाक्यांच्या मुख्य राजधानीला दिलें होतें.

एतत्पवित्रमग्र्यं मुनिरासुरयेऽनुकंपया प्रददौ।
आसुरिरपि पंचशिखाय तेन च बहुधा कृतं तंत्रम् ॥

(हें पवित्र व उत्तम शास्त्र कपिल मुनीनें अनुकंपा करून आसुरीला दिलें, व आसुरीनें पंचशिखाला दिलें; आणि त्यानें याचा विस्तार केला.) सांख्य कारिकेच्या शेवटीं सांपडणाऱ्या ह्या आर्यैत सांख्याचार्यांची परम्परा सांगितली आहे. त्यावरून असें दिसून येतें कीं, कपिल मुनीचा शिष्य आसुरि व आसुरीचा शिष्य पंचशिख होता.

२१. शान्तिपर्वांतील तीनशें चोविसाव्या अध्यायांत[१] पंचशिख भिक्षूचा व जनक राजाचा संवाद दिलेला आहे; आणि तीनशें पंचविसाव्या अध्यायांत जनक म्हणतो कीं, "भिक्षोः पंचशिखस्याहं शिष्यः परमसंमतः" (पंचशिख भिक्षूचा मी परमसंमत शिष्य आहें). हें महाभारताचें म्हणणें खरें असेल तर जनकापूर्वी दोन पिढ्या कपिल होता असें सिद्ध होतें; व त्याचा काळ बुद्धापूर्वी दुसऱ्या शतकांतील ठरतो. सांख्याचा

---

१ कुम्भकोण संस्करण; औंध संस्करण अध्याय ३१९ व ३२०.

विकास जनकाच्या वेळीं झाला असें गृहीत धरलें तर बुद्धसमकालीं अस्तित्वांत असलेल्या प्रसिद्ध श्रमणसंघांवर त्याचा फारसा परिणाम झाला नसावा असें म्हणावें लागेल. अथवा सांख्याचें तत्त्वज्ञान कांहीं अंशीं पकुध (ककुध) कात्यायनाच्या तत्त्वज्ञानासारखें असावें, व त्याचा विकास होतां होतां सध्या अस्तित्वांत असलेल्या ईश्वर कृष्णाच्या सांख्यकारिका बनल्या असाव्या असें धरावें लागेल. कांहीं असो, बुद्धकालीं बरेच श्रमणब्राह्मण सांख्यासारख्या आत्मवादांत शिरले होते ह्यांत शंका नाहीं.

२२. आजकाल असें गृहीत धरण्यांत येतें कीं, बौद्ध धर्म सांख्यतत्त्वज्ञानापासून निघाला. पण त्याला प्राचीन बौद्ध ग्रंथांत मुळींच आधार नाहीं. बुद्धचरितकाव्यांत आडार कालाम व उद्रक रामपुत्र यांना सांख्याचे प्रवर्तक बनविलें आहे. त्यांच्यावर सांख्याचा परिणाम कितपत झाला होता हें सांगतां येणें कठीण आहे. कारण सुत्तपिटकांत जी त्यांची माहिती आली आहे तींत सांख्याचा व त्यांच्या तत्त्वज्ञानाचा निकट संबंध दिसून येत नाहीं. सांख्याचें तत्त्वज्ञान बीजरूपानें बुद्धकालीं अस्तित्वांत होतेंच. त्याचा बुद्धावर जर कांहीं परिणाम झाला असेल, तर तो हाच कीं, सांख्यानें वर्णिलेल्या आत्म्याचें बुद्धाला मुळींच अस्तित्व दिसून आलें नाहीं. किंबहुना तशा आत्म्याचें अस्तित्व मानणें अपायकारक आहे, असें बुद्धाचें ठाम मत झालें. पार्श्वनाथाच्या चार यामाशींहि सांख्याचा संबंध मुळींच नाहीं. याच यामांतून अहिंसाधर्म निघाला.

## बुद्धसमकालीन श्रमणसंस्था

२३. बुद्धसमकालीं बासष्ट श्रमणपंथ अस्तित्वांत होते असें ब्रह्मजाल सुत्तावरून व सुत्तनिपातांतील 'यानि च तीणि यानि

च सट्ठि[1] या वाक्यावरून दिसून येतें. या वाक्यांत त्रेसष्ट श्रमणपंथ म्हटले आहेत. कारण बौद्ध पंथाचीहि त्यांत गणना केली आहे. ब्रह्मजाल सुत्तांत ह्या बासष्ट मतांचें विस्तारानें वर्णन करण्याचा प्रयत्न केला आहे. पण तें वर्णन काल्पनिक असावें अशी बळकट शंका येते. ज्या वेळी हें सुत्त लिहिलें त्या वेळीं बुद्धकाळीं बासष्ट पंथ अस्तित्वांत होते ही परंपरा कायम होती. पण त्यांचे विचार व आचार ह्या सुत्तकाराला मुळींच माहीत नव्हते. निरनिराळया पंथांचे भेद पाडून कशी बशी बासष्ट ही संख्या भरून काढण्याचा त्याचा प्रयत्न दिसतो. बुद्धकाळीं जे पंथ अस्तित्वांत होते, ते सर्वच मोठ्या महत्त्वाचे होते असें वाटत नाहीं. दुसरें असें कीं, लहानसहान पंथ मोठ्या संप्रदायांत मिसळून गेले असावे, व जे किरकोळ पंथ होते, त्यांचे आचार विचार महत्त्वाचे नसावे. ब्रह्मजाल सुत्ताशिवाय इतर अनेक सुत्तांत सहा संघनायकांचीं नांवें वारंवार येत असतात. तेव्हां त्यांचे सहाच संघ बुद्धसमकाळीं अत्यंत महत्त्वाचे होते असें म्हणावें लागतें.

२४. ह्या सहा संघापैकीं एका संघाचा आचार्य पूरण कश्यप हा होता. तो म्हणे कीं, "एकाद्यानें कांहीं केलें अथवा करविलें, कापिलें किंवा कापविलें, त्रास दिला किंवा देवविला, शोक केला किंवा करविला, त्रास झाला अथवा दिला, भय वाटलें किंवा दुसऱ्यास भय दाखविलें, प्राण्यास ठार मारलें, चोरी केली, दरोडा घातला, एक घर लुटलें, वाटमारी केली, परदारागमन केलें, असत्य भाषण केलें, तरी त्यास पाप लागत नाहीं. तीक्ष्ण धारेच्या चक्रानें जरी एकाद्यानें या पृथ्वीवरील

1 सुत्तनिपात, सभियसुत्त, गाथा २९.

प्राण्यांची एक रास केली, एक ढीग केला, तरी त्यांत मुळींच पाप नाहीं.......गंगा नदीच्या उत्तर तीरावर जाऊन जरी एकाद्यानें दानें दिलीं व देवविलीं, यज्ञ केले अथवा करविले, तरी मुळींच पुण्य लागत नाहीं. दान, धर्म, संयम, सत्यभाषण यांच्या योगानें पुण्य लागत नाहीं." ह्या पूरण कश्यपाच्या वादाला **अक्रियवाद्** म्हणत.

२५. दुसऱ्या संघाचा आचार्य मक्खलि गोसाल हा होता. तो म्हणे, "प्राण्यांच्या अपवित्रतेस कांहींहि हेतु नाहीं, कांहींहि कारण नाहीं. हेतूशिवाय, कारणाशिवायच प्राणी अपवित्र होतात. प्राण्याच्या शुद्धीला कांहींहि हेतु नाहीं, कांहींहि कारण नाहीं. हेतूशिवायच, कारणाशिवायच प्राणी शुद्ध होतात. स्वतःच्या किंवा दुसऱ्याच्या सामर्थ्यानें कांहीं होत नाहीं. बळ, वीर्य, पुरुषार्थ किंवा पराक्रम नाहीं. सर्व प्राणी दुर्बळ व निर्वीर्य आहेत. ते नियति ( नशीब ), संगति व स्वभाव यांच्या योगानें परिणत होतात....शहाणे व मूर्ख चौऱ्याऐशीं लक्ष महाकल्पांच्या फेऱ्यांतून गेल्यावरच त्यांच्या दुःखाचा नाश होतो." ह्या मक्खलि गोसालाच्या मताला **संसारशुद्धिवाद्** म्हणत असत. याला **नियतिवाद्** पण म्हणतां येईल.

२६. तिसऱ्या संघाचा प्रमुख अजित केसकंबली हा होता. तो म्हणे, "दान, यज्ञ, होम हे कांहींहि नाहींत. चांगल्या-वाईट कर्मांचें फळ नाहीं. इहलोक नाहीं परलोक नाहीं...मनुष्य चार भूतांचा बनलेला आहे. जेव्हां तो मरतो तेव्हां त्याच्यामधील पृथ्वीधातु पृथ्वीस, आपोधातु पाण्यास, तेजोधातु तेजास, व वायुधातु वायूस जाऊन मिळतो; आणि इंद्रियें आकाशाप्रत जातात. मेलेल्या माणसास चार पुरुष तिरडीवर घालून वाटेंत त्याचे गुण गात गात श्मशानांत घेऊन जातात. तेथें त्याच्या

अस्थि पांढऱ्या होतात, व आहुति भस्मसात् होऊन जातात. दानाचें हें खूळ मूर्ख माणसांनी काढलें आहे. जे कोणी आस्तिक-वाद सांगतात, त्यांचें तें बोलणें निवळ खोटें आहे, व्यर्थ बडबड आहे. शहाणे व मूर्ख या दोघांचाहि शरीरभेदानंतर उच्छेद होतो. मरणानंतर त्यांचें कांहींहि रहात नाहीं." ह्या केसकंब-लीच्या मताला **उच्छेदवाद** म्हणत.

२७. चौथ्या संघाचा आचार्य पकुध कात्यायन हा होता. तो म्हणे कीं, "सात पदार्थ कोणीं केले किंवा करविले नाहींत. ते वंध्य, कूटस्थ व स्तंभाप्रमाणें अचल आहेत. ते हालत नाहींत; बदलत नाहींत; एकमेकांना त्रासदायक होत नाहींत; परस्परांना सुख-दुख देण्यास समर्थ नाहींत. पृथ्वी, आप, तेज, वायु, सुख, दुःख व जीव, हे ते सात पदार्थ होत. त्यांच्यांत मारणारा, मारविणारा, ऐकणारा, सांगणारा, जाणणारा किंवा जाणविणारा असा कोणी नाहीं. जो तीक्ष्ण शस्त्रांनी दुसऱ्याचें डोकें कापतो, तो खून करीत नाहीं. त्याचें तें शस्त्र सात पदार्थांच्या अवका-शांत शिरतें एवढेंच काय तें." ह्या मताला **अन्योन्यवाद** म्हणत.

२८. जैन संघाचा पुढारी निगण्ठ नाथपुत्र हा होता. तो वर दिलेले चार याम[1] प्रतिपादीत असे, व त्याच्या मताला **चातुर्यामसंवरवाद** म्हणत.

२९. सहाव्या मोठ्या संघाचा आचार्य संजय बेलट्ठपुत्र हा होता. तो म्हणे, "परलोक आहे किंवा परलोक नाहीं असें मला वाटत नाहीं. परलोक आहे असेंहि नाहीं, परलोक नाहीं असेंहि नाहीं...चांगल्या व वाईट कर्मांचें फल आहे असेंहि मला वाटत

---

[1] वि० २।२ व १० पहा.

नाहीं, नाहीं असेंहि मला वाटत नाहीं. तें असतेंहि असें नाहीं, किंवा नसतेंहि असें नाहीं. तथागत मरणोत्तर रहातो किंवा रहात नाहीं असें मला वाटत नाहीं. तो रहातोहि असें नाहीं व रहात नाहीं असेंहि नाहीं." या संजय बेलट्ठपुत्राच्या वादाला **विक्षेपवाद्** म्हणत.

३०. ह्या सहाहि संघांच्या पुढाऱ्यांच्या मतांत सांख्य-मताचा मागमूस दिसून येत नाहीं. पकुध कात्यायनाच्या मतांत जीव हा एक पदार्थ आहे. पण सांख्यमताप्रमाणें अनेक जीव आहेत, व ते प्रकृतीवर विरक्त झाले म्हणजे मुक्त होतात. "आत्मा मारणारा आहे असें जो मानतो, किंवा तो मारला जातो असें जो समजतो, त्या दोघांनाहि खरें ज्ञान नाहीं; हा मारीत नाहीं व मारलाहि जात नाहीं." ह्या भगवद्गीतेंत ( अ० २।१९ ) प्रतिपादिलेल्या मताशीं मात्र पकुध कात्यायनाचें मत बरोबर जुळतें. पण त्याचा संबंध सांख्य मताशीं नाहीं.

३१. कबंधी कात्यायन हाच पकुध कात्यायन आहे असें हेमचन्द्र रायचौधरी यांनी प्रतिपादिलें आहे.[१] सुकेशा भार-द्वाज, शैव्य सत्यकाम, सौर्यायणी गार्ग्य, कौशल्य आश्वलायन, भार्गव वैदर्भि आणि कबंधी कात्यायन, हे सहा तरुण ब्रह्मविद्या जाणण्याच्या हेतूनें पिप्पलाद ऋषीजवळ गेले. त्यांना ऋषि म्हणाला, "तुम्ही एक वर्षपर्यंत तपाचरणानें, ब्रह्मचर्यानें व श्रद्धेनें माझ्याजवळ रहा, आणि मग मला प्रश्न विचारा. मला माहीत असेल तें सर्व मी तुम्हाला सांगेन". एका वर्षानंतर ह्या सहा जणांनी ऋषीला सहा प्रश्न विचारले. त्या प्रश्नांचीं ऋषीनें उत्तरें दिलीं. ह्या प्रश्नोत्तरांना प्रश्नोपनिषद् म्हणतात.

---

१ Political History of Ancient India, p. 17.

३२. ह्यांत जो कबंधी कात्यायन आहे त्याच्याबरोबर असलेला आश्वलायन हाच मज्झिम निकायांतील अस्सलायन सुत्तांतील आश्वलायन होय, असें रायचौधरी यांचें म्हणणें. अस्सलायन जेव्हां बुद्धापाशीं गेला तेव्हां सोळा वर्षांचा होता (सोळसवस्सुद्देसिको जातिया). सोळा वर्षें त्याच्या मौंजी-बन्धनापासून धरलीं, तरी तो चोवीस किंवा पंचवीस वर्षांचा असूं शकेल. पण पकुध कात्यायन बुद्धापेक्षां वयानें थोर, आणि एका मोठ्या संघाचा पुढारी. तेव्हां तो व अस्सलायन हे दोघेहि एकाच वेळीं पिप्पलाद ऋषीजवळ गेले हें म्हणणें बरोबर नाहीं. दुसरें असें कीं, कबंधी कात्यायनानें विचारलेल्या प्रश्नाचा व पिप्पलाद ऋषीनें त्याला दिलेल्या उत्तराचा पकुध कात्यायनाच्या मताशीं कांहीं एक संबंध नाहीं. तेव्हां पकुध कात्यायन व कबंधी कात्यायन हे एक नव्हत हें सांगणें नलगे.

३३. वेदविधीला कंटाळून जे तापसी अरण्यांत रहात, व ज्यांना निवापसुत्तांत दुसऱ्या कळपांतील मृगांची उपमा दिली आहे, अशा तापसी संघांपासूनच हे सहा संघ निर्माण झाले. अर्थात् वेदविधीला विशेषतः यज्ञयागांना विरोध करण्यांत या सगळया संघांत एकवाक्यता होती. दुसरी गोष्ट ही कीं, कमी-जास्त प्रमाणानें ते तपाचरण करीत, व गृहबंधनांत बद्ध होत नसत. सामान्य लोकाचें हित व्हावें हेंहि त्यांचें ध्येय असे. पण त्यांच्यांतील मुख्य उणीव म्हटली म्हणजे ते आत्मवादांत शिरत. त्यांपैकीं कांहीं आत्मा शाश्वत आहे असें मानीत, व कांहीं आत्मा मुळींच नाहीं असें समजत; आणि त्यामुळें त्यांच्यांत वाद उपस्थित होत असत. अशा एका प्रसंगाचें वर्णन उदानांत[१]

---

१ उदान, जच्चंध वग्ग, सुत्त ४.

आलें आहे. त्यांत बुद्धानें अशा श्रमणांना जात्यंधांच्या हस्तिवर्णनाची उपमा लागू केली आहे; व निवापसुत्तांत त्यांना तिसऱ्या कळपांतील मृगांची उपमा लावली आहे.

३४. या सहाहि संघांपैकीं आजला जैन संघाची तेवढी थोडीबहुत माहिती उपलब्ध आहे. पूरण कश्यपाचा अक्रियवाद व मक्खलि गोसालाचा नियतिवाद हे दोन्हीहि कालान्तरानें एक झाल्याचा दाखला अंगुत्तर निकायाच्या छक्कनिपातांत ( सुत्त ५७ ) सांपडतो. परन्तु त्यानन्तर दोन्ही पंथ नामशेष होऊन गेले. संजय बेलट्ठपुत्राचें तत्त्वज्ञान जैनांच्या स्याद्वादांत परिणत झालें असावें. हें तत्त्वज्ञान जैनांनी स्वीकारल्यावर त्याचा निराळा संघ असण्याचें कारण राहिलें नाहीं. उच्छेदवादाचा कांहींसा अंश सर्वदर्शनसंग्रहांत राहिला आहे, व त्याला चार्वाकमत म्हणतात. ह्या मताविषयीं आजकाल फारसा आदर राहिलेला नाहीं. तथापि एका काळीं तें प्रभावशाली होतें, व त्या मतापासूनच अर्थशास्त्रासारखे ग्रंथ निर्माण झाले. चाणाक्याच्या वेळीं कांहीं आचार्य ह्याच लोकायत विद्येला फार महत्त्व देत असत. चाणाक्यानें सांख्य, योग व लोकायत ह्या तिहींनाहि आन्वीक्षकी विद्या म्हटलें आहे.[१]

३५. पकुध कात्यायनाचा 'अन्योन्यवाद' आजकाल अस्तित्वांत असलेल्या वैशेषिक शास्त्रांत परिणत झाला असावा. पण त्याच्या संघानें महत्वाची कामगिरी बजावली असेल असें वाटत नाहीं. ह्या सर्व संघांच्या श्रमणसंस्कृतींतून अत्यन्त उज्वल असें जें मत निघालें, तें शाक्यपुत्र श्रमणाचें मत होय. त्याचा आतां थोडक्यांत विचार करूं.

---

१ सांख्यं योगो लोकायतं चेत्यान्वीक्षकी । अर्थशास्त्र, प्रक. १ अ० २.

# बुद्धाची संक्षिप्त माहिती

३६. बुद्धाची पुष्कळशी माहिती अलिकडे सामान्य जनांनाहि उपलब्ध झाली आहे. तथापि 'बुद्धचरितकाव्य' व 'ललितविस्तार' ह्या दोन ग्रन्थांच्या आधारानें बहुतेक बुद्धचरित्रें लिहिलीं गेलीं असल्यामुळें बुद्ध हा एका मोठ्या राजाचा मुलगा होता इत्यादिक दंतकथांपासून तीं अगदीं अलिप्त नाहींत. तेव्हां पालिग्रन्थांच्या आधारें बुद्धचरित्रासंबंधींची संक्षिप्त माहिती येथें देणें योग्य वाटतें.

३७. कोसल देशाच्या उत्तरेला शाक्य नांवाच्या क्षत्रियांचें एक लहानसें गणसत्ताक राज्य होतें. त्यावेळीं अशा प्रकारचीं तीन चार राज्यें अस्तित्वांत होतीं. ह्या गणसत्ताक राज्यांत परंपरागत राजसत्ता नसे. गांवोगांवचे अधिकारी जमीनदार असत. त्यांना राजा म्हणत. ते एकत्र होऊन एक अध्यक्ष निवडीत. या अध्यक्षाला महाराजा म्हणत. तो अमुकच वर्षांपुरता निवडला जात असे असें नाहीं. जोंपर्यंत सर्व राजांची संमति त्याला मिळे, तोंपर्यंत तो अध्यक्षाचें काम करी; नाहींतर दुसरा अध्यक्ष निवडला जात असे. महत्त्वाच्या कामांत सर्व राजसंघाची संमति घेण्यांत येत असे, व इतर कामें हा अध्यक्ष व सेनापति वगैरे अधिकारी पाहत असत.

३८. बुद्धजन्मापूर्वींच कपिलवस्तूच्या शाक्यांचें स्वातंत्र्य संपुष्टांत येत चाललें होतें. त्यांना एक प्रकारचें 'होमरूल' असे. पण एकाद्याला फांशी देण्याचा किंवा हद्दपार करण्याचा अधिकार राहिला नव्हता. त्यासाठीं कोसल महाराजाची परवानगी घ्यावी लागत असे. मगध देशाच्या पूर्वेकडील अंग राजांचीहि हीच स्थिति होती. त्यांचा अंतर्भाव मगध देशांतच होत होता.

काशी देशाचेंहि स्वातंत्र्य नष्ट होऊन त्याचा अन्तर्भाव कोसल देशांत झाला होता. पावा व कुशिनारा येथील मल्लांचीं व वैशाली येथील वज्जींचें अशीं तीन गणसत्ताक राज्यें मात्र अद्यापि स्वतंत्र राहिलीं होतीं. कोसल देशांत व मगध देशांत सार्वभौम राज्यपद्धति दृढ होत चालली होती.

३९. अशा परिस्थितींत कपिलवस्तूपासून चौदा पंधरा मैलांच्या अंतरावर असलेल्या शुद्धोदन (जमीनदार) राजाच्या मायादेवी नांवाच्या राणीच्या उदरीं गोतमाचा (बुद्धाचा) जन्म झाला. बुद्धचरितकाव्यांत व ललितविस्तारांत त्याला सर्वार्थसिद्ध किंवा सिद्धार्थ हीं नांवें दिलीं आहेत. पण तीं प्राचीन पालिग्रंथांत मुळींच सांपडत नाहींत. सर्व ठिकाणीं त्याला गोतम हेंच नांव देण्यांत आलें आहे, व तेंच त्याचें खरें नांव असावें.

४० बोधिसत्त्व ( म्हणजे भावी बुद्ध ) ह्याहि नांवानें पालि-ग्रंथांत गोतमाचा उल्लेख आहे. पुढें जेव्हां तो बुद्ध झाला तेव्हां-पासून त्याला भगवान् म्हणूं लागले. बोधिसत्त्वाला तीन ऋतूंत रहाण्याला तीन घरें होतीं असें वर्णन अंगुत्तर निकायांत सांप-डतें. तसें असणें शक्य आहे. कां कीं, शुद्धोदन राजा जरी मोठा राजा नसला, तरी एक सधन जमीनदार होता.

४१. अंगुत्तर निकायांत तिकनिपातांत बुद्ध भगवान् भिक्षूंना उद्देशून म्हणतो, "भिक्षुहो, मी फार सुकुमार होतों. माझ्या सुखासाठीं माझ्या पित्यानें तलाव खणून त्यांत नाना-जातींच्या कमळिणी लावल्या होत्या. माझीं वस्त्रें-प्रावरणें रेशमी असत. शीतोष्णाची बाधा न व्हावी म्हणून बाहेर निघालों असतां माझ्यावर माझे नोकर श्वेतच्छत्र धरीत असत. हिंवा-ळ्यासाठीं, उन्हाळ्यासाठीं व पावसाळ्यासाठीं माझे निरनिराळे तीन प्रासाद होते. मी जेव्हां पावसाळ्यासाठीं बांधलेल्या महा-

लांत रहाण्यास जात असें, तेव्हां चार महिने बाहेर न पडतां स्त्रियांच्या गीतांनी व वाद्यांनी कालक्रमण करीत असें. इतरांच्या घरीं दासांना आणि नोकरांना निकृष्ट अन्न देतात. परंतु माझ्या घरीं माझ्या दासदासींना उत्तम मांसमिश्रित अन्न मिळत असे.

४२. "अशा संपत्तीचा उपभोग घेत असतां माझ्या मनांत असा विचार आला कीं, अविद्वान् सामान्य जन स्वतः जरेच्या तडाक्यांत सांपडणारा असून, जराग्रस्त म्हाताऱ्या माणसाकडे पाहून कंटाळतो व त्याचा तिरस्कार करतो ! परंतु मी स्वतः जरेच्या तडाक्यांत सांपडणारा असून त्या सामान्य माणसाप्रमाणें जराग्रस्ताला कंटाळलों किंवा त्याचा तिरस्कार केला, तर तें मला शोभणार नाहीं. ह्या विचारानें माझा तारुण्य-मद समूळ नाहींसा झाला.

४३. "अविद्वान् सामान्य जन स्वतः व्याधीच्या तडाक्यांत सांपडणारा असून व्याधिग्रस्त माणसाला पाहून कंटाळतो व त्याचा तिरस्कार करतो ! परंतु मी स्वतः व्याधीच्या तडाक्यां-तून सुटलों नसतां त्या सामान्य जनाप्रमाणें व्याधिग्रस्ताला कंटाळलों किंवा त्याचा तिरस्कार केला, तर तें मला शोभणार नाहीं. ह्या विचारानें माझा आरोग्यमद समूळ नष्ट झाला.

४४. "अविद्वान् सामान्य जन स्वतः मरणधर्मी असून मृत शरीर पाहून कंटाळतो व त्याचा तिरस्कार करतो ! परंतु मी स्वतः मरणधर्मी असून त्या सामान्य जनाप्रमाणें प्रेताला कंटाळलों किंवा त्याचा तिरस्कार केला, तर तें मला शोभणार नाहीं. ह्या विचारानें माझा जीवितमद समूळ नष्ट झाला."

४५. ह्या सुत्तावरून असें दिसून येतें कीं, बोधिसत्त्वाच्या मनांत जरा, व्याधि आणि मरण ह्या तीन आपत्तींचे विचार

वारंवार येत असत. वृद्ध, व्याधित आणि मृत मनुष्याला पाहून त्यानें गृहत्याग केला, ही जी दंतकथा आहे ती देखील या सुत्तावरून खोटी ठरते. श्रमणाचे मोठमोठाले संघ मगध व कोसल देशांत धर्मसंचार करीत फिरत असतां बोधिसत्त्वाला धार्मिक जीवनाची माहिती नसावी, हें संभवनीय नाहीं.

४६. गृहस्थाश्रमांत असतांना आपणाला वैराग्य कसें झालें हें बुद्ध भगवंतानें सुत्तनिपातांतील अत्तदंड सुत्तांत सांगितलें आहे. भगवान् म्हणतो, "अपुऱ्या पाण्यांत मासे जसे तडफडतात, त्याप्रमाणें परस्पराशीं विरोध करून तडफडणाऱ्या जनतेला पाहून माझ्या अन्तःकरणांत भय शिरलें! चारी बाजूंना जग असार वाटूं लागलें. दिशा कांपत आहेत असा भास झाला! त्यांत आश्रयाची जागा शोधीत असतां मला निर्भय स्थान सांपडेना. शेवटपर्यंत सर्व जनता परस्पराशीं विरुद्ध झालेलीच दिसून आल्यामुळें माझें मन उद्विग्न झालें."

४७. जरा-व्याधि-मरणाचा विचार बोधिसत्त्वाच्या मनांत वारंवार घोळत होता यांत शंका नाहीं. परन्तु तें त्याच्या वैराग्याचें मुख्य कारण नव्हे. जरा-व्याधि-मरणांनी बद्ध झालेली जनता परस्पराशीं द्वेष करून एकसारखी भांडत आहे, हें पाहून त्याला अत्यंत वैराग्य आलें. लोकांत व्यवस्था स्थापण्यासाठीं राज्यपद प्राप्त करून घेतलें तरी विरोधापासून मनुष्य मुक्त होत नाहीं. राजाचे मुलगेच राजाला मारून राज्यपद मिळवूं पहातात! अर्थात् लहानसहान माणसापासून तहत सर्वाधिकारी राजापर्यंत विरोधापासून कोणीहि मुक्त नाहीं. तेव्हां क्षत्रियांच्या परंपरेंत गोतमाला निर्भय जागा सांपडली नाहीं यांत आश्चर्य कोणतें?

४८. प्रपंचाचा त्याग करून परिव्राजक होणारे पुष्कळ

क्षत्रिय त्या काळीं होते. वर सांगितलेला जैनांचा गुरु नाथपुत्र हा पण एका मोठ्या क्षत्रिय राजाचा ( जमीनदाराचा ) मुलगा होता. बोधिसत्त्वाचे पहिले गुरु आडार कालाम व उद्रक रामपुत्र हे देखील क्षत्रियच होते. तेव्हां बोधिसत्त्वानें अशा एकाद्या पंथांत शिरून आपणासाठीं निर्भय स्थान शोधून काढण्याचा निश्चय केला असला पाहिजे.

४९. आडार कालामाचा आश्रम कपिलवस्तूमध्यें होता ह्याला पुरावा याच तिकनिपातांत सांपडतो. "एके समयीं भगवान् कोसल देशांत प्रवास करीत करीत कपिलवस्तूला आला. तो आल्याचें वर्तमान ऐकून महानाम शाक्यानें त्याची भेट घेतली. तेव्हां महानामाला त्यानें आपल्याला एक रात्र रहाण्यासाठीं जागा पहाण्यास सांगितलें. परंतु भगवंताला रहाण्यासाठीं योग्य जागा महानामाला कोठेंच सांपडली नाहीं. परत येऊन तो भगवंताला म्हणाला, 'भदन्त आपणासाठीं योग्य जागा मला सांपडत नाहीं. आपला पूर्वीचा सब्रह्मचारी भरण्डु कालाम याच्या आश्रमांत आपण एक रात्र रहा.' भगवंतानें महानामाला तेथें आसन तयार करावयास सांगितलें, व तो त्या रात्रीं त्या आश्रमांत राहिला.

५०. "दुसऱ्या दिवशीं सकाळीं महानाम भगवंताच्या भेटीला गेला. तेव्हां भगवान् त्याला म्हणाला, 'या लोकीं, हे महानाम, तीन प्रकारचे धर्मगुरु आहेत. पहिला कामोपभोगांचा समतिक्रम ( त्याग ) दाखवितो, पण रूपांचा आणि वेदनांचा समतिक्रम दाखवीत नाहीं. दुसरा कामोपभोगांचा व रूपांचा समतिक्रम दाखवितो, पण वेदनांचा समतिक्रम दाखवींत नाहीं. तिसरा ह्या तिहींचाहि समतिक्रम दाखवितो. ह्या धर्मगुरूंचे ध्येय एक आहे कीं भिन्न आहे ?

५१. "त्यावर भरण्डु कालाम म्हणाला, 'हे महानाम, ह्या सर्वांचें ध्येय एकच आहे असें म्हण.' पण भगवान् म्हणाला, 'महानाम, त्यांचें ध्येय भिन्न आहे असें म्हण.' दुसऱ्यांदा व तिसऱ्यांदाहि भरण्डूनें त्यांचें एकच ध्येय असें म्हणण्यास सांगितलें; व भगवंतानें त्यांचीं ध्येयें भिन्न आहेत असें म्हणण्यास सांगितलें. महानामासारख्या प्रभावशाली शाक्यासमोर श्रमण गोतमानें आपला उपमर्द केला असें वाटून भरण्डु कालाम जो कपिलवस्तूहून चालता झाला, तो कधींहि परत आला नाहीं." [१]

५२. ह्या सुत्तावरून बऱ्याच गोष्टींचा उलगडा होतो. त्यांत पहिली गोष्ट ही कीं, कालाम ऋषीचा आश्रम कपिलवस्तु येथें होता, व त्याचा योगमार्ग शाक्य राजांना चांगला माहीत होता. दुसरी गोष्ट ही कीं, बोधिसत्त्व गोतम कपिलवस्तूच्या महाराजाचा मुलगा नव्हता. तसें असतें तर खुद्द त्याच्या पित्याच्या राजधानींत एक रात्र रहाण्याला त्याला खात्रीनें जागा मिळाली असती. तिसरी गोष्ट ही कीं, बुद्ध झाल्यानंतर भगवान् मोठ्या भिक्षुसंघासह कपिलवस्तूला आला नाहीं. म्हणजे भिक्षुसंघ गोळा करण्यास त्याला बरींच वर्षें लागलीं. चौथी गोष्ट ही कीं, आरंभीं आरंभी शाक्य राजांत त्याची किंवा त्याच्या धर्माची चहा झाली नाहीं; एका तेवढ्या महानाम शाक्यानेंच त्याचें अभिनंदन केलें.

५३. ह्यांत मुख्य मुद्दा हा कीं, बुद्धाला धर्मज्ञान प्राप्त करून घेण्यासाठीं शाक्य देशांतून मगधांच्या राजधानीला ( राजगृहाला ) जाण्याचें कांहीं कारण नव्हतें. आणि तो प्रथमतः राजगृहाला गेलाहि नाहीं. त्यानें आळार कालामाच्या श्रमणसंप्रदायांत कपिलवस्तु येथेंच प्रवेश केला.

---

१ अंगुत्तरनि० पण्णासक ३, वग्ग ३, सुत्त ४.

५४. भिक्षु होण्यापूर्वी आडार कालामानें उपदेशिलेल्या ध्यानांचा तो अभ्यास करीत होता, याला आधार मज्झिम निकायांतील महासच्चक सुत्तांत सांपडतो. भगवान् म्हणतो, "माझ्या बापाबरोबर शेतांत गेलों असतां जंबुवृक्षाच्या छायेंत बसून प्रथम ध्यानाची समाधि साधल्याची मला आठवण आहे." यावरून असें दिसतें कीं, गृहस्थाश्रमांत असतांनाच बोधिसत्त्व आडार कालामाचा शिष्य झाला होता, व त्यानें उपदेशिलेल्या ध्यानांचा अभ्यास करीत होता.

५५. अरियपरियेसन सुत्तांत पुढील मजकूर आढळतो. "भिक्षुहो, मी देखील संबोधिज्ञान होण्यापूर्वी बोधिसत्त्वावस्थेंत स्वतः जन्मधर्मी असतांना जन्माच्या फेऱ्यांत सांपडलेल्या वस्तूंच्या ( पुत्र, दारा, दास, दासी इत्यादिकांच्या ) मोहांत सांपडलों होतों. स्वतः जराधर्मी, व्याधिधर्मी, मरणधर्मी, शोकधर्मी असतांना जरा, व्याधि, मरण, शोक यांच्या फेऱ्यांत सांपडलेल्या वस्तूंच्या मोहांत सांपडलों होतों. तेव्हां माझ्या मनांत असा विचार आला कीं, मी स्वतः जन्म, जरा, मरण, व्याधि, शोक यांनी बद्ध असतां त्यांनीच बद्ध जे पुत्रदारादिक त्यांच्या मागें लागलों आहें हें ठीक नव्हे. जन्मजरादिकांनी होणारी हानि पाहून अजात, अजर, अव्याधि, अमर आणि अशोक असें जें परमश्रेष्ठ निर्वाणपद त्याचा शोध लावणें योग्य आहे.

५६. "भिक्षुहो, असा विचार करीत असतां कांहीं काळानें, जरी मी त्यावेळीं तरुण होतों, माझा एकहि केस पिकला नव्हता, भरज्वानींत होतों, आणि माझे आईबाप मला परवानगी देत नव्हते, डोळ्यांतून निघणाऱ्या अश्रुप्रवाहानें त्यांचीं मुखें भिजलीं होतीं, ते सारखे रडत होते, तरी ( त्याची परवा न

करतां ) शिरोमुंडन करून, काषाय वस्त्रांनी देह आच्छादून घरांतून बाहेर पडलों व परिव्राजक झालों."

५७. हें शब्दशः भाषांतर नाहीं. पुनरुक्ति गाळून तात्पर्य दिलें आहे. बोधिसत्त्वाची आई मायादेवी बोधिसत्त्व जन्मल्यावर सातव्याच दिवशीं परलोकवासी झाली; व तिच्या बहिणीनें, महाप्रजापतीनें बोधिसत्त्वाचें पुत्रवत् पालन केलें. ती बोधिसत्त्वाची मावशी असून सावत्र आईहि होती. म्हणून येथें महाप्रजापतीलाच आई म्हटलें आहे. यावरून हें सिद्ध होतें कीं बोधिसत्त्व कोणाला नकळत पळून गेला नाहीं. आईबापांना सांगून त्यांच्या इच्छेविरुद्धच त्यानें संन्यास घेतला.

५८. गृहत्याग केल्यानंतर तो आडार कालामापाशीं राहिला, व त्याच्या योगमार्गाचा त्यानें अभ्यास केला, हें वरील भरण्डु कालाम सुत्तावरून स्पष्ट होत आहे. कालामापासून जें शिकणें शक्य होतें तें शिकून झाल्यावर तो उद्रक रामपुत्रापाशीं गेला. त्यानें बोधिसत्त्वाला योगाची आणखी एक पायरी शिकवली. हे दोघेहि योगी गुरु कोसल देशांत व त्याच्या आसपासच्या प्रदेशांत प्रसिद्ध होते. परंतु वर निर्देशलेले मोठाले संघनायक वज्जींच्या आणि मगधांच्या देशांत आपल्या धर्माचा प्रसार करीत असत. त्यांची कीर्ति काशी, कोसल इत्यादि देशांतहि पसरली होती. अर्थात् अशा गुरूंच्या तत्त्वज्ञानांचें रहस्य जाणण्यासाठीं बोधिसत्त्व राजगृहाला गेला. तेथें त्यानें कोणत्याहि मोठ्या धर्मगुरूंपाशीं अभ्यास केला नाहीं, तरी त्यांच्या शिष्यांकडून त्यांच्या तत्त्वज्ञानाची माहिती मिळवली असलीच पाहिजे. पण त्यांच्या तत्त्वज्ञानांनी त्याचें समाधान झालें नाहीं; व खडतर तपश्चर्या केल्याशिवाय धर्माचें रहस्य आपणास समजणार नाहीं, अशी त्याची समजूत झाली.

५९. बोधिसत्त्वानें आपल्या तपश्चर्येला सुरुवात गयेपाशीं केली. सध्या जिला फल्गु म्हणतात, त्याच नदीला पूर्वी नेरंजरा म्हणत असत. सध्या उन्हाळ्यांत या नदींत पाणी मुळींच रहात नाहीं. पण बुद्धकाळीं तिचा प्रवाह सुन्दर असून आजूबाजूचा प्रदेश फार रमणीय होता. तेथें बोधिसत्त्वाला आणखी पांच तपस्वी भिक्षु भेटले. त्या सर्वांनी मिळून तपश्चर्येला आरम्भ केला.

६०. गृहत्याग केल्यानंतर सात वर्षेपर्यन्त कोणत्याना कोणत्या प्रकारें बोधिसत्त्वाची तपश्चर्या चालूच होती. परन्तु तत्त्वबोधाचा खरा मार्ग त्याला सांपडला नाहीं. तेव्हां त्याच्या मनांत विचार आला कीं, 'ह्या तपश्चर्येनें लोकोत्तर धर्मज्ञान प्राप्त होईल असें मला वाटत नाहीं. ह्याहून दुसरा कोणता तरी निर्वाणाचा मार्ग असावा. ( घर सोडण्यापूर्वी ) बापाबरोबर शेतांत गेलों असतां जंबुवृक्षाच्या सावलींत प्रथम ध्यानाची समाधि साधल्याची मला आठवण आहे.[1] तोच तर निर्वाणाचा मार्ग नसेल ना ?' ह्या गोष्टीचें स्मरण झाल्याबरोबर बोधिसत्त्वाला तोच खरा मार्ग असावा असें वाटूं लागलें. तो आपल्याशींच म्हणाला, 'त्या समाधिसुखाला मी कां भितों ? ते चैनीचें सुख नाहीं, किंवा पापकारकहि नाहीं. अशा सुखाला भितां कामा नये. परंतु या दुर्बल देहानें तें सुख साध्य होणार नाहीं. तेव्हां देहाचें संरक्षण करण्यापुरतें अन्न खाल्लें पाहिजे.'

६१. त्यानंतर बोधिसत्त्व[2] देह संरक्षणाला लागणारें योग्य अन्न सेवन करूं लागला. तें पाहून त्याच्याबरोबर असलेल्या

---

१ वि० २।५४ पहा.

२ मज्झिम नि० महासच्चक सुत्त.

पांच भिक्षूंची निराशा झाली. श्रमण गोतम ढोंगी बनला असें वाटून ते त्याला सोडून चालते झाले. तपश्चर्येमुळें बोधिसत्त्वाच्या अंगीं मुळींच त्राण राहिलें नव्हतें. परंतु बेताबातानें आहारसेवन केल्यानें त्याच्या अंगीं शक्ति आली, व तो समाधिसुखाचा अनुभव घेऊं लागला.

## बुद्धाचा मध्यम मार्ग

६२. सध्या ज्याला आपण बुद्धगया म्हणतों, तेथें ध्यानसमाधीचा अनुभव घेत असतां बोधिसत्त्वाला तत्त्वबोधाचा नवा मार्ग सांपडला. तो लोकांना उपदेशावा कीं नाहीं, ह्याविषयीं बोधिसत्त्वाच्या मनांत बरेच साधकबाधक विचार आले. शेवटीं तो मार्ग सर्व लोकांस दाखवून देण्याचा त्याचा बेत ठरला. आडार कालाम व उद्रक रामपुत्र ह्या दोघांना त्या मार्गाचा बोध तात्काळ झाला असता. परंतु ते नुकतेच परलोकवासी झाले होते. रहातां राहिले त्याच्या बरोबर तपश्चर्या करणारे पांच भिक्षु. त्यावेळीं ते वाराणसीला ऋषिपत्तनांत[१] रहात असत. त्यांना गांठण्यासाठीं बुद्ध भगवान् प्रवास करीत करीत वाराणसीला आला; व मोठ्या प्रयत्नानें त्या पांच भिक्षूंची त्यानें खात्री करून दिली कीं, आपण शोधून काढलेला तत्त्वबोधाचा खरा मार्ग आहे.

६३. भगवंतानें या पांच भिक्षूंना उपदेश केला तो असा— "भिक्षुहो, धार्मिक मनुष्यानें या दोन अंताना जाऊं नये. ते दोन अंत कोणते ? पहिला कामोपभोगांत सुख मानणें. हा अंत हीन, ग्राम्य, सामान्यजनसेवित, अनार्य आणि अनर्थावह आहे.

---

१ यालाच सध्या सारनाथ म्हणतात.

दुसरा अंत देहदंडन करणें. हा दुःखकारक, अनार्य व अनर्थावह आहे. या दोन अंतांना न जातां तथागतानें सुदृष्टि व ज्ञान उत्पन्न करणारा, उपशमाला, प्रज्ञेला, संबोधाला आणि निर्वाणाला कारणीभूत होणारा मध्यम मार्ग शोधून काढला आहे. तो कोणता? सम्यक् दृष्टि, सम्यक् संकल्प, सम्यक् वाचा, सम्यक् कर्मान्त, सम्यक् आजीव, सम्यक् व्यायाम, सम्यक् स्मृति, सम्यक् समाधि, हा तो आर्य अष्टांगिक मार्ग होय.

६४. "भिक्षुहो, दुःख नांवाचें पहिलें आर्यसत्य हें आहे. जाति (जन्म) दुःखकारक आहे, जरा दुःखकारक आहे, व्याधीहि दुःखकारक आहे, मरणहि दुःखकारक आहे; शोक, परिदेव, दुःख, दौर्मनस्य, उपायास हेहि दुःखकारक आहेत. अप्रियांचा समागम दुःखकारक आहे, व प्रियांचा वियोग दुःखकारक आहे. इच्छिलेली वस्तु मिळत नसली म्हणजे तेणेंकरूनहि दुःख होतें. संक्षेपानें पांच उपादानस्कंध दुःखकारक आहेत.[१]

६५. "भिक्षुहो, पुनः पुनः उत्पन्न होणारी आणि अनेक विषयांत रमणारी तृष्णा,—जिला कामतृष्णा, भवतृष्णा आणि विनाशतृष्णा म्हणतात ती—दुःखसमुदय नांवाचें दुसरें आर्यसत्य होय.

६६. "त्या तृष्णेचा वैराग्यानें पूर्ण निरोध करणें, त्याग करणें, तिच्यापासून मुक्ति मिळवणें, हें दुःखनिरोध नांवाचें तिसरें आर्यसत्य होय.

---

१ रूप, वेदना, संज्ञा, संस्कार व विज्ञान या पांच पदार्थांना पंचस्कंध असें म्हणतात. हे पांच स्कंध वासनायुक्त असले म्हणजे त्यांना उपादानस्कंध असें म्हणतात. विशेष माहितीसाठीं 'बुद्ध, धर्म आणि संघ' परिशिष्ट २ पहा.

६७. "आणि ( वर सांगितलेला ) आर्य अष्टांगिक मार्ग हें दुःखनिरोधगामिनी प्रतिपदा नांवाचें चौथें आर्यसत्य होय."

# बुद्धाच्या व पार्श्वाच्या उपदेशाची तुलना

६८. वर जे श्रमणांचे सहा पंथ सांगितले त्यांच्या तत्त्वज्ञानापासूनच हा बुद्धाचा मध्यम मार्ग निघाला आहे. वैदिक ब्राह्मण यज्ञयागांमुळेंच मोक्ष मिळतो असें प्रतिपादन करीत. यज्ञ करून मांसाहार करणें व सोमरस पान करणें हाच त्यांचा प्रधान मार्ग होता. त्या मार्गाला कंटाळून जे परिव्राजक रानांवनांतून रहात असत ते देह दंडनांतच सर्वस्व आहे असें समजत. अशा परिव्राजकांतूनच वरील मोठमोठाले सहा पंथ निघाले असले, तरी उच्छेदवादी अजित केसकंबली तपश्चर्येला मुळींच मानीत नसे. यज्ञांत पशुहिंसा करणें हें अत्यंत अडाणीपणाचें असलें, तरी शरीर पुष्ट करण्यासाठीं मद्यमांसादिकांचें सेवन करण्यास हरकत नाहीं असें त्याचें म्हणणें असावें. बुद्ध भगवंतानें वैदिक ब्राह्मणांचा आणि केसकंबलीसारख्या देहात्मवादी तत्त्वज्ञांचा पहिल्या अंतांत समावेश केला आहे. यज्ञयागादिकांनी असो, अथवा यज्ञयागांवाचून असो, चैनीच्या पदार्थांत सुख मानणें हा मार्ग ( अंत ) हीन व ग्राम्य आहे. त्याचप्रमाणें निर्ग्रंथांचा व मक्खलि गोसालादिकांचा तपश्चर्येचा मार्ग ( अन्त ) जरी हीन आणि ग्राम्य नसला, तरी दुःखकारक व अनर्थावह आहे. म्हणजे त्याच्यापासून कोणालाच कांहीं फायदा नाहीं. अर्थात् हे दोन्ही अंत त्याज्य ठरतात.

६९. आचरणांत जसा मध्यम मार्ग दोन अंतांच्या मधून जातो तशी तत्त्वज्ञानांत चार आर्यसत्यांची विचारसरणी दोन

अंतांच्या मधून जाणारी आहे. एका बाजूला देह हा आत्मा समजून त्याची पुष्टी करणें हेंच परमश्रेयस्कर मानणारें तत्त्वज्ञान, व दुसऱ्या बाजूला आत्मा अमर आहे, तो कशानेंहि भ्रष्ट होत नाहीं, किंवा देहदंडनादिकांनी त्याला मुक्त केलें पाहिजे इत्यादिक तत्त्वज्ञानें, या दोन्ही अंतांच्या मधला मार्ग म्हटला म्हणजे चार आर्यसत्यें होत. ( १ ) जगांत दुःख आहे, आणि ( २ ) तें आत्म्यानें किंवा दुसऱ्या कोणीतरी उत्पन्न केलेलें नसून मनुष्याच्या तृष्णेनें उत्पन्न झालेलें आहे. ( ३ ) या तृष्णेचा सर्वथैव त्याग करणें हाच मोक्ष. ( ४ ) तो त्याग इतरांशीं समत्वानें वागल्यानेंच होणारा आहे. इतरांशीं समत्वानें कसें वागावें हेंच अष्टांगिक मार्ग शिकवतो, व हेंच चौथें आर्यसत्य आहे.

७०. पार्श्वाच्या चातुर्यामांत आणि बुद्धाच्या अष्टांगिक मार्गांत थोडा फरक आहे. अहिंसेच्या योगानें मानवजातीशीं तादात्म्य पावणें हें दोघांचेंहि ध्येय आहे. तथापि पार्श्वाचे चारीहि नियम निषेधात्मक आहेत; व ते देखील तपश्चर्येंत मिसळून गेले आहेत. बुद्धाचे आठ नियम विधायक आहेत, व तपश्चर्येपासून मोकळे आहेत. सम्यक् कर्म ह्यांत अहिंसेचा अन्तर्भाव होतो एवढेंच नव्हे, तर अस्तेय आणि अव्यभिचार यांचाहि त्यांत समावेश होतो; व पुनः हिंसा करावयाची नाहीं एवढेंच नव्हे, तर हिंसेपासून जनतेला मुक्त करण्याच्या प्रयत्नाचाहि त्यांत समावेश होतो. चोरी करावयाची नाहीं एवढेंच नव्हे, तर इतरांनाहि चोरीपासून निवृत्त करण्याचा प्रयत्नाचा, व्यभिचारापासून निवृत्त व्हावयाचें एवढेंच नव्हे, तर त्यापासून इतरांनाहि निवृत्त करण्याच्या प्रयत्नाचा सम्यक् कर्मांत समावेश होतो. ह्यांत पार्श्वाच्या अहिंसा आणि अस्तेय या दोन यामांचा समावेश होतो, हें सांगावयास नकोच.

७१. असत्य भाषण स्वतः करावयाचें नाहीं व दुसऱ्यालाहि त्यापासून निवृत्त करावयाचें, चहाडी करावयाची नाहीं व इतरांनाहि तिजपासून निवृत्त करावयाचें, शिवीगाळ करावयाची नाहीं व इतरांनाहि तिजपासून निवृत्त करावयाचें, वृथा-प्रलाप करावयाचा नाहीं व इतरांनाहि त्यापासून निवृत्त करावयाचें, ह्याला सम्यक् वाचा म्हणतात. ह्या अंगांत पार्श्वाच्या असत्यविरतीचा समावेश होतो हें स्पष्टच आहे.

७२. रहातां राहिला अपरिग्रह हा चौथा याम. त्याचा समावेश सम्यक् आजीवांत केला पाहिजे. पार्श्व व पार्श्वाचे शिष्य एक किंवा तीन वस्त्रें बाळगीत असत. परंतु पुढें ह्या अपरिग्रहाचा अर्थ असा झाला कीं, कोणतेंहि वस्त्र जवळ बाळगावयाचें नाहीं. त्याला अनुसरून बुद्धसमकालीन जैन पंथाचे पुरस्कर्ते महावीर स्वामी व तदनुयायी जैन साधु नागवे रहात असत. परन्तु बुद्धाला तें पसंत नव्हतें. साधूंनी तीन चीवरें व भिक्षापात्र बाळगावें, आणि गृहस्थानेंहि अत्यन्त साधेपणानें वागावें, याची बुद्ध भगवान् सम्यक् आजीवांत गणना करीत असे. याशिवाय कोणत्याहि हिंसात्मक किंवा अपायकारक पद्धतीनें उपजीविका करावयाची नाहीं, याचाहि अन्तर्भाव सम्यक् आजीवांत होतो.

७३. याप्रमाणें पार्श्वाच्या चार यामांचा समावेश अष्टांगिक मार्गाच्या तीन अंगांत झाला आहे; व बाकी राहिलेलीं पांच अंगेंहि अहिंसेला पोषक अशींच आहेत. त्यांचा यथाक्रम थोडक्यांत विचार करूं.

७४. पहिलें अंग सम्यक दृष्टि. हें जग कोणी निर्माण केलें, त्याचा अंत होणार आहे कीं नाहीं, परमात्मा एकच आहे कीं प्रतिशरीरांतील आत्मा भिन्न आहे, अशा गोष्टींचा विचार

करण्यापासून मानवजातीला कोणताच फायदा नाहीं. मानवजाति दुःखांत पडली आहे. मानवी तृष्णा हें त्या दुःखाचें मूळ आहे. त्या तृष्णेचा निरोध हा मोक्ष आहे; व मोक्षोपाय अष्टांगिक मार्ग आहे. ह्या तत्त्वज्ञानाचा अंगिकार करणें हीच सम्यक् दृष्टि होय.

७५. कामोपभोगांच्या विचारांपासून मनुष्याची फार हानि होते. त्याचप्रमाणें दुसऱ्याचा घातपात करण्यापासून व उपद्रवकारक चळवळीपासून मनुष्याची फार हानि होते. म्हणून असे विचार मनांत येऊं न देतां निष्काम वृत्तीनें, प्रेमानें व सौजन्यानें वागण्याचा संकल्प करणें यालाच सम्यक् संकल्प म्हणतात.

७६. अपायकारक विचार मनांत आले नसतील तर त्यांस मनांत येऊं न देणें, व जे आले असतील त्यांस ताबडतोब घालवून देणें, आणि जे उपायकारक विचार मनांत आले नसतील त्यांना मनांत आणणें, व जे आले असतील त्यांचा परिपोष करून त्यांना पूर्णतेला नेणें याला सम्यक् व्यायाम म्हणतात.

७७. शरीर, वेदना, मन आणि विचार यांचें यथोचित अवलोकन करणें याला सम्यक् स्मृति म्हणतात; व चार ध्यानांचा अभ्यास करणें याला सम्यक् समाधि म्हणतात.

७८. पार्श्वाच्या चार यामांत अष्टांगिक मार्गाच्या ह्या पांच अंगांचा समावेश केलेला नाहीं. हिंसा करावयाची नाहीं, असत्य बोलावयाचें नाहीं, चोरी करावयाची नाहीं व परिग्रह करावयाचा नाहीं. हीं चार व्रतें पार्श्वाचे शिष्य स्वीकारीत असत, व राहिलेला वेळ देहदंडनांत घालवीत. हें बुद्धाला अर्थात्च पसंत नव्हतें. शरीर आणि वाचा यांचें संयमन केल्यावर राहिलेला वेळ सम्यक् दृष्टि, सम्यक् संकल्प, सम्यक

व्यायाम, सम्यक् स्मृति व सम्यक् समाधि ह्यांच्या अभ्यासांत घालवला पाहिजे; तेणेंकरून काया व वाचा यांचें संयमन होऊन मानसिक सुखाची अभिवृद्धि होईल, असें बुद्धाचें म्हणणें होतें. यासाठींच देहदंडनाचा निषेध करून अष्टांगिक मार्ग त्यानें प्रचारांत आणला.

७९. वर सांगितलेले जे सहा मोठमोठाले संघनायक होते,[१] त्या सर्वांपेक्षां बुद्ध तरुण होता. आरंभी त्याजपाशीं फारसा संघ नव्हता, हें देखील वर दिलेल्या भरण्डु कालामाच्या गोष्टी-वरून[२] दिसून येईलच. असें असतां बुद्धाच्या या मध्यम मार्गाचा प्रभाव जनतेवर लवकर पडला. इतर संघांना बौद्ध संघानें मागें टाकलें, ह्यांत विशेष आश्चर्य नाहीं. कारण हें तत्त्वज्ञान लोकांना प्रचलित इतर तत्त्वज्ञानापेक्षां विशेष पसंत पडलें.

८०. बुद्धकालापूर्वीं यज्ञयागांचें स्तोम फार माजलें होतें, व जनतेला त्याचा अत्यन्त तिटकारा होता. परंतु राजे आणि धनाढ्य ब्राह्मण जबरदस्तीनें शेतीचीं जनावरें शेतकऱ्यांकडून आणीत व मोठमोठाल्या यज्ञयागांत त्यांचा वध करीत. लोकांना हें कृत्य किती नापसंत होतें हें दाखवण्यासाठीं येथें एक लहानशा सुत्ताचा उतारा देणें रास्त आहे.

८१. "बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें रहात होता. त्या काळीं पसेनदि कोसलराजाच्या महायज्ञाला सुरुवात झाली होती. पांचशें बैल, पांचशें गोहरे, पांचशें कालवडी, पांचशें बकरे, पांचशें मेंढे यज्ञासाठीं यूपांना बांधले होते. राजाचे दास, दूत आणि कामगार दंडभयानें भयभीत होऊन आसवें गाळीत रडत

---

१ वि० २।२४–२९ पहा. २ वि० २।४९–५१ पहा.

रडत यज्ञाचीं कामें करीत होते. तो प्रकार कांहीं भिक्षूंनी पाहिला आणि भगवंताला कळविला.

८२. "तेव्हां भगवान् म्हणाला, 'अश्वमेध, पुरुषमेध, सम्यक्पाश, वाजपेय आणि निरर्गल हे यज्ञ मोठ्या खर्चाचे आहेत. पण ते महत्फलदायक नाहींत. बकरे व मेंढे, गाई व बैल, असे विविध प्राणी ज्यांत मारले जातात, त्या यज्ञाला सद्वर्तनी महर्षि जात नसतात. परंतु ज्या यज्ञांत प्राण्यांची हिंसा होत नाहीं, व जे सर्वदा लोकांना आवडतात, ज्यांत बकरे, मेंढे, गाई, बैल इत्यादि प्राणी मारले जात नाहींत, अशा यज्ञाला सद्वर्तनी महर्षि जात असतात. म्हणून सुज्ञ पुरुषानें असा यज्ञ करावा.'"[1]

८३. अशा प्रकारचे अवाढव्य यज्ञ लोकांना किती अप्रिय होत चालले होते, याची आणखीहि बरींच उदाहरणें बौद्ध वाङ्मयांत सांपडतात. या यज्ञांला कंटाळून जे तापसी जंगलांत शिरत असत, ते जरी कधीं कधीं गावांत आले, तरी लोकांना उपदेश करण्याच्या भानगडींत पडत नसत. हा प्रयत्न प्रथमतः पार्श्वानें केला असावा. यज्ञयाग हा धर्म नसून चार याम हाच खरा धर्ममार्ग आहे, हें त्यानें जनतेला दाखवून दिलें. यज्ञयागाला कंटाळलेली सामान्य जनता या धर्माकडे ताबडतोब वळली. तथापि राजे व श्रीमंत ब्राह्मण हे आपल्या स्वास्थ्यासाठीं यज्ञयाग करीतच असत. दुसऱ्याहि श्रमणसंप्रदायांनी निरनिराळ्या मार्गानें या यज्ञयागाच्या धर्मावर हल्ले चढवले. तरी पण मौर्य कालापर्यंत कोणत्याना कोणत्या रूपानें यज्ञयाग अस्तित्वांत होतेच.

---

१ कोसलसंयुत्त, वग्ग १ सुत्त ९.

# अशोक व श्रमणसंस्कृति

८४. चन्द्रगुप्त मौर्य जैन संप्रदायी होता, असें जैनाचें म्हणणें आहे, व तें खरेंहि असूं शकेल. परंतु चन्द्रगुप्तानें यज्ञयाग बंद करण्याचा प्रयत्न केला नाहीं. स्वतः त्यानें यज्ञयाग केले नाहींत, आणि ब्राह्मणांना ह्या कामीं उत्तेजन दिलें नाहीं. ह्याच कारणास्तव ब्राह्मण ग्रंथकारांनी त्याला शूद्रवंशी ठरविलें असावें. त्याचा मुलगा बिंदुसार हा कोणत्या पंथाचा होता हें समजत नाहीं. तो कोणत्याहि पंथाचा असला, तरी आपल्या राज्याची व्यवस्था करण्यापलीकडे त्यानें विशेष कांहीं केलें असावें असें दिसत नाहीं. त्याचा मुलगा अशोक हा मात्र श्रमणसंस्कृतीचा पूर्ण पुरस्कर्ता बनला.

८५. राज्याभिषेकानंतर आठव्या किंवा नवव्या वर्षी अशोकानें कलिंग देशावर स्वारी केली. तेथें एक लाख लोक मारले गेले; व दीड लाख लोकांना धरून आणण्यांत आलें.[१] त्यामुळें कलिंग देशांत मोठा हाहाःकार माजून राहिला, व त्याचा अशोकाच्या मनावर विलक्षण परिणाम झाला. तो जितका हिंसक होता, तितकाच अहिंसक बनला. त्या वेळीं जे श्रमणपंथ होते त्यांत त्याला बौद्ध पंथ विशेष आवडला, व तो पूर्णपणें बुद्धाचा भक्त बनला. बुद्धधर्माच्या प्रचारासाठीं त्याचा प्रयत्न प्रसिद्धच आहे. परंतु तो कोणत्याहि प्रकारें सांप्रदायिक नव्हता. बौद्ध संप्रदायाला जरी त्यानें सर्वतोपरी मदत केली असली, तरी इतर श्रमणसंप्रदायांचा योगक्षेम नीट चालावा याजबद्दलहि तो खबरदारी घेत असे. एवढेंच नव्हे, तर श्रमणसंप्रदायांनी

---

१ अशोकाचा तेरावा शिला लेख पहावा.

आपसांत कलह माजवून कालाचा अपव्यय करूं नये, या बद्दल शक्य तेवढा त्यानें बंदोबस्त केला होता.

८६. सातव्या शिलालेखांत तो म्हणतो, "सर्व ठिकाणीं सर्व पाषंड ( श्रमणसंप्रदायी ) राहोत. कारण ते संयम आणि भावशुद्धि इच्छितात......विपुल दानधर्म करून देखील ज्या माणसाला संयम, भावशुद्धि, कृतज्ञता आणि दृढभक्तिता नाहीं, तो खरोखरच नीच होय."

८७. हा अशोकाचा उपदेश गृहस्थांसाठीं आहे. जे गृहस्थ आपल्या संप्रदायाला विपुलदान देत, परंतु दुसऱ्या संप्रदायांची निंदा करीत, किंवा त्यांना हाणून पाडण्याचा प्रयत्न करीत, त्यांना अशोक म्हणतो कीं, 'सगळे श्रमणसंप्रदाय संयम आणि अन्तःकरणाची शुद्धि इच्छितात. तेव्हां तुम्ही पुष्कल दानधर्म केला, पण वाचेचा संयम दाखविला नाहीं, तुमचें अन्तःकरण शुद्ध झालें नाहीं, तुमच्यामध्यें अशा लोकांविषयीं कृतज्ञता आणि दृढभक्ति उत्पन्न झाली नाहीं, तर तुम्हाला नीचच म्हणावें लागेल.'

८८. पुन्हा अशोक आपल्या बाराव्या शिलालेखांत म्हणतो, "देवांचा प्रिय प्रियदर्शी राजा सर्व प्रकारच्या श्रमणांची (पाषंडांची), परिव्राजकांची व गृहस्थांची दानधर्मानें व दुसऱ्या अनेक प्रकारानें पूजा करतो. परंतु दान व पूजा यांना देवांचा प्रिय एवढें महत्त्व देत नाहीं, जेवढें तो सर्व पाषण्डांच्या सार-वृद्धीला महत्त्व देतो. सारवृद्धि अनेक प्रकारची आहे. तिचें मूळ म्हटलें म्हणजे वाचागुप्ति. उदाहरणार्थ आत्मपाषंडांचें स्तोम माजवूं नये, किंवा परपाषण्डनिंदा होऊं देऊं नये. तसाच कांहीं प्रकार घडून आला तर त्याला महत्त्व देऊं नये. अनेक प्रकारांनी परपाषण्डांचा मान ठेवणें योग्य आहे. असें केल्यानें आत्म-

पाषण्डाची खात्रीनें अभिवृद्धि करतो, व परपाषण्डावरहि उपकार करतो......परस्परांचा धर्म परस्परांनी ऐकावा, व परस्परांची शुश्रूषा करावी, एवढ्यासाठीं एकी उत्तम. सर्व पाषण्ड बहुश्रुत आणि कल्याणागम[१] व्हावेत, हीच देवांच्या प्रियाची इच्छा...ह्यासाठीं धर्ममहामात्रांची (व इतरांची) योजना केली आहे..."

८९. ह्या शिलालेखावरून असें दिसून येतें कीं, अहिंसात्मक म्हणून जेवढे पंथ होते, तेवढ्यांना अशोक समानतेनें वागवीत होता, एवढेंच नव्हे, तर त्यांच्यामध्यें कलह न माजतां ऐक्याची अभिवृद्धि व्हावी, व लोकांना संयमाचा आणि आत्मशुद्धीचा मार्ग त्यांनी दाखवून द्यावा, यासाठीं त्यानें आटोकाट प्रयत्न केले. वैदिक संस्कृतीचा पाया म्हटला म्हणजे यज्ञयाग. त्यांचा अशोकानें पहिल्याच शिलालेखांत निषेध केला आहे;[२] आणि त्यानें जो सामान्य लोकांना धर्म उपदेशिला त्यांत अहिंसेला अग्रस्थान दिलें आहे. अर्थात् अशोकाच्या साम्राज्यांतच नव्हे तर आजूबाजूच्या राज्यांतहि श्रमणसंस्कृतीचा—त्यांतल्या-त्यांत बौद्ध पंथाचा—प्रसार अत्यंत जोरानें झाला, यांत मुळींच आश्चर्य नाहीं.

# श्रमणसंस्कृतीचे गुणदोष

९०. सर्वस्वाचा त्याग करून, केवळ मनुष्य प्राण्यावरच नव्हे, तर इतर प्राण्यांवरहि दया करण्यास लोकांस शिकवणें हें सामान्य काम नव्हे. या कामीं वैदिक ब्राह्मणांचा विरोध फार

१ ज्यांचे धर्मग्रंथ कल्याणकारक आहेत ते.

२ इध न किंचि जीवं आरभित्वा पजुहितव्वं ।

झाला. त्याचीं उदाहरणें त्रिपिटिक वाङ्मयांत अनेक सांपडतात. परंतु अशा विरोधाला न जुमानतां श्रमणसंप्रदायांनी, विशेषतः बौद्धांनी व जैनांनी दयाधर्माचा प्रसार करण्याचा अप्रतिम प्रयत्न केला. अशोकासारख्या राजाची मदत मिळाल्यानें तर हिंदुस्थानाबाहेरहि बौद्ध धर्माचा प्रसार झाला. अशोकापासून शीलादित्यापर्यंत बौद्ध धर्म पूर्वेकडे सारखा पसरत चालला. ज्या हिंदी श्रमणांनी या धर्माच्या प्रसाराला मदत केली त्यांचीं उज्वल चरित्रें सिलोन, ब्रह्मदेश, सयाम, चीन, जपान इत्यादि देशांतील लोक अद्यापिहि गात आहेत.

९१. आजला हिंदुस्थानांत बौद्ध धर्म राहिला नाहीं; व जैन धर्म अल्पप्रमाणांत अस्तित्वांत आहे. तथापि या धर्मांची छाप जनतेवर चांगली उमटली आहे. ब्राह्मणांनी कितीहि खटपट केली तरी यज्ञयागांचें पुनरुज्जीवन झालें नाहीं. अशोकानंतर पुष्यमित्रानें व त्यानंतर इसवी सनाच्या चौथ्या शतकांत समुद्रगुप्तानें अश्वमेध यज्ञ केला. परंतु ही यज्ञाची पद्धति पुनरपि लोकांत फैलावणें अशक्य होऊन गेलें.

९२. सर्वसाधारण लोकांत जो आज सदाचार दिसून येतो त्याचाहि पाया श्रमणांनीच घातला. ब्राह्मणांचा धंदा म्हटला म्हणजे यज्ञयाग करावे, आणि राजांकडून व इतर वरिष्ठ जातींच्या श्रीमंत लोकांकडून दक्षिणा मिळवावी हा होता. शूद्र म्हटला म्हणजे श्मशानासारखा त्याज्य! त्याला ब्राह्मण विचारतात कशाला? पण श्रमणांमध्यें हा पंक्तिप्रपञ्च नव्हता. त्यांना शूद्र काय किंवा वरिष्ठ जातीचे लोक काय, सर्व सारखेच होते. किंबहुना सर्व लोकांत समता स्थापन करण्याचा त्यांचा उद्योग होता.

९३. बुद्धावर ब्राह्मणांचा सर्वांत मोठा आरोप म्हटला

म्हणजे 'बुद्ध चारी वर्णांना मोक्ष आहे, असें प्रतिपादन करतो' हा होय.[1] परंतु अशा आरोपांना न जुमानतां बुद्धानें व त्याच्या शिष्यांनी हिंदुस्थानांत आणि हिंदुस्थानाबाहेर सर्व जातींत सदाचार फैलावण्याचा प्रयत्न केला. त्याचा परिणाम आजलाहि हिंदु समाजावर दिसून येत आहे.

९४. यज्ञ करावयाचा म्हटला म्हणजे त्याला एक मोठा भव्य मंडप घालावा लागत असे, व तेथें हजारों यूप गाडावे लागत असत. हे मण्डप शृंगारण्यांत येत असावेत. परन्तु त्यांची आयुर्मर्यादा यज्ञ संपेपर्यन्त असे. अर्थात् याजक ब्राह्मणांकडून कलाकौशल्याची उन्नति होणें शक्य नव्हतें. तें काम श्रमणसंस्कृतीनें केलें. यज्ञयागांविषयीं लोकांचा अनादर वाढत गेल्यामुळें त्यांची प्रवृत्ति विहार आणि स्तूप बांधण्याकडे झाली. आजला जीं हिंदुस्थानांत प्राचीन कलाकौशल्याचीं कामें आहेत त्यांत अशोकाचे शिलास्तम्भ, कार्ली इत्यादिक ठिकाणचीं लेणीं, व सांची वगैरे ठिकाणचे स्तूप, यांना अग्रस्थान देण्यांत येतें. बौद्धांच्या मागोमाग जैनांनीहि कलाकौशल्याची बरीच उन्नति केली; व पौराणिक कालांत शैव आणि वैष्णव यांनीहि त्यांचें अनुकरण केलें.

बाहुसच्चं च सिप्पं च विनयो च सुसिक्खितो ।
सुभासिता च या वाचा एतं मंगलमुत्तमं ॥

( बहुश्रुतता, शिल्पकला, उत्तम वागणुकीचा अभ्यास, आणि समयोचित भाषण, हीं उत्तम मंगलें होत. ) या मंगलसुत्तांतील गाथेवरून बौद्धांनी कलाकौशल्याला उत्तेजन कसें दिलें, हें सहज दिसून येईल.

---

१ 'समणो गोतमो चातुवण्णिं सुद्धिं पञ्ञापेति ।'
मज्झिमनि० म० पण्णासक, अस्सलायनसुत्त.

९५. श्रमणसंस्कृतींत जे दोष शिरले, त्याला मुख्य कारण म्हटलें म्हणजे राजाश्रय हें असावें. बुद्धानें आपली लहानशी वतनवाडी सोडून सन्यास घेतला; व पंचेचाळीस वर्षेपर्यंत धर्मप्रसाराचें काम केलें. पण ह्या अवधींत त्याचा आणि महाराजांचा क्वचितच संबंध येत असे. विनय-महावग्गांत बिंबिसार राजानें बुद्धाचा मोठा सन्मान करून त्याला वेणुवन दान दिलें इत्यादि ज्या कथा आहेत त्या निखालस कल्पित असाव्यात. कां कीं, त्यांना सुत्तपिटकांत मुळींच आधार सांपडत नाहीं. बिंबिसार राजा उदार होता, व तो सर्व पंथांच्या श्रमणांना समतेनें वागवीत असे. तेव्हां त्यानें बुद्धाला व त्याच्या संघाला आपल्या वेणुवनांत रहाण्याला परवानगी दिली असली, तर त्यांत विशेष असें कांहींच नाहीं.

९६. बुद्धाचा मुख्य विहार म्हटला म्हणजे श्रावस्ती येथील अनाथ पिंडिकाचा आराम. पण तो राजानें बांधला नव्हता. अनाथपिंडिक किंवा सुदत्त या नांवाच्या प्रसिद्ध व्यापाऱ्यानें तो बांधला होता. श्रावस्ती येथेंच विशाखा नांवाच्या धनाढ्य स्त्रीनें बौद्ध संघासाठीं एक प्रासाद बांधला होता. विशाखेला मिगारमाता या नांवानें ओळखत असत; आणि म्हणूनच त्या प्रासादाला मिगारमातेचा प्रासाद म्हणत. बुद्धाच्या आयुष्यांतील पुष्कळसे चातुर्मास या दोन ठिकाणीं गेले. राजा पसेनदि बुद्धाला भेटावयाला मधून मधून अनाथ पिंडिकाच्या आरामांत येत असे. परंतु त्याच्यावर बौद्धधर्माचा विशेष प्रभाव पडला नसावा, हें वर दिलेल्या त्याच्या यज्ञाच्या वर्णनावरून स्पष्ट होतें.[१]

---

१ वि० २।८१–८२ पहा.

९७. इतर ठिकाणीं जे बुद्धाचे विहार असत त्यांत कपिल-वस्तु येथें शाक्यांनी बांधलेला निग्रोधाराम हा एक होता. शाक्य राजे बुद्धाच्या ज्ञातिवर्गापैकीं होते. बुद्धाच्या उत्तर-वयांत त्यांनी हा विहार बांधला असावा. कौशाम्बी येथें घोषित श्रेष्ठीनेंहि बुद्धासाठीं एक विहार बांधला होता. यावरून असें दिसून येतें कीं, बुद्धाच्या हयातींत कोणत्याहि महाराजानें बुद्धाला विहार बांधून दिला नाहीं. त्याचा धर्म राजांसाठीं नसून सामान्य जनतेसाठीं होता; आणि मध्यम वर्गांतील उदार लोक तेवढे त्याच्या रहाण्यासवरण्याची व्यवस्था पहात.

९८. परन्तु अशोकानंतर हा मनु पालटला. बौद्धधर्म राजाश्रित बनला. राजाश्रय मिळवण्याचा प्रयत्न प्रथमतः बौद्धांनी केला कीं जैनांनी केला हें सांगतां येत नाहीं. चन्द्रगुप्त राजा जैन होता हें खरें मानलें, तर राजाश्रयाचा प्रथम प्रयत्न जैनांनी केला असें म्हणावें लागेल. पण हा प्रश्न महत्त्वाचा नाहीं. एवढें खरें कीं, अशोकानंतर जैन व बौद्ध या दोन्ही पंथांची राजाश्रय मिळवण्याची खटपट दिसून येते.

९९. अशोकाला कोणत्या तरी बौद्ध साधूनें बुद्धोपासक करण्याचा प्रयत्न केला, याला त्याच्या शिलालेखांत आधार नाहीं. पण हाहि मुद्दा विशेष महत्त्वाचा नाहीं. तो बौद्ध झाल्या-वर त्यानें अनेक विहार बांधले, व हजारों भिक्षूंचा योगक्षेम सुखानें चालेल अशी व्यवस्था केली, यांत शंका नाहीं. अशो-कानें एकंदर चौऱ्याऐंशीं हजार विहार बांधले, अशी दंतकथा आहे. पण तिच्यांत तथ्य एवढेंच असावें कीं, अशोक राजाचें अनुकरण करून त्याच्या प्रजेनें व आजूबाजूच्या राजेरज-वाड्यांनी हजारो विहार बांधले; व त्यांची संख्या ऐशीं नव्वद हजारांवर गेली.

१००. या अशोक राजाच्या कृत्यामुळें बौद्ध भिक्षुसंघ परिग्रहवान् बनला. भिक्षूपाशीं स्वतःचीं अशीं, तीन चीवरें व एक भिक्षापात्र एवढीच कायती संपत्ति असे. पण संघासाठीं एकादी रहाण्याची जागा घेण्याची परवानगी बुद्धकालापासूनच होती. त्या जागेची मालकी गृहस्थांची असे, व तिची डागडुजीहि गृहस्थच करीत असत. भिक्षुसंघ तेवढा चातुर्मासांत त्या ठिकाणीं रहात असे; आणि बाकी आठ महिने प्रवास करून लोकांना उपदेश करी. जर भिक्षुसंघ चातुर्मासाशिवाय बरेच महिने एकाच ठिकाणी राहिला, तर लोक टीका करीत असत.[1] परन्तु ही परिस्थिति अशोककालापासून पूर्णपणें पालटली. मोठमोठाले विहार बनले; व त्यांत भिक्षु कायमची वस्ती करून राहूं लागले.

१०१. असन्तं भावनं इच्छेय पुरेक्खारञ्च भिक्खुसु ।
आवासेसु च इस्सरियं पूजा परकुलेसु च ॥
ममेव कत मञ्ञन्तु गिही पब्बजिता उभो ।
ममेवातिवसा अस्सु किच्चाकिच्चेसु किस्मिचि ॥
इति बालस्स सङ्कप्पो इच्छा मानो च वड्ढति ।
अञ्ञा हि लाभूपनिसा अञ्ञा निब्बानगामिनी ॥
एवमेतं अभिञ्ञाय भिक्खु बुद्धस्स सावको ।
सक्कारं नाभिनन्देय्य विवेक मनुब्रूहये ॥

(नसलेली ध्यानसमाधीची भावना मला आहे असें दाखविण्याची, भिक्षूंचा पुढाकार मिळविण्याची, विहारांत

---

१ तेन खो पन समयेन भगवा तत्थेव राजगहे वस्सं वसि, तत्थ हेमन्तं, तत्थ गिम्हं । मनुस्सा उज्झायन्ति...न इमेसं दिसा पक्खायन्तीति । विनयपि० महावग्ग, महाक्खन्धक.

अधिकाराची व गृहस्थकुलांत मान्यता मिळवण्याची इच्छा; व गृहस्थ आणि भिक्षु माझ्याच वचनांत राहोत, कोणत्याहि कृत्याकृत्यांत ते मलाच वश असले पाहिजेत, असा मूर्खाचा ( भिक्षूचा ) संकल्प. त्यामुळें इच्छा आणि मान वाढत जातो. पण लाभाचा रस्ता निराळा आणि निर्वाणाला जाण्याचा रस्ता निराळा, हें बुद्धाच्या भिक्षु श्रावकानें जाणून सत्काराचें अभिनन्दन करूं नये; विवेक वाढवावा. ) ह्या धम्मपदांतील गाथा ह्याच काळीं रचलेल्या असाव्या. उघडच आहे कीं, जेव्हां मोठमोठाले विहार स्थापन झाले तेव्हां त्यांत पुढारीपणा विषयींहि चढाओढ सुरू झाली. सर्व श्रमणपंथांत एकी घडवून आणण्याचा अशोकाचा प्रयत्न तर बाजूलाच राहिला. पण खुद्द बुद्धाच्या संघांतहि अशा वासनेमुळें तट पडूं लागले, व भांडणें होऊं लागलीं. तीं मिटवण्याला अशोक राजाला बरीच खटपट करावी लागत असे, असें सारनाथ येथील त्याच्या शिला-लेखावरून दिसून येतें.

१०२. विहारांतील भिक्षूंचा चरितार्थ केवळ भिक्षेनें चालणें शक्य नव्हतें. तेव्हां त्यांच्यासाठीं आरामिकांची व्यवस्था करावी लागली. आरामिक म्हणजे आरामाचे ( विहाराचे ) सेवक. त्यांचा दर्जा जवळ जवळ संयुक्त प्रांतांतील शेतकऱ्यां-सारखा होता. त्यांना जमिनीचा महसूल विहाराला द्यावा लागे; व त्याशिवाय वेळोवेळीं आरामाची डागडुजी वगैरे कामें करावीं लागत. या सम्बन्धीं पहिला उल्लेख महावग्गांत सांपडतो.

१०३. "त्यावेळीं आयुष्मान् पिलिंदवच्छ राजगृह येथें लेणें करण्याच्या उद्देशानें डोंगराच्या कड्याखालीं डागडुजी करवीत होता. तेव्हां मगधराजा बिंबिसार त्याजपाशीं आला, आणि त्याला अभिवादन करून एका बाजूला बसला व

म्हणाला, 'भदंत, येथें काय करवतां?' पिलिंदवच्छ म्हणाला, 'महाराज, लेणें करण्याच्या उद्देशानें मी या कड्याची डागडुजी करवीत आहे.' राजा म्हणाला, 'तुम्हाला आरामिक पाहिजे काय?' 'महाराज, भगवंतानें आरामिक बाळगण्याची अनुज्ञा दिली नाहीं.' 'भदंत, असें असेल तर भगवंताला विचारून मला कळवा.'

१०४. "तदनन्तर पिलिंदवच्छानें भगवंतापाशीं दूत पाठवून आरामिक ठेवण्यासाठीं परवानगी मागितली; व भगवंतानें ती दिली. त्यानन्तर पुन्हा एकदां बिंबिसार राजा त्याजपाशीं आला. तेव्हां आरामिक ठेवण्यास भगवंताची परवानगी मिळाल्याचें त्याला समजलें; व तो म्हणाला, 'असें आहे तर, भदन्त, मी तुम्हाला एक आरामिक देतों.'

१०५. "बिंबिसार राजा कार्यव्यग्रतेमुळें ती गोष्ट विसरून गेला. पण कांहीं काळानें त्याला आठवण झाली, व तो आपल्या महामात्याला म्हणाला, 'तुम्ही पिलिंदवच्छाला आरामिक दिला काय?' 'नाहीं' असें उत्तर मिळाल्यावर तो म्हणाला, 'आरामिक देण्याचें वचन देऊन आजला किती दिवस झाले?' महामात्यानें दिवस मोजून 'पांचशें दिवस झाले' असें राजाला सांगितलें. तेव्हां राजानें पिलिंदवच्छाला पांचशें आरामिक देण्याची आज्ञा केली. त्या पांचशें आरामिकांचा एक गांवच वसला. त्याला 'आरामिकग्रामक' किंवा 'पिलिंदवच्छग्रामक' असें म्हणत"[१]

१०६. ही गोष्ट बुद्धसमकालीं घडलेली नव्हे. ती अशोकानंतर रचली आहे, यांत शंका नाहीं. अशाच प्रकारची दुसरी एक गोष्ट ह्यूएन् त्संग याच्या प्रवासवृत्तांत सांपडते. तिचा सारांश येथें देणें योग्य वाटतें.

---

१ महावग्ग, भेसज्जक्खन्धक.

१०७. "काश्मीरच्या राज्याचा परिघ सात हजार ली आहे; व तें चारी बाजूला डोंगरांनी वेढलें आहे......बुद्धाच्या परिनिर्वाणानंतर आनंदाचा शिष्य अरहन्त माध्यान्तिक ह्या देशांत आला. त्यावेळीं हा प्रदेश एक मोठा तलावच होता; व येथें एक नाग रहात होता. माध्यान्तिक अरहन्तानें आपल्या ऋद्धिबलानें नागाला वश करून घेतलें, व ह्या तलावाचें पाणी शोषण करावयास लावलें. त्यामुळें हा प्रदेश वस्तीला योग्य बनला. पण नागाला रहाण्यास जागा नव्हती. तेव्हां अरहन्तानें ह्या प्रदेशाच्या वायव्येला असलेल्या एका लहानशा तलावांत रहाण्यास त्याला जागा दिली. तदनन्तर तो नाग म्हणाला, 'हा प्रदेश मी तुम्हाला दान देतों.' माध्यान्तिक म्हणाला, 'मी लवकरच निर्वाणाला जाणार आहें; तेव्हां तुझें दान घेऊन मला काय करावयाचें?' नाग म्हणाला, 'जर हें शक्य नाहीं, तर जोंपर्यंत बुद्धाचा धर्म अस्तित्वांत असेल तोंपर्यंत माझें हें दान पांचशें अरहन्तांना स्वीकारूं द्या.'

१०८. "त्याच्या विनंतीला अनुसरून माध्यान्तिक अरहन्तानें त्या प्रदेशांत पांचशें संघाराम (विहार) बांधले; व आजूबाजूच्या प्रदेशांतून गरीब लोकांना विकत घेऊन त्या संघारामांचे आरामिक बनविलें. माध्यान्तिकाच्या मरणानंतर हे आरामिक आजूबाजूच्या प्रदेशांचे राजे झाले. परंतु आजूबाजूचे लोक त्यांना हीन समजत व 'क्रीत' (विकत घेतलेले)[१] म्हणत.

---

१ चिनी शब्द कि-लि-तो याजपासून संस्कृत क्रीत असावयास पाहिजे. पण भाषांतरकार Samuel Beal यांनी क्रितीय असा शब्द दिला आहे. किरात म्हणून जे लोक होते, व ज्यांचा महाभारतांत अनेक ठिकाणीं उल्लेख सांपडतो, तेच तर हे क्रीत नसतील ना?

१०९. "बुद्धाच्या परिनिर्वाणानंतर शंभर वर्षांनी अशोक राजानें सर्व जग जिंकलें; आणि त्याचा मान दूरदूरच्या प्रदेशांतहि वाढला. त्रिरत्नांचा तो अत्यंत आदर करी, व सगळ्या प्राणिमात्रांबद्दल प्रेम बाळगीत असे. त्या वेळीं एक हजार भिक्षूंत भांडण उत्पन्न झालें. पैकीं पांचशें भिक्षु अरहन्त होते, व पांचशें दांभिक होते. त्यांच्यापैकीं बरे कोण व वाईट कोण, हें अशोकाला माहीत नसल्यामुळें त्या सर्वांनाच जलसमाधि देण्याच्या उद्देशानें गंगेच्या काठीं त्यानें गोळा केलें. अरहन्तांना हें समजलें, तेव्हां ते एकदम आकाशमार्गानें ह्या प्रदेशाला ( काश्मीरला ) आले. त्यांचे ऋद्धिबल पाहून अशोकानें त्यांना स्वदेशीं येण्यास आमंत्रण केलें. पण ते गेले नाहींत. तेव्हां अशोकानें या प्रदेशांत पांचशें संघारामं बांधले; आणि हा देश संघाला दान दिला.

११०. "बुद्धाच्या परिनिर्वाणानंतर ४०० व्यावर्षी कनिष्क राजा गादीवर आला...त्यानें आपल्या कारकिर्दीत या प्रदेशांत एक भिक्षूंची मोठी सभा भरवली, व त्रिपिटकाचें शुद्धीकरण करविलें. हें संस्करण त्यानें ताम्रपटांवर लिहवून एका मोठ्या दगडाच्या पेटींत भरून जमिनींत गाडलें, व त्याच्यावर एक स्तूप बांधला. ह्या देशांतून जातांना त्यानें गुढघे टेकून पुनरपि हा सर्व देश संघाला दान दिला. कनिष्काच्या मरणानंतर क्रीत लोकांनी राज्यव्यवस्था आपल्या ताब्यांत घेतली, भिक्षूंना या प्रदेशांतून हांकून दिलें, आणि बुद्धधर्माचा विध्वंस केला.

१११. "तुखार देशांत हिमतल येथें रहाणारा राजा शाक्य वंशीय होता. तो बुद्धाच्या परिनिर्वाणानंतर सहाशें वर्षांनी गादीवर आला. क्रीतांनी बौद्धधर्माचा विध्वंस केल्याची गोष्ट जेव्हां त्याला समजली, तेव्हां त्यानें आपल्या राज्यांतील अत्यन्त

शूर असे तीन हजार योद्धे गोळा केले, व त्यांना कारवानांचा वेश देऊन काश्मीर देशांत प्रवेश केला. ह्या कारवानांजवळ निरनिराळा माल होता खरा, पण आंत त्यांचीं सर्व शस्त्रास्त्रें छपविलीं होतीं. काश्मीरच्या राजानें आदरातिथ्यपूर्वक त्यांचें स्वागत केलें. तुखारचा राजा कारवानच्या वेशांतील पांचशें योद्धे व राजाला देण्यासाठीं उत्तमोत्तम पदार्थ बरोबर घेऊन राजाच्या भेटीला गेला. तेथें एकाएकीं आपली पगडी खालीं टाकून त्यानें क्रीतांच्या राजावर हल्ला केला, व त्याला ठार केलें, आणि त्याच्या अमात्यांना हांकून दिलें; पण लोकांना कोणत्याहि प्रकारें त्रास दिला नाहीं. भिक्षूंना पुन्हा बोलावून त्यांच्यासाठीं त्यानें एक संघाराम बांधला, व त्यांची तेथें स्थापना केली. पश्चिम घाटांतून तो परत गेला. जातेवेळीं त्यानें पूर्वेच्या बाजूला साष्टांग दंडवत घालून हा देश भिक्षुसंघाला दान दिला

११२. "क्रीतांनी अशा प्रकारें अनेक वेळां भिक्षुसंघाविरुद्ध बंड केलें आहे; व त्यामुळें उत्तरोत्तर ते बुद्धधर्माचा द्वेष करीत आले आहेत. कांहीं वर्षांनंतर पुन्हा त्यांनी हें राज्य बळकावलें. त्यामुळें ह्या प्रदेशांत सध्या बौद्धधर्माचा विशेष प्रसार नाहीं. मिथ्यादृष्टि लोकांच्या मन्दिरांचा येथें फार आदर होतो." [१]

११३. या दंतकथेंत दिलेला अशोकाचा व कनिष्काचा काळ बरोबर नाहीं. अशोकाचा राज्याभिषेक बुद्धपरिनिर्वाणानंतर महावंसाप्रमाणें २१८ वर्षांनी झाला; व पाश्चात्य ग्रंथकारांच्या मताप्रमाणें २१४ वर्षांनी झाला. परन्तु कोणाच्याहि मतें तो बुद्धपरिनिर्वाणानन्तर शंभर वर्षांनी झाला नाहीं. कनिष्काचा काळ बुद्धानंतर सातव्या शतकांत ठरतो. तेव्हां ह्युएन् त्संगचीं

---

१ Buddhist Records, i. pp. 150-158.

हीं विधानें चुकलेलीं आहेत यांत शंका नाहीं. दुसरी गोष्ट माध्यान्तिक स्थविर आनन्दाचा शिष्य नसून अशोकसमकालीन होता. त्याला अशोकाच्या कारकीर्दींत मोग्गलिपुत्त तिस्स यानें काश्मीर आणि गांधार प्रदेशांत पाठविल्याचा दाखला महावंसांत सांपडतो;[१] आणि तोच बरोबर असला पाहिजे.

११४. या दंतकथेंतून एक अनुमान निघतें तें हें कीं, अशोककालापासून काश्मीर देशांत संघारामांची संख्या वाढत गेली; व राजे रजवाड्यांनी भिक्षूंच्या सेवेसाठीं लाखो आरामिक दिले. किंबहुना काश्मीर देशांत इतरांपेक्षां आरामिकांचीच संख्या जास्ती वाढली. त्यांच्यावर लागू केलेला कर त्यांना आवडेनासा झाला; व त्यांनी भिक्षूंविरूद्ध बंड केलें. त्यांचें दमन करण्यासाठीं भिक्षूंना बाहेरच्या राजांची मदत घ्यावी लागली, व त्यामुळें ह्या आरामिकांना बुद्धाचा धर्म अप्रिय झाला.

११५. अशा प्रकारें भिक्षु परिग्रही बनल्यावर आपल्या परिग्रहाचें रक्षण करण्यासाठीं त्यांना खोट्यानाट्या गोष्टी रचाव्या लागल्या. शस्त्र धारण करून परिग्रहाचें रक्षण करणें शक्य नव्हतें. कां कीं, ती उघड उघड हिंसा झाली असती, व भिक्षूंच्या संघारामांना किल्ल्यांचें स्वरूप आलें असतें. तेव्हां कल्पित गोष्टी रचून तद्वारा राजांची मनधरणी करून आपल्या संघारामांचें रक्षण करणें त्यांना भाग पडलें. अर्थात् परिग्रहामुळं सत्याच्या यामाचाहि त्यांच्याकडून भंग झाला.

११६. असत्य गोष्टी रचण्याच्या कामीं बौद्धांची आणि जैनांचीं चढाओढ लागलेली दिसते. उदाहरणार्थ, बौद्धांनी दशरथादिक राजांना सोळा हजार बायका असल्याचीं वर्णनें

---

१ थेरं कस्मीरगन्धारं मज्झन्तिकमपेसयि । महावंस १२।३.

केलीं आहेत. परंतु जैन साधूंनी त्यांच्यावर ताण केली. चक्रवर्तीला किती बायका असतात याचा हिशोब जैन साधूंनी दिला आहे तो असा—

ऋतुकल्याणिकानां स्युः पुरंध्रीणां सहस्रकाः ।
द्वात्रिंशतश्च सुस्पर्शाः सर्वर्तुषु सुखावहाः ॥५४४॥
देशाधिपानां कन्या या उद्वाढाश्चक्रवर्तिना ।
तासामपि सहस्राणि द्वात्रिंशत्स्वर्वधूश्रियाम् ॥५४५॥
पुरंध्रीणां भवन्त्येवं चतुष्षष्टिः सहस्रकाः ।
भवन्ति द्विगुणास्ताभ्यः सुरूपा वारयोषितः ॥५४६॥
एकं लक्षं द्विनवति-सहस्राभ्यधिकं ततः ।
अंतःपुरीणां निर्दिष्टं भोगार्थं चक्रवर्तिनः ॥५४७॥

(चक्रवर्ती राजाला सर्व ऋतूंत सुखकारक आणि सुखस्पर्शवती अशा ऋतुकल्याणी बत्तीस हजार स्त्रिया असतात. इतर राजांच्या मुलींशीं चक्रवर्ती राजा लग्न लावतो. त्यांचीहि संख्या बत्तीस हजार असते. त्या देवांगनांप्रमाणें सुरूपसंपन्न असतात. याप्रमाणें एकंदर स्त्रिया चौसष्ट हजार होतात. आणि त्याच्या दुप्पट म्हणजे एक लक्ष अठ्ठावीस हजार रूपवती वारांगना असतात. येणेंप्रमाणें चक्रवर्तीच्या उपभोगासाठीं त्याच्या अन्तःपुरांत एकंदर एक लक्ष ब्याण्णवद हजार स्त्रिया रहातात.) [१]

११७. ह्या गोष्टी सामान्य कवींनें लिहिलेल्या नसून जैन साधूंनी लिहिल्या आहेत; आणि त्या कां, तर केवळ एकाद्या राजाची मर्जी संपादून त्याच्याकडून आपल्या मन्दिरांचें व वसतिस्थानांचें रक्षण करावें या उद्देशानें !

---

१ श्रीकाललोकप्रकाश. सर्ग ३१.

११८. याप्रमाणें जैन आणि बौद्ध साधूंनी विहार व मन्दिरें यांच्या रूपानें परिग्रहाला सुरुवात केल्यानंतर अशा असत्य गोष्टी रचून राजांना संतुष्ट ठेवण्याचा धंदा चालविला. पण त्या गोष्टींवर भरंवसा ठेऊन दावले गेलेले आरामिक किंवा भिक्षूंचे सेवक चुप्प राहिनात. तेव्हां राजांकडून त्यांची हिंसा करवणें प्राप्त झालें. म्हणजे अपरिग्रह, सत्य आणि अहिंसा या तिन्हीहि यामांचा भंग झाला. रहातां राहिला अस्तेय याम. राजानें दाबून टाकल्यावर जो आरामिकांकडून किंवा इतर प्रजेकडून विहारांना आणि मन्दिरांना कर मिळे त्याला अस्तेय कसें म्हणतां येईल ? लोकांकडून जबरदस्तीनें हिरावून घेतलेली ती संपत्ति होय; खुषीनें दिलेलें दान नव्हे.

११९. ब्राह्मण राजांच्या साहाय्यानें शेतकऱ्यांकडून जबरदस्तीनें जनावरें आणून यज्ञयागांत त्यांचा वध करीत असत; व त्याचमुळें सामान्य जनता श्रमणसंस्कृतीकडे वळली. परंतु जेव्हां हेच श्रमण संघारामांच्या आणि मन्दिरांच्या रूपानें श्रीमंत बनले, व राजाश्रय घेऊन सामान्य जनतेकडून संघारामांसाठीं व मन्दिरांसाठीं कर वसूल करूं लागले, तेव्हां लोकांना ते अप्रिय झाले ह्यांत नवल कोणतें ? केवळ यज्ञयागांत पशुहत्या करणें हीच काय ती हिंसा, पण अशा रीतीनें लोकांकडून जबरदस्तीनें कर वसूल करणें ही हिंसा नव्हे, अशी ह्या श्रमणांची ठाम समजूत झाली असावी ! अशा रीतीनें श्रमणसंस्कृति निर्जीव होत गेली, व तिच्या जागीं उज्वल अशी संस्कृति उपस्थित न झाल्यामुळें पौराणिक संस्कृतीला वाव मिळाला, व ती उदयाला आली.

---

# विभाग तिसरा

# पौराणिक संस्कृति

## पौराणिक संस्कृतीचा उगम

१. बुद्धाच्या काळीं यज्ञयागांची प्रथा बऱ्या लोकांत चालू होती. पण सामान्य जनतेचा तो धर्म नव्हता. आजकाल जसे खेड्यांपाड्यांतून दगडोबा म्हसोबा आढळतात, तशाच रीतीनें त्या काळीं यक्षांचा आणि देवतांचा सुळसुळाट असे. यक्षांसाठीं मन्दिरें किंवा चवुतरे असत. पण देवता, वृक्ष, पर्वत इत्यादि ठिकाणीं रहात. त्या सर्वांच्या अनेक गोष्टी बौद्ध व जैन वाङ्मयांत आढळून येतात. जसजसें बौद्ध धर्माचें बळ वाढत गेलें तसतसें या यक्षांचें आणि देवतांचें परिवर्तन होऊन ते यक्ष व त्या देवता बुद्धाच्या अनुयायी बनत चालल्या; किंवा त्यांना बौद्ध भिक्षूंनी बुद्धाचे अनुयायी बनवलें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

२. उदाहरणार्थ, आळवी येथें एका बलाढ्य यक्षाची पूजा होत असे. त्याच्यावर बौद्ध भिक्षूंनी एक गोष्ट रचली ती अशी— "एके वेळीं बुद्ध भगवान् आळवक यक्षाच्या भवनांत (मन्दिरांत) येऊन राहिला. तेव्हां आळवक यक्ष त्याला म्हणाला, 'हे श्रमणा, येथून बाहेर हो.' बुद्ध भगवान् तेथून बाहेर निघाला. तेव्हां यक्ष म्हणाला, 'श्रमणा, आंत ये.' बुद्ध भगवान् आंत आला. दुस-

ऱ्यांदा व तिसऱ्यांदाहि हाच प्रकार घडला. पण चौथ्यांदा जेव्हां आळवक यक्षानें भगवंताला बाहेर निघण्यास सांगितलें, तेव्हां भगवंतानें ती गोष्ट कबूल केली नाहीं. भगवान् म्हणाला, 'मी आतां येथून बाहेर निघणार नाहीं; तुला जें कांहीं करावयाचें असेल तें कर.' यक्ष म्हणाला, 'तुला मी प्रश्न विचारतों. त्याचें जर तूं उत्तर दिलें नाहींस, तर तुला वेड लावीन; किंवा तुझें हृदय फाडून टाकीन, अथवा तुला पायाला धरून गंगेच्या पलीकडे फेकून देईन.' भगवान् म्हणाला, 'ह्या गोष्टी करणें जगांत कोणालाहि शक्य नाहीं. तथापि तुला प्रश्न विचारावयाचे असले तर विचार.'

३. "यक्ष म्हणाला, 'मनुष्याचें श्रेष्ठ धन कोणतें? कशाचा चांगला अभ्यास केला असतां सुखकारक होतो? रसांत उत्तम रस कोणता? कशा रीतीनें वागल्यानें श्रेष्ठ जीवित म्हणतां येईल?' भगवान् म्हणाला, 'श्रद्धा हें मनुष्याचें श्रेष्ठ धन आहे. धर्माचा चांगला अभ्यास सुखकारक होतो. रसांत उत्तम रस सत्य होय. प्रज्ञापूर्वक जगणें ह्याला श्रेष्ठ जीवित म्हणतात.

४. "यक्ष म्हणाला, 'ओघ कसा तरतो? समुद्र कसा तरतो? दुःखाच्या पार कसा जातो, आणि परिशुद्ध कसा होतो?' भगवान् म्हणाला, 'श्रद्धेनें ओघ तरतो; अप्रमादानें समुद्र तरतो; उत्साहानें दुःखाच्या पार जातो, आणि प्रज्ञेनें परिशुद्ध होतो.'

५. 'यक्षः—प्रज्ञेचा लाभ कसा होतो? धन कसें मिळवतो? कीर्ति कशी मिळते? मित्र कसे जोडतो? ह्या लोकांतून पर-लोकीं गेल्यावर शोक करण्याची पाळी कशी येत नाहीं? भगवानः—निर्वाणप्राप्तीच्या अरहन्तांच्या धर्मावर श्रद्धा ठेऊन शुश्रूषा केली असतां सावध व शहाण्या माणसाला प्रज्ञेचा

लाभ होतो. योग्य वर्तन करणारा धुरंधर व उत्साही मनुष्य धन मिळवतो; सत्यानें कीर्ति मिळवतो, व दानानें मित्र जोडतो. सत्य, दम, धृति आणि त्याग हे चार गुण ज्या श्रद्धाळु गृहस्थापाशीं आहेत तो परलोकीं शोक करीत नाहीं. तूं दुसऱ्याहि अनेक श्रमण-ब्राह्मणांना विचार कीं, सत्य, दम, त्याग आणि क्षमा यांच्यापेक्षां अधिकतर आहे कीं काय?

६. "यक्षः—आतां मी दुसऱ्या श्रमण-ब्राह्मणांना कां विचारावें? आज मला पारलौकिक अर्थ कोणता तें समजलें. खरोखरच माझ्या लाभासाठीं बुद्ध आळवीला आला. कोणाला दान दिलें असतां महत्फलदायक होतें हें मला आज समजलें. तो मी बुद्धाला आणि धर्माच्या सुधर्मतेला नमस्कार करीत करीत गांवोंगांवीं व शहरोंशहरीं हिंडत राहीन!"[१]

७. येथें आळवक यक्षाला बौद्धधर्मी बनवण्याचा प्रयत्न उघड दिसतो. त्याचप्रमाणें सातागिरि व हेमवत ह्या यक्षांचीहि गोष्ट ह्याच सुत्तनिपातांत आली आहे. संयुत्त निकायांतील यक्खसंयुत्तांत अनेक यक्षांच्या गोष्टी आहेत. देवता व देवपुत्त-संयुत्तांत अनेक देवतांच्या व देवपुत्रांच्या कथा आहेत. त्याच-प्रमाणें वन संयुत्तांत वनदेवतांच्या कथा आहेत. त्या बहुतेक फार रोचक, पण पुराणमय आहेत.

८. चारी दिशांना चार महाराजे वास करीत असत व त्यांच्या हाताखालीं पृथ्वीनिवासी यक्षादिक सर्व देवगण रहात, अशी कल्पना प्रचलित होती. या चार महाराजांचें वर्णन दीघ-निकायांतील आटानाटिय सुत्तांत व महासमय सुत्तांत आलें आहे. पैकीं आटानाटिय सुत्ताचा सारभूत अंश येथें देतों.

---

१ आळवकसुत्त, सुत्तनिपात. हेंच सुत्त यक्खसंयुत्तांतहि सांपडतें.

९. "एके समयीं भगवान् राजगृह येथें गृध्रकूट पर्वतावर रहात होता. तेव्हां चार महाराजे आपआपलें मोठें सैन्य घेऊन त्याच्या दर्शनाला आले व भगवंताला नमस्कार करून एका बाजूला बसले. तेव्हां वैश्रवण ( वेस्सवण ) महाराजा भगवंताला म्हणाला, 'उदार, मध्यम आणि हीन यक्षांत कांहीं यक्ष भगवंताचे भक्त आहेत; पण कांहीं अभक्तहि आहेत. कारण, प्राणातिपात, अदत्तादान, कामामिथ्याचार, मृषावाद, व सुरामेरयादिक मादक पदार्थ, यांपासून विरत होण्यासाठीं भगवान् धर्मोपदेश करतो. पण जे यक्ष या गोष्टींपासून विरत झाले नाहींत त्यांना बुद्धाचा उपदेश अप्रिय वाटतो. भगवंताचे शिष्य अरण्यामध्यें एकान्तवासांत रहातात. तेव्हां तेथें रहाणारे जे यक्ष भगवंताचे भक्त नसतील, त्यांचीं मनें वळवण्यासाठीं ही आटानाटिय[1] रक्षा भगवंतानें स्वीकारावी. ती भिक्षु, भिक्षुणी, उपासक, व उपासिका, यांच्या रक्षणाला व सुखनिवासाला उपयोगीं पडेल.'

१०. "भगवंतानें वैश्रवणाची विनंती कांही न बोलतां स्वीकारली. तेव्हां वैश्रवणानें आटानाटिय रक्षा सांगितलीः—विपस्सीला नमस्कार असो. सिखीला नमस्कार असो. वेस्सभूला नमस्कार असो. ककुसंधाला नमस्कार असो. कोनागमनाला नमस्कार असो. आणि सक्यपुत्ताला नमस्कार असो. पूर्व दिशेचा पालक महाराजा धृतराष्ट्र; तो गंधर्वांचा अधिपति. त्याला पुष्कळ पुत्र आहेत. ते देखील बुद्धाला पाहून दुरून नमस्कार करतात. दक्षिण दिशेचा पालक महाराजा विरुढ; तो

---

१ आटानाट नांवाचें यक्षनगर, यक्षांनी तेथें जमून तयार केलेली ही रक्षा, असें बुद्धघोषाचार्यांचें म्हणणें दिसतें.

कुंभण्डांचा अधिपति. त्याला पुष्कळ पुत्र आहेत; ते पण बुद्धाला पाहून दुरून नमस्कार करतात. पश्चिम दिशेचा पालक महाराजा विरूपाक्ष; तो नागांचा अधिपति. त्यालाहि पुष्कळ पुत्र आहेत; आणि तेहि बुद्धाला पाहून दुरून नमस्कार करतात. उत्तर दिशेचा पालक महाराजा कुबेर (कुवेर); तो यक्षांचा अधिपति. त्यालाहि पुष्कळ पुत्र आहेत; व ते देखील बुद्धाला पाहून दुरून नमस्कार करतात. हे मारिष, ही ती आटानाटिय रक्षा होय. ती चांगल्या रीतीनें संपादन केली असतां यक्ष, गंधर्व, कुंभण्ड किंवा नाग यांच्यापैकीं कोणीहि बाधा करणार नाहीं.

११. "पण, हे मारिष, कांहीं अमनुष्य (यक्षादिक) फार चंड बंडखोर आहेत. ते महाराजांची आज्ञा पाळीत नाहींत. त्यांपैकीं कोणीतरी दुष्ट चित्तानें भिक्षु, भिक्षुणी, उपासक, उपासिका, ह्यांपैकीं एकाद्याचा पाठलाग केला, तर यक्षांच्या महासेनापतींना आह्वान करावें कीं, हा यक्ष पाठलाग करतो; आंत शिरूं पहातो; उपद्रव देतो; त्रास देतो; हा सोडीत नाहीं. ते यक्षांचे महासेनापति कोणते?

इन्दो सोमो वरुणो च भारद्वाजो पजापति।
चन्दनो कामसेट्ठो च किन्नुघण्टु निघण्टु च॥
पमादो ओपमञ्ञो च देवसूतो च मातलि।
चित्तसेनो च गन्धब्बो नळो राजा जनेसभो॥
सातागिरि हेमवतो पुण्णको करतियो गुलो।
सिवको मुचलिन्दो च वेस्सामित्तो युगन्धरो॥
गोपालो सुप्पगेधो च हिरि नेत्ति च नन्दियो॥
पञ्चालचन्दो आळवको पज्जुण्णो सुमुखो दधिमुखो।
मणि मानिचरो दीघो अथो सेरीसको सह॥

१२. "ही रक्षा सांगून त्या चार महाराजांनी भगवंताला अभिवादन करून प्रदक्षणा केली, व ते तेथेंच अंतर्धान पावले. त्या रात्रीनंतर भगवंतानें घडलेली सर्व गोष्ट भिक्षूंना सांगितली, व ही आटानाटिय रक्षा धारण करावी, असा उपदेश केला. भिक्षूंनी भगवंताच्या भाषणाचें अभिनंदन केलें."

१३. यक्षादिकांसंबंधानें ज्या गोष्टी त्रिपिटक वाङ्मयांत सांपडतात त्यांचें दिग्दर्शनहि करणें शक्य नाहीं. कारण तो एक मोठा ग्रंथच होईल. पण बुद्धाच्या शिष्यांचें धोरण समजण्यास वरील दोन उतारे पुरे आहेत. खिस्ती किंवा मुसलमान धर्मप्रचारकांनी जसा इतरांच्या देव-देवतांचा नाश केला, तसा बुद्धाच्या शिष्यांनी केला नाहीं. देवता आळवक यक्षाप्रमाणें हिंसक असल्या, तर त्यांना अहिंसक बनवावें आणि बुद्धभक्त करावें, असा त्यांचा प्रयत्न होता. आणि तिबेट, ब्रह्मदेश, सयाम इत्यादि देशांत जेथें बौद्ध धर्माचा प्रसार अव्याहतपणें झाला, तेथें तो उत्तम प्रकारें सिद्धीस गेला. परंतु हिंदुस्थानांत बौद्ध धर्माच्या विरुद्ध वैदिक धर्म खडा होता; व तो हिंसाधर्माला फांटा देण्यास तयार नव्हता. अर्थात् ह्या देशांत हिंसक आणि अहिंसक अशा दोन्ही प्रकारच्या देवता राहून गेल्या. आणि ह्या देवतांच्या पूजनापासूनच पौराणिक संस्कृतीचा उगम झाला.

## इन्द्र

१४. ब्राह्मणी इन्द्र, हिंसक होता हें सांगणें नलगे. यज्ञयागांत त्याच्या नांवें बलिदान होत असे. त्यायोगें त्याचा हिंसकपणा बुद्धकालानंतरहि शिल्लक होताच. तरी पण बुद्धाच्या शिष्यांनी त्याला अहिंसक बनविलेंच !

१५. इन्द्राच्या पूर्वजन्मीची कथा कुलावक जातकांत ( क्रमांक ३१ ) आली आहे. "तो पूर्वजन्मीं मगध देशांत मचल नांवाच्या गांवीं एका मोठ्या कुटुंबांत जन्मला होता. त्याला मघकुमार किंवा मघमाणव म्हणत. त्या गांवांत तीस कुटुंबें रहात असत. एके दिवशीं ग्रामकृत्यासाठीं सर्व मंडळी एकत्र झाली असतां मघानें आपली जागा साफसूफ केली. ती दुसऱ्यानें घेतली. अशा रीतीनें त्यानें सर्वच जागा साफ केली. मंडळी उघड्या जागेंत जमत म्हणून तेथें त्यानें मंडप घातला; व काहीं काळानें तो मंडप काढून तेथें एक मोठी ग्रामशाला बांधली, आणि तेथें आसनांची व पाण्याची व्यवस्था केली. ह्या कृत्यांनी मघानें त्या तीसहि कुटुंबाचीं मनें आकर्षून घेतलीं.

१६. "ते सर्व शेतांत जाण्यापूर्वी एकत्र जमून गांवच्या रस्त्यांची डागडुजी करीत, पूल बांधीत, तलाव खणीत, धर्मशाळा बांधीत. या रीतीनें ते सर्वजण सुशील बनले. पण गांवच्या पाटलाला ( ग्रामभोजकाला ) हें आवडलें नाहीं. कां कीं, पूर्वी जेव्हां ते दारू पिऊन आपसांत तंटाबखेडा करीत, तेव्हां त्याला दंडाच्या रूपानें बरीच कमाई होत असे, ती बंद झाली. त्यांच्या विरुद्ध त्यानें राजाकडे तक्रार केली कीं, हे चोर लोक मोठी बंडाळी करीत आहेत. राजानें विचार न करतां तावडतोब त्यांना बांधून आणण्याचा हुकूम केला, आणि हत्तीच्या पायांखालीं तुडवावयास लाविलें. त्यांना बांधून राजांगणांत जमिनीवर पालथें पाडलें. तेव्हां बोधिसत्त्व आपल्या सहायकांना म्हणाला, 'तुम्ही आपल्या शीलाचें चिंतन करा, व खोटी फिर्याद करणाऱ्यावर, राजावर, हत्तीवर व स्वतःच्या शरीरावर एकसमान मैत्रीची भावना करा.' त्यांनी त्याप्रमाणें केलें.

१७. "त्यांना तुडविण्यासाठीं हत्ती आणला. माहुतानें

हत्तीला पुढें केलें. पण तो त्यांच्यावरून जाईना; एकदम मोठा क्रौंचनाद करून मागें पळाला. दुसऱ्या हत्तीला आणलें; तिसऱ्या हत्तीला आणलें; पण त्यांनीहि पहिल्या हत्तीचेंच अनुकरण केलें. मघाच्या मंडळीशीं हत्तीला पळवून लावण्याचें कांहीं औषध असावें असें वाटून त्यांची झडती घेण्यांत आली. पण कांहीं सांपडलें नाहीं. तेव्हां राजपुरुषांनी प्रश्न केला, 'तुमच्याजवळ कांहीं मंत्र आहे कीं काय?' मघानें 'होय' असें उत्तर दिल्यावर त्या सर्वांना राजासमोर नेऊन उभें करण्यांत आलें. तेव्हां राजा म्हणाला, 'तुमचा मंत्र कोणता तो आम्हास सांगा.' मघ म्हणाला, 'महाराज, आमच्या जवळ विशेष मंत्र असा कोणताहि नाहीं. पण आम्ही तीस जण प्राणघात करीत नसतों, चोरी करीत नसतों, व्यभिचार करीत नसतों, खोटें बोलत नसतों, व दारू पीत नसतों. आम्ही मैत्रीची भावना करतों, दान देतों, रस्त्यांची डागडुजी करतों, तलाव खणतों, व धर्मशाळा बांधतों. हा आमचा मंत्र, ही आमची रक्षा, व हीच आमची संपत्ति.' तें ऐकून राजानें पाटलाला हांकून दिलें, व त्या गांवचे सर्व अधिकार, तो गांव व तो हत्तीहि त्यांसच देऊन टाकला.

१८. "याप्रमाणें मघानें त्या जन्मीं अनेक पुण्यकर्में केलीं. त्यानें हे सात व्रतनियम अंगिकारले होतेः—

( १ ) आमरण मी आई बापांचें पोषण करीन.
( २ ) आमरण कुटुंबांतील वडील माणसांचा मान राखीन.
( ३ ) आमरण मृदुभाषी असेन.
( ४ ) आमरण चहाडी करणार नाहीं.
( ५ ) आमरण मात्सर्याशिवाय गृहस्थाश्रम चालवीन; उदारपणें दानधर्म करणारा होईन.
( ६ ) आमरण सत्यवचन बोलेन.

( ७ ) आमरण क्रोधविरहित राहीन; व जर एकाद्या वेळीं क्रोध उद्भवला तर तात्काळ त्याला दाबून टाकीन.[१]

१९. "याप्रमाणें पुण्यकर्मे करून व व्रतनियम पाळून मघ मरणोत्तर देवलोकीं जन्मला, व देवांचा इंद्र ( राजा ) झाला. पूर्वजन्मींच्या त्याच्या नांवावरून त्याला मघवान् म्हणत, व देवलोकीं त्याला शक्र म्हणत. एकदा असुरांनी त्याच्यावर हल्ला केला. हें वर्तमान ऐकून शक्र आपल्या वैजयंत रथांतून दक्षिण समुद्राच्या बाजूनें असुरांबरोबर युद्ध करण्यास पुढें सरसावला. तेथें असुरांनी त्याचा पराजय केला, व इन्द्रानें पलायन केलें. त्याचा रथ वेगानें चालला असतां सांवरीचें अरण्य मोडून समुद्रांत पडूं लागलें, व त्यांत असलेलीं गरुडांचीं घरटीं समुद्रांत पडलीं; गरुडांचीं पिलें किलबिलाट करूं लागलीं. तेव्हां शक्र मातलीला म्हणाला, 'हा अत्यंत करुण शद्ब कोणाचा?' मातलि म्हणाला, "देवा! आपल्या रथवेगानें सांवरीचें वन मोडून समुद्रांत पडलें. त्यांत असलेलीं हीं गरुडांची पिलें एकसारखा किलबिलाट करीत आहेत'. शक्र म्हणाला, 'बा मातलि, ह्या सांवरीच्या वनांतून रथ नेऊं नकोस. असुरांनी आमचे प्राण घेतले तरी बेहत्तर; पण ह्या पक्षांची घरटीं नष्ट होऊं देऊं नकोस.'

२०. "तें ऐकून मातलि सारथीनें एकदम रथ फिरवला. तें पाहून असुरांना वाटलें कीं, दुसऱ्या चक्रवालांतून अनेक शक्र ह्या शक्राच्या मदतीला आले असावेत. या समजुतीनें त्यांनी

---

१ हे नियम सक्क संयुत्तांतील तीन सुत्तांत सांपडतात. त्यांतील गाथा जशाच्या तशा कुलावक जातकांत घेतल्या आहेत. पण नियमांचा क्रम बदलला आहे. येथें ते सुत्तांला अनुसरून दिले आहेत.

पळ काढला, व ते आपल्या असुरभवनांत शिरले. तेव्हां शक्रानें दोन अयोध्यपुरांच्या मध्यें उरग करोटि पयस्स हारी आणि मदनयुत चार महंत अशा पांच समुदायांना पांच ठिकाणीं रक्षणासाठीं ठेऊन दिलें, व तो दिव्य संपत्तीचा अनुभव घेऊं लागला."

२१. सक्कसंयुत्तांत दुसरी एक शक्राची मनोरंजक गोष्ट आहे ती अशी–"एकदां शक्राचें वेपचित्ति असुरेंद्राबरोबर युद्ध झालें. त्या संग्रामांत वेपचित्ति म्हणाला, 'आम्ही आतां सुभाषितांची लढाई करूं' शक्राला ही गोष्ट मान्य झाली. देवांनी व असुरांनी कोणाचें सुभाषित चांगलें हें ठरवण्यासाठीं एक परिषद् नेमली. तेव्हां वेपचित्ति म्हणाला, 'हे देवेन्द्र! तुझें सुभाषित बोल'. पण शक्र म्हणाला, 'तुम्ही पूर्वदेव आहां. तेव्हां, हे वेपचित्ति, तूं पहिली गाथा बोल.'

२२. "वेपचित्ति म्हणाला, 'मूर्खांचा निषेध करणारा कोणी नसला, तर ते अधिकच फुगून जातात. म्हणून शहाण्या माणसानें दंडनीतीनें मूर्ख माणसाचा निषेध करावा.' हें ऐकून असुरांनी वेपचित्तीचें अभिनंदन केलें. देव चुप्प राहिले.

२३. "त्यावर शक्र म्हणाला, 'मूर्ख मनुष्य रागावला असें जाणून शहाण्या माणसानें सावधानतापूर्वक शांति धरावी, हाच मूर्ख माणसाचा निषेध होय'. ह्या शक्राच्या सुभाषिताचें देवांनी अभिनंदन केलें. असुर चुप्प राहिले.

२४. "तेव्हां वेपचित्ति म्हणाला, 'हा मला भयामुळें क्षमा करतो, असें मूर्ख मनुष्य समजतो, व पळत्याच्या पाठीं जसा बैल लागतो तसा हा दुष्ट शहाण्याच्या मागें लागतो. हे वासवा, हाच क्षमेमध्यें मला दोष दिसतो.' हें ऐकून असुरांनी वेपचित्तीचें अभिनंदन केलें. पण देव चुप्प राहिले.

२५. "त्यावर शक्र म्हणाला, 'मूर्ख माणसाला खुशाल वाटूं द्या किंवा न वाटूं द्या कीं, भयामुळें हा मला क्षमा करीत आहे. परंतु पुरुषार्थामध्यें सदर्थ श्रेष्ठ आहे, व क्षमेपेक्षां दुसरा श्रेष्ठ सदर्थ नाहीं. जो स्वतः बलवान् असून दुर्बळाला क्षमा करतो तोच परम क्षमावान् होय. दुर्बळ मनुष्य सदाच क्षमा करतो. मूर्खपणाचें बळ हें बळ नव्हे. परंतु धर्माप्रमाणें आचरण करणाऱ्याचें जें बळ त्याच्याविरुद्ध बोलणारा कोणी सांपडणार नाहीं. रागावणाऱ्या माणसावर जो रागावतो, त्यांत त्याचें हित नसतें. पण रागावणाऱ्यावर जो रागवत नाहीं तोच दुर्जय संग्राम जिंकतो. जो दुसरा रागावला असतां आपण स्वतः शांतपणें वागतो, तो आपलें आणि परक्याचें कल्याण साधतो. आपला आणि दुसऱ्याचा रोग बरा करणाऱ्या अशा ह्या माणसाला सद्धर्म न जाणणारे सामान्य जन वेडा समजतात.' परिषदेनें शक्राच्या तर्फे निकाल दिला हें सांगावयास नकोच."

२६. बौद्ध इंद्राचा स्वभाव समजण्याला हीं उदाहरणें पुरेत. जो वैदिक इंद्र आपल्याच बापाला ठार करतो, शहरांचीं शहरें उध्वस्त करून टाकतो, ब्राह्मणांना आणि यतींना ठार मारतो, शेंकडो रेड्यांचा फडशा पाडतो, व त्याचयावर सरोवरांचीं सरोवरें सोमरस गटागट पिऊन टाकतो, त्यालाच बौद्ध श्रमणांनी कसें अहिंसक बनविलें, हें या उदाहरणांवरून स्पष्ट दिसून येईल. ह्या श्रमणांना खोटें ठरवण्याला ब्राह्मणांना मुळींच प्रयास पडले नसते. वेदांतील चार पांच उताऱ्यांनी श्रमणांचा खोटेपणा तेव्हांच सिद्ध करतां आला असता. पण तें ब्राह्मणांनी कां केलें नसावें ?

२७. एक तर ब्राह्मणांमध्येंच इंद्राचें फारसें महत्त्व राहिलें नव्हतें. इंद्राचें साम्राज्य कधींच नामशेष झालें होतें, व जे कोणी

बुद्धसमकालीं क्षत्रिय होते त्यांपैकीं कोणत्याहि महाराजाचा कुलदेव इंद्र नव्हता. यज्ञयागांत इंद्राच्या ऋचा म्हणण्यांत येत असत. पण त्यांचा अर्थ फार थोड्यांना समजत असे. अशा समयीं वैदिक इंद्राची तरफदारी करून ब्राह्मणांना कांहीं फायदा नव्हता. दुसरें हें कीं, इंद्र क्रूर होता, हिंसक होता इत्यादिक गोष्टी सिद्ध केल्यानें इंद्राची जी कांहीं थोडी बहुत चहा लोकांत होती, ती देखील नष्ट झाली असती. तेव्हां ब्राह्मणांनी श्रमणांना इंद्राला वाटेल तसा बनवण्याची मुभा दिली. पण त्याचा परिणाम असा झाला कीं, इंद्राविषयीं सामान्य जनतेची श्रद्धा मुळींच राहिली नाहीं, आणि पौराणिकांनी त्याला अगदींच खालच्या दर्जाला नेऊन पोंचविलें. 'तो अहिल्येचा जार, अति व्यभिचार केल्यानें त्याचे वृषण गळून पडले, व देवांनी त्याला बकऱ्याचे वृषण लावले!' अशा कथा महाभारतांत सांपडतात.[१]

## ब्रह्मदेव

२८. अशा रीतीनें इन्द्र मागें पडत गेला. पण बुद्धसमकालीं ब्रह्मा पुढें आला. ऋग्वेदांत ब्रह्म म्हणजे प्रार्थनेचा मंत्र, व तें गाणारा तो ब्रह्मा. होतां होतां यज्ञाच्या अध्यक्षाला ब्रह्मा म्हणण्याची वहिवाट सुरू झाली. ('एवंविद्ध वै ब्रह्मा यज्ञं यजमानं सर्वांश्चार्त्विजोऽभिरक्षति तस्मादेवंविदमेव ब्रह्माणं कुर्वीत।' छांदोग्य उ० ४।१७।१०). इंद्राचें साम्राज्य नष्ट झाल्यावर त्याचें

---

१. इन्द्रो मुष्कवियोगं मेषवृषणत्वं चावाप ॥ २३ ॥ कुंभकोण, शान्ति प० अ० ३५१.

महत्त्व राजे लोकांत राहिलें नसल्यामुळें ब्राह्मणांनी ह्या ब्रह्म्याला वरच्या पायरीला चढवतां चढवतां जगाचा कर्ता बनवलें. ( ब्रह्मा देवानां प्रथमः संबभूव विश्वस्य कर्ता भुवनस्य गोप्ता। मुण्डक उ० १।१ ). परंतु ह्या कल्पनेला कोणत्याहि महाराजाचा पाठिंबा न मिळाल्यामुळें ब्रह्मा चिरकाल ह्या अधिकारावर राहूं शकला नाहीं. बौद्ध श्रमणांनी तर त्याची नुसती थट्टाच उड- वली. त्याच्यासंबंधानें बौद्ध वाङ्मयांत बऱ्याच कथा उपलब्ध आहेत. त्यापैकीं कांहीं येथें देणें अप्रस्तुत होणार नाहीं.

२९. "एकदां एका भिक्षूला असा विचार पडला कीं, पृथ्वी, आप, तेज व वायु हीं महाभूतें कोठें विलय पावतात ? त्याला हा प्रश्न सुटेना. तेव्हां तो चातुर्महाराजिक देवांजवळ गेला. त्यांनाहि हा प्रश्न माहीत नव्हता. त्यांनी त्या भिक्षूला चार महाराजांपाशीं पाठविलें. चार महाराजांनाहि त्याच्या प्रश्नाचें उत्तर देतां आलें नाहीं. त्यांनी त्याला तावत्रिंशत् देवांकडे, त्यांनी इन्द्राकडे, इन्द्रानें याम देवांकडे, यामांनी त्याला सुयाम नांवाच्या आपल्या अध्यक्षाकडे, त्यानें तुसित देवांकडे, तुसित देवांनी संतुसित नांवाच्या आपल्या अध्यक्षाकडे, त्यानें निर्माण- रति देवांकडे, त्यांनी आपल्या सुनिर्मित नांवाच्या अध्यक्षाकडे, त्यानें परनिर्मितवशवर्ती देवांकडे, त्यांनी आपल्या अध्यक्षाकडे पाठविलें, व त्या अध्यक्षानें त्याला ब्रह्मकायिक देवांकडे पाठविलें.

३०. "त्यांनाहि हा प्रश्न ठाऊक नव्हता. ते म्हणाले, 'आम्हाला तुझ्या प्रश्नाचें उत्तर देतां येत नाहीं. परन्तु आमचा महाब्रह्मा हा प्रश्न सोडवूं शकेल.' भिक्षु म्हणाला, 'पण तो सध्या कोठें आहे ?' ब्रह्मकायिक म्हणाले, 'तें आम्हाला ठाऊक नाहीं. पण अशीं चिन्हें दिसतात कीं, ब्रह्मा येथें प्रगट होईल; कारण आलोक आणि अवभास दिसत आहे.'

३१. "इतक्यांत ब्रह्मा तेथें प्रगट झाला. तेव्हां त्या भिक्षूनें हा प्रश्न त्याला विचारला. त्यावर ब्रह्मा म्हणाला, 'मी ब्रह्मा आहें; अभिभू, अनभिभूत, सर्वदर्शी, वशवर्ती, ईश्वर, कर्ता, निर्माता, श्रेष्ठ, सर्जिता, वशी आणि भूत-भविष्य प्राण्यांचा पिता आहें.' भिक्षु म्हणाला, 'पण हें विचारण्यासाठीं मी आलों नाहीं. पृथ्वी, आप, तेज व वायु हीं चार महाभूतें पूर्णपणें कोठें विलय पावतात, हा माझा प्रश्न आहे.'

३२. "महाब्रह्म्यानें आपल्या भाषणाची पुनरुक्ति केली. पण त्यामुळें भिक्षूचें समाधान न होतां भिक्षूनें तोच प्रश्न पुन्हा विचारला. असें तीनदां घडलें. चौथ्या वेळीं जेव्हां भिक्षूनें तो प्रश्न विचारला, तेव्हां ब्रह्मदेवानें त्या भिक्षूला हाताला धरून एका बाजूला नेलें, व तो म्हणाला, 'हे भिक्षु, हे जे ब्रह्मकायिक देव आहेत ते समजतात कीं, मला अज्ञात अशी वस्तु नाहीं, मी पाहिली नाहीं अशी वस्तु नाहीं. तेव्हां त्यांच्यासमोर मला हें सांगतां आलें नाहीं कीं, हा तुझा प्रश्न मला माहीत नाहीं. भगवंताला सोडून तूं माझ्याकडे आलास, हा तुझा अपराध आहे; हें तुझें अकृत्य आहे. आतां तूं त्या भगवंताजवळ जा, व त्याला हा प्रश्न विचार, आणि तो जें उत्तर देईल तें योग्य असें समज."[१]

३३. ही झाली महाब्रह्म्याची गोष्ट. परन्तु बौद्ध श्रमणांची एका ब्रह्मदेवानें तृप्ति झाली नाहीं; त्यांनी अनेक ब्रह्मदेव निर्माण केले. त्यांपैकीं सहंपति ब्रह्मा हा बुद्धाचा विशेष भक्त दिसतो. "उरुवेला येथें बुद्धानें जेव्हां प्रथमतः धर्म जाणला, तेव्हां त्याच्या मनांत असा विचार आला कीं, 'हा धर्म मी मोठ्या

---

१ दीघनिकाय, केवट्टसुत्त.

प्रयासानें जाणला आहे. तो लोकांना उपदेशिणें योग्य नाहीं. कां कीं, रागद्वेषानें बद्ध झालेले लोक हा धर्म सुगमपणें जाणूं शकणार नाहींत. प्रवाहाच्या उलट जाणारा, सूक्ष्म, गंभीर, दुर्दर्श आणि अणुमय असा हा धर्म अंधकारानें व्यापलेले लोभी लोक जाणूं शकणार नाहींत !'

३४. "बुद्धाचा हा विचार सहंपति ब्रह्म्याला समजला. तो आपल्याशींच उद्गारला, 'तथागत अर्हंत सम्यक संबुद्ध विशेष खटपटींत न पडण्याचा विचार करतो ! धर्मोपदेश करण्याचा विचार करीत नाहीं. हाय ! हाय ! ह्या लोकाचा विनाश होणार !' तेव्हां एकदम ब्रह्मा बुद्धासमोर प्रगट झाला व बुद्धाला हात जोडून म्हणाला, 'भगवन् ! तूं धर्मोपदेश कर. जगांत अल्परजस्क प्राणी आहेत. धर्म न ऐकल्यामुळें त्यांची हानि होत आहे. ते तुझा धर्म जाणतील. हे भगवन्, ह्या मगध देशांत मलिन माणसांनी उपदेशिलेला धर्म चालू आहे. ह्या लोकांसाठीं तूं हें अमृतद्वार मुक्त कर. निर्मल बुद्धानें जाणलेला हा धर्म लोकांना ऐकूं दे'......ही ब्रह्मदेवाची विनंती ऐकून प्राण्यांवरील करुणेमुळें बुद्धानें धर्मोपदेश करण्याचा बेत केला."[1]

३५. बुद्धाच्या वेळीं ब्रह्मसायुज्यतेला कसें जावें यासंबंधीं ब्राह्मण वर्गांत बराच मतभेद होता असें दिसतें. त्याचें थोडेसें वर्णन दीघ निकायांतील तेविज्जसुत्तांत आलें आहे, तें असें— "एके समयीं भगवान् कोसल देशांत प्रवास करीत असतां मनसाकट नांवाच्या ब्राह्मणग्रामाला आला, व तेथें त्या गांवाच्या

---

१ विनयमहावग्ग, महाक्खन्धक, ब्रह्मयाचनकथा; मज्झिमनिकाय, अरियपरियेसनसुत्त.

उत्तरेस अचिरवती नदीच्या तीरीं आम्रवनामध्यें वस्तीला राहिला. त्या वेळीं चंकी, तारुक्ख, पोक्खरसाति, जानुस्सोणि, तोदेय्य इत्यादि प्रसिद्ध ब्राह्मण मनसाकट येथें रहात असत. त्यांपैकीं वासिष्ठ आणि भारद्वाज या दोन तरुण ब्राह्मणांत एक वाद उपस्थित झाला. वासिष्ठ म्हणे कीं, पोक्खरसाति ब्राह्मणानें सांगितलेलाच ब्रह्मसायुज्यतेचा मार्ग बरोबर आहे. भारद्वाज म्हणे, तारुक्ख ब्राह्मणानें सांगितलेला मार्गच ठीक आहे. ते उभयतां परस्परांचें समाधान करूं शकले नाहींत. तेव्हां वासिष्ठ भारद्वाजाला म्हणाला, 'आजकाल हा श्रमण गोतम शाक्यपुत्र आम्रवनांत रहात आहे. तेथें जाऊन त्याला हा प्रश्न आम्ही विचारूंया.'

३६. "ते दोघेहि बुद्धाजवळ आले आणि त्यांनी त्याला हा प्रश्न विचारला. त्यावर भगवान् म्हणाला, 'तुम्ही निरनिराळे मार्ग मानतां. त्यांत तुमचा मतभेद आहे तो कोणता ?' वासिष्ठ म्हणाला, 'अध्वर्य ब्राह्मण, तैत्तिरीय ब्राह्मण, छांदोग्य ब्राह्मण, बह्वृच ब्राह्मण ब्रह्मसायुज्यतेचा निरनिराळा रस्ता सांगतात; तरी ते सर्व मार्ग ब्रह्मसायुज्यतेला जातातच. जसे एकाच गांवाला किंवा निगमाला निरनिराळे रस्ते येऊन मिळतात, तसे निरनिराळ्या ब्राह्मणांनी उपदेशिलेले हे मार्ग ब्रह्मसायुज्यतेलाच जातात.' भगवान् म्हणाला, 'पण, हे वासिष्ठ, एकाद्या ब्राह्मणानें किंवा त्यांच्या आचार्य-प्राचार्यांपैकीं कोणी तरी, अथवा वामदेव विश्वामित्रादिक मंत्रद्रष्ट्या ऋषींनी ब्रह्मदेवाला पाहिलें आहे काय ?'

३७. "वासिष्ठानें 'नाहीं' असें उत्तर दिलें. त्यावर भगवान् म्हणाला, 'असें असतां त्रैविद्य ब्राह्मण ब्रह्मसायुज्यतेचा मार्ग दाखवतात हें विलक्षण नव्हे काय ?' वासिष्ठ म्हणाला, 'होय, भो

गोतम.' भगवान् म्हणाला, 'मग ही ब्राह्मणांची अंधपरंपरा म्हणावयाची. हे वासिष्ठ, चंद्र आणि सूर्य यांना ब्राह्मण पहातात, त्यांची प्रार्थना करतात, स्तुति करतात, आणि त्यांना नमस्कार करतात. असें असतां त्यांच्या सायुज्यतेचा मार्ग ते दाखवूं शकतील काय ?' वासिष्ठ म्हणाला, 'नाहीं, भो गोतम.'

३८. "भगवान् म्हणाला, 'मग ज्या ब्रह्म्याला ते पहात नाहींत, त्याच्या सायुज्यतेचा मार्ग ते दाखवूं शकतील हें शक्य नाहीं. उदाहरणार्थ, एकादा मनुष्य म्हणेल कीं, या प्रदेशांत जी अत्यंत सुस्वरूप तरुणी आहे तिच्यावर माझें प्रेम जडलें आहे. त्याला इतर लोक विचारतील कीं, बा मनुष्या, अशी सुन्दर तरुणी आहे तरी कोणच्या जातीची ? तिचें नांव काय, गोत्र काय, ती उंच आहे कीं ठेंगणी, तिची कांति कशा प्रकारची व तिचा पत्ता काय ? असें विचारलें असतां तो मनुष्य म्हणेल, तें कांहीं मला माहीत नाहीं. तर मग त्या माणसाचें बोलणें फोल ठरणार नाहीं काय ? दुसरा एकादा माणूस जेथें चार रस्ते मिळतात त्या ठिकाणीं एक जिना बांधण्यास आरंभ करील. त्याला लोक विचारतील कीं, हा जो तूं जिना बांधतोस तो कोणत्या प्रासादावर चढण्यासाठीं ? त्यावर तो म्हणेल कीं, तो प्रासाद मला माहीत नाहीं. अशा माणसाचें बोलणें फोल ठरणार नाहीं काय ? त्याचप्रमाणें ज्या त्रैविद्य ब्राह्मणांना ब्रह्मदेवाची मुळींच माहिती नाहीं, त्यांनी त्याच्या सायुज्यतेचा मार्ग सांगणें हें व्यर्थ ठरत नाहीं काय ?' वासिष्ठ म्हणाला 'होय, भो गोतम'.

३९. "भगवान् म्हणाला, 'हे वासिष्ठ, ही अचिरवती नदी पाण्यानें तुडुंब भरली आहे. एकादा मनुष्य ह्या बाजूला येऊन पलीकडल्या तीराला जाण्याच्या उद्देशानें प्रार्थना करील कीं, हे परतीरा, माझ्याकडे ये ! हे परतीरा, माझ्याकडे ये ! त्याच्या

त्या प्रार्थनेमुळें ( समोर दिसणारें ) परतीर त्याच्याकडे येईल काय ?' वासिष्ठ म्हणाला, 'नाहीं, भो गोतम'. भगवान् म्हणाला, 'ह्याच प्रमाणें, हे वासिष्ठ, ब्रह्मदेवाला युक्त अशा गुणांचा अंगीकार न करतां आणि ब्रह्मदेवाला न शोभण्यासारखे गुण अंगीकारून त्रैविद्य ब्राह्मण इंद्राची प्रार्थना करतात, वरुणाची प्रार्थना करतात, प्रजापतीची प्रार्थना करतात; परंतु या त्यांच्या प्रार्थनेमुळें ते ब्रह्मसायुज्यतेला जातील हें संभवत नाहीं.'

४०. "पुनः भगवान् म्हणाला, 'हे वासिष्ठ, एकादा मनुष्य परतीरीं जाण्याच्या हेतूनें ह्या कांठीं आला, व जर त्याला येथें घट्ट बांधून ठेवण्यांत आलें, तर तो परतीरीं जाऊं शकेल काय ?' वासिष्ठ म्हणाला, 'नाहीं, भो गोतम.' भगवान् म्हणाला, 'त्याच प्रमाणें, हे वासिष्ठ, पंचेंद्रियांचे पांच विषय इहलोकींचीं दृढ बंधनें आहेत. ह्या बंधनांनी त्रैविद्य ब्राह्मण बांधले गेले आहेत, ( म्हणजे ते ह्या पांच विषयांचा यथास्थित उपभोग घेत आहेत. ) असें असतां ते ब्रह्मसायुज्यतेला जातील हें शक्य नाहीं.'

४१. "पुनः भगवान् म्हणाला, 'हे वासिष्ठ, दुसरा एकादा माणूस ह्या अचिरवतीच्या कांठीं परतीराला जाण्याच्या उद्देशानें येईल, आणि डोकयावरून पांघरूण घेऊन येथेंच निजेल. तो परतीरीं जाऊं शकेल काय ?' वासिष्ठ म्हणाला, 'नाहीं, भो गोतम.' भगवान् म्हणाला, 'त्याचप्रमाणें, हे वासिष्ठ, कामच्छन्द, व्यापाद, स्त्यानमिद्ध ( आळस॰), औधत्य ( भ्रान्तचित्तता ), आणि विचिकित्सा ( शंका ), हीं पांच बुद्धीचीं आवरणें आहेत. त्या आवरणांनी आवृत झालेले त्रैविद्य ब्राह्मण ब्रह्मसायुज्यतेला जातील, हें संभवत नाहीं.'

४२. "पुनः भगवान् म्हणाला, 'हे वासिष्ठ, आतां मी तुला हें विचारतो कीं, ब्रह्मा सपरिग्रह कीं अपरिग्रह ? सवैरचित्त कीं

अवैरचित्त ? सव्यापादचित्त कीं अव्यापादचित्त ? संक्लिष्टचित्त कीं असंक्लिष्टचित्त ? वशवर्ती कीं अवशवर्ती ?' वासिष्ठ म्हणाला, 'भो गोतम, ब्रह्मा अपरिग्रह, अवैरचित्त, अव्यापादचित्त, असंक्लिष्टचित्त व वशवर्ती आहे.' भगवान् म्हणाला, 'हे वासिष्ठ, त्रैविद्य ब्राह्मण सपरिग्रह कीं अपरिग्रह ? सवैरचित्त कीं अवैरचित्त ? सव्यापादचित्त कीं अव्यापादचित्त ? संक्लिष्टचित्त कीं असंक्लिष्टचित्त ? वशवर्ती कीं अवशवर्ती ?' वासिष्ठ म्हणाला, 'भो गोतम, त्रैविद्य ब्राह्मण सपरिग्रह, सवैरचित्त, सव्यापादचित्त, संक्लिष्टचित्त व अवशवर्ती आहेत.' भगवान् म्हणाला, 'तर मग, हे वासिष्ठ, असे ब्राह्मण, अपरिग्रह, अवैरचित्त, अव्यापादचित्त, असंक्लिष्टचित्त आणि वशवर्ती ब्रह्म्याच्या सायुज्यतेला जातील हें संभवत नाहीं."

४३. इंद्राच्या पश्चात् ब्राह्मणांनी ब्रह्मदेवाला मोठ्या पदवीला चढविलें खरें, पण तें त्यांच्या गळीं आलें. असा जो दयामय आणि सर्वगुणसंपन्न ब्रह्मा त्याच्या सायुज्यतेला जाण्याला ब्राह्मणहि दयामय आणि सर्वांशीं समभावानें वागणारे हवेत. हें तर ब्राह्मणांना इष्ट नव्हतें; कारण दृढ होत चाललेल्या जातिभेदांमुळें त्यांना मिळालेलें वर्चस्व सोडण्याला ते तयार नव्हते; मग समभावानें वागणें कसें शक्य होणार ? अर्थात् लवकरच त्यांना ह्या ब्रह्मदेवाचा नाद सोडून द्यावा लागला ! एवढा मोठा ब्रह्मा; त्याचें तेवढें एकच मंदिर अजमीर जवळ पुष्कर येथें शिलक राहिलें आहे ! दुसरें एक लहानसें मंदिर बंगाल प्रान्तांत कोठें तरी आहे असें ऐकतों. पण तें फारसें प्रसिद्ध नाहीं.

४४. कविकुलगुरु कालिदासानें तर ह्या ब्रह्मदेवाची नुसती थट्टाच उडवली आहे. त्याच्या विक्रमोर्वशीय नाटकांत पुरूरवा उर्वशीला पाहून म्हणतो—

अस्याः सर्गविधौ प्रजापतिरभूच्चन्द्रो नु कान्तिप्रदः
श्रृंगारैकरसः स्वयं नु मदनो मासो नु पुष्पाकरः।
वेदाभ्यासजडः कथं नु विषयव्यावृत्तकौतूहलो
निर्मातुं प्रभवेन्मनोहरमिदं रूपं पुराणो मुनिः?

[अंक १ श्लोक ९ किंवा १०]

( हिला रचण्यासाठीं कान्तिप्रद चन्द्र, अथवा श्रृंगाररसपरिपूर्ण असा स्वतः मदन, किंवा वसन्त मास प्रजापति झाला असेल काय? कारण वेदाभ्यासानें ज्याची मति जड झाली आहे, विषयामध्यें ज्याला मजा वाटत नाहीं, तो पुराणा मुनि असें हें मनोहर रूप निर्माण करण्यास कसा समर्थ होईल? ).

४५. येथें कवीनें वैदिक ब्रह्मदेव व बुद्धसमकालीन ब्रह्मदेव ह्या दोहोंचेंहि मिश्रण केलें आहे. वेदकाळीं तो नुसता मंत्र म्हणणारा होता, व बुद्धकाळीं जगाचा कर्ता बनला. पण ब्राह्मणांच्या आणि बौद्ध श्रमणांच्या ओढाताणींत सांपडल्यामुळें बिचाऱ्याला कोठेंच स्थान मिळेना, आणि अशा रीतीनें कवीला वाटेल तशी त्याची थट्टा करण्यास मुभा मिळाली!

४६. वेदांत ब्रह्म म्हणजे मंत्र. पण बुद्धकाळीं त्याचा अर्थ श्रेष्ठ असा होऊं लागला. होतां होतां जगांतील श्रेष्ठ तत्त्वाला ब्रह्म म्हणूं लागले; व त्याच दृष्टीनें तें अद्यापिहि अस्तित्वांत आहे. त्याची मात्र थट्टा झाली नाहीं.

## अशोकापासून शकांपर्यंत

४७. अशोकाच्या वेळीं यज्ञयागांचें महत्त्व निखालस कमी झालें. पहिल्याच शिलालेखांत अशोकानें पशुवधयुक्त यज्ञाला मनाई केली आहे. आणि शेवटपर्यंत त्यानें पशुवधाविरुद्ध

लोकमत बनवण्याची खटपट केल्याचें त्याच्या शिलालेखांवरून दिसून येतें. यज्ञयाग बंद करून वैदिक देवांपैकीं एकाद्या देवाला, किंवा त्यानंतर ब्राह्मणांनी तयार केलेल्या ब्रह्मदेवाला अशोकानें आपला कुलदेव केलें असतें, तर पुजारी ह्या नात्यानें ब्राह्मणांची व्यवस्था होऊं शकली असती. परन्तु तसें न करतां त्यानें बुद्धालाच आपलें दैवत बनवलें. बुद्धोपासक होऊन प्रयत्न केल्यानें आपण ह्या देशांतले देव जे खरे समजले जात होते ते खोटे ठरवले, असें तो म्हणतो.[१] अर्थात् बुद्धाशिवाय दुसऱ्या कोणाचाहि अशोक भक्त नव्हता. ब्राह्मणांना त्यानें इतर रीतीनें त्रास दिला असें नव्हे. पालि वाङ्मयांत श्रमण-ब्राह्मण असा समास आढळतो. पण अशोकाच्या शिलालेखांत ब्राह्मणांना प्रथम घातलें आहे ( ब्राह्मणसमणानं साधु दानं ). यावरून असें दिसतें कीं, अशोक ब्राह्मणांनाहि दानधर्म करीत असे. पण त्या दानधर्मामागें यज्ञयागपुरस्सर जो ब्राह्मणांचा मान असावयास पाहिजे तो नव्हता.

४८. यज्ञयाग गेले आणि वैदिक देवहि गेले; मग नुसत्या भिक्षुकीनें पोट भरण्याची पाळी आल्यावर ब्राह्मणांचा मान तो कसला राहिला ? गृह्यसंस्कारांत गृहस्थांना थोडीबहुत मदत करून आपला निर्वाह कसा बसा चालवण्याची ब्राह्मणांवर पाळी आली. पुराणांतरीं मौर्य राजांची शूद्रांत गणना करून ब्राह्मणांनी जो त्यांच्यासंबंधीं इतका तिरस्कार दाखविला आहे, त्याचें रहस्य यांतच आहे.

४९. मौर्यांचा अस्त झाल्यावर पुष्यमित्र उदयाला आला.

---

१ जंबुदीपसि अमिसा देवा हुसु ते दानि मिसा कटा ॥ रूपनाथ शिलालेख.

त्यानें ब्राह्मणी धर्माचें म्हणजे यज्ञयागांचें पुनरुज्जीवन करण्या-चा प्रयत्न केला. परंतु तो फारसा सिद्धीस गेल्याचें दिसून येत नाहीं. आजूबाजूच्या बौद्धांना त्यानें थोडा बहुत त्रास दिला असावा. परंतु बौद्ध धर्म अशोककाळींच चारी दिशांना फैलावून बराच दृढ झाला होता. त्याचें अल्पस्वल्प प्रयत्नानें उन्मूलन करणें शक्य नव्हतें.

५०. दुसरें हें कीं, पुष्यमित्राच्या वेळीं यवन ( ग्रीक ), शक वगैरे बाहेरच्या लोकांच्या पुन्हा हिंदुस्थानावर स्वाऱ्या होऊं लागल्या. ह्या लोकांत जातिभेद नसल्या कारणानें सामान्य व्यवहारांत त्यांचा कल ब्राह्मणधर्मापेक्षां बौद्ध धर्माकडे विशेष होता. त्यांच्याकडून यज्ञयागांना मदत होणें शक्य नव्हतें. अर्थात् पुष्यमित्र आणि अग्निमित्र यांच्यानंतर राजकीय यज्ञ-याग बंद पडले, व त्यांना बरींच शतकें डोकीं वर काढतां आलीं नाहींत.

५१. या संबंधानें डॉ० रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांच्या 'A Peep into the Early History of India' या लहानशा पण अत्यंत उपयुक्त पुस्तकांतील एक लहानसा उतारा येथें देणें प्रशस्त वाटतें. 'Thus from about the beginning of the second century before christ, to about the end of the fourth century after, princes of foreign races were prominent in the history of India and ruled sometimes over a large portion of the country up to the limits of Maharashtra......During this period it is the religion of the Buddha alone that has left prominent traces, and was professed by the majority of the people." (p. 44). (याप्रमाणें सरासरी खिस्ती शकाच्या

पूर्वी दुसऱ्या शतकाच्या आरंभापासून सरासरी चौथ्या शतकाच्या अंतापर्यंत हिंदुस्थानाबाहेरील राजे लोकांनाच हिंदुस्थानांत महत्त्व आलें होतें, आणि मधून मधून त्यांची सत्ता फार मोठ्या प्रदेशांत महाराष्ट्राच्या मर्यादेपर्यंत पोंचली होती....ह्या कालांत बौद्धधर्म तेवढा प्रामुख्यानें अस्तित्वांत असल्याचीं चिन्हें दिसून येतात; आणि हाच धर्म बहुजनांचा होता. ) अशा परिस्थितींत ब्राह्मणांना एक नवीन दैवत सांपडलें. तें कोणतें हें पुढील विवेचनावरून दिसून येईल.

# महादेव

५२. महादेवाचा आणि वैदिक रुद्राचा निकट संबंध आहे. रुद्राच्या ऋचा ऋग्वेदांत बऱ्याच आहेत. त्यांवरून असें दिसून येतें कीं, इंद्राचे जे साथी मरुत् त्यांचा तो पूर्वज होता, 'आ ते पितर्मरुतां सुम्नमेतु', ऋ० २।३३।१. तो कपर्दी होता. कपर्द म्हणजे जटा समजण्यांत येते. परंतु वैदिक काळीं कपर्द म्हणजे शीख लोक बांधतात तशा प्रकारचा केसांचा बुचडा होता, असें वाटतें. कारण 'कपर्दिनो धिया धीवन्तो असपन्त तृत्सवः', ऋ० ७।८३।८, येथें सर्व तृत्सूंनाच 'कपर्दिनः' म्हटलें आहे. सर्व तृत्सु जटाधारी असणें शक्य नाहीं. बाबिलोनियामध्यें अक्केडियन लोकांत बुचडा बांधण्याची वहिवाट होती. पण सुमेरियन लोकांत ती नव्हती. तेव्हां हा मरुतांचा पूर्वज रुद्र अक्केडियनांप्रमाणें बुचडा बांधीत असावा.

५३. रुद्र स्वतः इंद्रसमकालीं हयात होता असें दिसत नाहीं. निदान तशा रीतीचा उल्लेख ऋग्वेदांत सांपडला नाहीं. पण त्याचे जे वंशज मरुत् त्यांची इंद्राला अतिशय मदत

झाल्याचीं वर्णनें अनेक ठिकाणीं आहेत. उदाहरणार्थ ऋग्वेदाच्या आठव्या मंडळांतील शहात्तराव्या सूक्तांत इंद्राला मरुत्सखा व मरुत्वान् हीं दोन्हीं विशेषणें लावण्यांत आलीं आहेत. अर्थात् इंद्राच्या विजयाला मरुतांची फार मदत झाली हें सांगणें नलगे.

५४. आतां हे मरुत् कोण असावेत, असा प्रश्न उपस्थित होतो. त्यांना रुद्राः, रुद्रियाः, आणि रुद्रासाः असें म्हटलें आहे. त्यावरून ते रुद्राचे वंशज किंवा भक्त होते एवढेंच सिद्ध होतें. 'सं ता इन्द्रो असृजदस्य शाकैः' ऋ० ५।३०।१०, येथें सायणाचार्य शाक याचा अर्थ मरुत् असा करतात; आणि तो ऋ० ४।१७।११, ऋ० ६।१९।४, ऋ० ६।२४।४ इत्यादिक ऋचांमध्येंहि लागू पडण्यासारखा आहे. सायणाचार्यांच्या म्हणण्याप्रमाणें मरुत् हेच शाक होते असें गृहीत धरलें, तर शकांचे पूर्वज हे मरुतच होत, असें अनुमान करणें अगदींच निरर्थक होणार नाहीं. तेव्हां आपण असें धरून चालू कीं, इंद्राच्या पूर्वींहि ह्या शक लोकांत रुद्राची पूजा चालू होती. पण खुद्द ऋग्वेदाच्या काळीं रुद्राचें महत्त्व इंद्राइतकें खास नव्हतें.

५५. परंतु यजुर्वेदाच्या काळीं ही स्थिति कांहीं अंशीं पालटली असावी. तैत्तिरीय संहितेच्या चौथ्या काण्डाच्या पांचव्या प्रपाठकांत रुद्राची जी स्तुति आहे त्यांत एकच रुद्र नव्हे पण अनेक रुद्र सांपडतात. त्यावरून ह्या प्रकरणाला शतरुद्रीय असेंहि म्हणतात. त्यांतले कांहीं उतारे येथें देतों.

( १ )

५६. "हे रुद्र, तुझ्या क्रोधाला नमस्कार असो.
तुझ्या बाणाला नमस्कार असो. धनुष्य धारण
करणाऱ्या तुला नमस्कार असो. तुझ्या बाहूंना
नमस्कार असो. तुझा बाण सुखकारक होवो.

तुझें धनुष्य सुखकारक होवो. तुझा जो भाता त्यानें आमचें रक्षण कर....नीलग्रीवाला, सहस्राक्षाला, वृष्टिकर्त्याला तुला नमस्कार असो. आणि ह्याचे जे सेवक आहेत त्यांनाहि मी नमस्कार करतों...तुझ्या धनुष्याचें शरसंधान आमच्यावर होऊं देऊं नकोस. तुझा भाता आमच्या पासून दूर ठेव."

( २ )

५७. "हिरण्य बाहूला, सेनापतीला, दिशांच्या स्वामीला नमस्कार असो. हरितपर्ण वृक्षांना आणि पशूंच्या पतीला नमस्कार असो...."

( ३ )

५८. ...उन्नताला, धनुर्योध्याला, चोरांच्या अधिपतीला नमस्कार असो. धनुर्योध्याला, बाणांचा भाता धारण करणाऱ्याला, दरोडेखोरांच्या अधिपतीला नमस्कार असो...धनुष्यबाण धारण करणाऱ्या तुम्हाला नमस्कार असो.[१]..."

( ४ )

५९. "...व्रातांना आणि व्रातपतींना तुम्हाला नमस्कार असो. गणांना आणि गणपतींना तुम्हाला नमस्कार असो. विरूपांना आणि विश्वरूपांना तुम्हाला नमस्कार असो. महंतांना आणि क्षुल्लकांना तुम्हाला नमस्कार असो. रथींना आणि अरथींना तुम्हाला नमस्कार असो. रथांना आणि

---

१. येथून बहुवचनीं प्रयोग सुरू झाला हें लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे.

रथांच्या अधिपतींना तुम्हाला नमस्कार असो. सेनांना आणि सेनाधिपतींना तुम्हाला नमस्कार असो. ...सुतारांना व रथ तयार करणाऱ्यांना तुम्हाला नमस्कार असो. कुंभारांना आणि लोहारांना तुम्हाला नमस्कार असो. पुंजिष्ठांना आणि निषादांना तुम्हाला नमस्कार असो. बाण आणि धनुष्यें तयार करणाऱ्यांना तुम्हाला नमस्कार असो. शिकार करणाऱ्यांना आणि कुत्रे पाळणाऱ्यांना तुम्हाला नमस्कार असो. कुत्र्यांना आणि कुत्र्यांच्या अधिपतींना तुम्हाला नमस्कार असो."

( ५ )

६०. "भवाला व रुद्राला नमस्कार असो. शर्वाला व पशुपतीला नमस्कार असो. नीलकंठाला आणि श्वेतकंठाला नमस्कार असो. कपर्दीला आणि शिरोमुण्डन केलेल्याला नमस्कार असो...."

( ८ )

६१. "सोमाला आणि रुद्राला नमस्कार असो. ताम्राला आणि अरुणाला नमस्कार असो. शंगाला आणि पशुपतीला नमस्कार असो. उग्राला आणि भीमाला नमस्कार असो...."

६२. ऋग्वेदामध्यें ह्यापैकीं कांहीं विशेषणें सांपडतात. परंतु येथें त्यांचा बराच विकास झाला आहे, असें दिसून येतें. येथें रुद्राला चोरांचा, दरोडेखोरांचा आणि व्रातांचा अधिपति म्हटलें आहे. तसाच गणांचा, पुंजिष्ठांचा आणि निषादांचा तो अधिपति आहे; कुंभार, लोहार इत्यादिकांचाहि अधिपति आहे. याशिवाय भव, शर्व, पशुपति, नीलकण्ठ इत्यादिक त्याचीं नांवें

येथें विशेष सांपडतात. यावरून असें अनुमान करतां येणें शक्य आहे कीं, यजुर्वेदाच्या काळीं अशा नांवांनी सरहद्दीवरील डोंगराळ प्रदेशांतील लोक आपल्या देवतांची पूजा करीत असत. ते झाडांचीहि पूजा करीत. वायव्य सरहद्दीवरील लोक आजला जसे चोऱ्या आणि दरोडे यांनी आपला निर्वाह करतात, तसे ते यजुर्वेदाच्या काळींहि करीत असावेत. त्यांना आटोक्यांत ठेवण्याला मोठें सैन्य बाळगणें ब्राह्मणांना शक्य नव्हतें. तेव्हां त्यांचे जे भव, शर्व इत्यादिक देव होते ते रुद्रच आहेत असें भासवून ह्या टोळयांतील लोकांना वळवण्याचा हा प्रयत्न असावा. तो कितपत सिद्धीला गेला असेल, हें सांगतां येत नाहीं.

६३. होतां होतां या सगळया टोळयांच्या देवतांमधून भव आणि शर्व हे दोनच देव अथर्व वेदाच्या काळीं पुढें आले असें दिसतें. कदाचित लहान सहान टोळयांचा पराभव करून दोन प्रमुख टोळयांनी इतरांवर स्वामित्व स्थापन केलें, व त्या दोन टोळयांचे हे दोन देव शिल्लक राहिले असावेत. अथर्व वेदाच्या चौथ्या कांडाच्या अठ्ठाविसाव्या सूक्तांत त्यांची प्रार्थना सांपडते ती अशी—

भव शर्वौ मन्वे वां तस्य वित्तं ययोर्वामिदं प्रदिशि यद्विरोचते ।
यावस्येशाथे द्विपदो यौ चतुष्पदस्तौ नो मुञ्चतमंहसः ॥

( हे भव आणि शर्व हो ! सर्व दिशांत जे तुम्ही प्रकाशत अहां, तें तुमचें सामर्थ्य होय. जे तुम्ही द्विपदांवर आणि चतुष्पदांवर स्वामित्व बाळगतां, ते तुम्ही आम्हाला पापापासून मुक्त करा. )

६४. पुन्हा अकराव्या कांडाच्या दुसऱ्या सूक्तांत प्रार्थना आहे ती अशी—

भव शर्वौ मृडतं माभि यातं भूतपती पशुपती नमो वाम् ।
प्रतिहितामा यतां मा वि स्राष्टं मा नो हिंसिष्टं द्विपदो मा चतुष्पदः ॥

( हे भव आणि शर्व हो ! आमचें रक्षण करा. आमच्या जवळ येऊं नका. भूतपति आणि पशुपति असे जे तुम्ही त्या तुम्हाला नमस्कार असो. धनुष्याला लावलेला बाण आमच्यावर सोडूं नका. आम्हाला, आमच्या द्विपदांना आणि चतुष्पादांना मारूं नका. )

६५. अथर्ववेदानंतर शतपथ ब्राह्मणाच्या वेळीं सरहद्दीवरील या सगळ्या देवांना अग्नीचें स्वरूप देण्याचा प्रयत्न दिसतो. "प्रजापतीला उषोदेवीपासून एक कुमार झाला, व तो रडायला लागला. प्रजापति म्हणाला, 'कां रडतोस?' 'मला नांव नाहीं म्हणून; मला नांव ठेवा.' तेव्हां तो रडतो म्हणून त्याला रुद्र हें नांव ठेवण्यांत आलें. पुन्हा त्यानें आणखी एक नांव देण्यास सांगितलें. तेव्हां त्याला सर्व ( शर्व ) असें नांव देण्यांत आलें. सर्व म्हणजे पाणी. कां कीं, त्याच्यापासून सर्व उत्पन्न होतें. त्यानंतर त्याला पशुपति हें नांव देण्यांत आलें. पशुपति म्हणजे वनस्पति. त्या मिळाल्या म्हणजे पशु जगतात. त्यानंतर त्याला उग्र हें नांव देण्यांत आलें. उग्र म्हणजे वायु. तो जेव्हां जोरानें वाहतो तेव्हां उग्र वाहतो असें म्हणतात. त्यानंतर त्याला अशनि हें नांव देण्यांत आलें. अशनि म्हणजे वीज. मागाहून त्याला भव हें नांव देण्यांत आलें. भव म्हणजे पाऊस. त्यापासून सर्व होतें ( भवति ). नंतर त्याला महान्देव असें नांव देण्यांत आलें. महान्देव म्हणजे चंद्र. नंतर ईशान हें नांव देण्यांत आलें. ईशान म्हणजे सूर्य...हीं आठहि अग्नीचीं रूपें आहेत; आणि नववा कुमार." [शत० ब्रा० ६।१।३] कुमार, भव, शर्व इत्यादि ज्या देवता सरहद्दीवरील प्रांतांत पुजल्या जात असतात त्यांना यज्ञांमध्यें दाखल करून यज्ञाचें प्रस्थ वाढविण्याचा हा प्रयत्न आहे.

६६. त्यानंतर आश्वलायन-गृह्यसूत्रांत या देवतांना रुद्ररूपी समजून त्यांच्या नांवांनी शूलगव नांवाचा यज्ञ कसा करावा याचें वर्णन सांपडतें. "शूलगव शरत्कालांत किंवा वसंतकालांत करावा. तो आर्द्रा नक्षत्रांत करावा. आपल्या गोठ्यांतील सगळयांत उत्तम बैल निवडून घ्यावा. तो पृषद्वर्ण असावा. चित्रवर्ण असेंहि कोणी म्हणतात. उंच वशिंड असलेला काळा असला तर उत्तमच. त्याला तांदळांच्या किंवा यवांच्या पाण्यानें अभिषेक करावा. तो अशा तऱ्हेनें की, 'रुद्राय महादेवाय जुष्टो वर्धस्व'. नंतर त्याला मारून आहुति द्याव्या त्या अशा--'हराय कृपाय शर्वाय शिवाय भवाय महादेवायोग्राय पशुपतये रुद्राय शंकरायेशानायाऽशनये स्वाहा।' त्याचें शेंपूट, चामडें, डोकें व पाय अग्नींत टाकावे. पण शांबव्य आचार्य म्हणतो कीं, चामड्याचा उपभोग घ्यावा." ( अ० ४, खंड १० ).

६७. याच्यावरून असें दिसतें कीं, गृह्यसूत्रांच्या वेळीं महादेव हिंसक होता, व शर्वादिक देवतांचा समावेश त्याच्यांतच झाला होता. हा महादेव अहिंसक कसा बनला हें सांगणें कठीण आहे. येथें अनुमानाशिवाय दुसरा मार्ग नाहीं. कां कीं, त्या काळचा इतिहास अद्यापि उपलब्ध झाला नाहीं.

६८. बुद्धाच्या हयातींत त्याची कीर्ति सरहद्दीपर्यंत पसरल्याचा दाखला पालि ग्रंथांत सांपडतो. महाकप्पिन सरहद्दीवरील राजकुलांत जन्मला व पित्याच्या मरणानंतर राजा झाला. श्रावस्तीहून आलेल्या व्यापाऱ्यांकडून भगवंताची कीर्ति ऐकून भिक्षु होण्यास तो उत्सुक झाला, व आपल्या उद्यानांतून आपल्या अमात्यांसह परस्पर श्रावस्तीला जाण्याला निघाला. त्याची पट्टराणी अनोजादेवी हें वर्तमान ऐकून त्याच्या मागोमाग आपल्या परिवारासह श्रावस्तीला जाण्यास निघाली. भगवंताची

व त्या सर्वांची गांठ चंद्रभागा नदीच्या कांठीं पडली. कप्पिनाला आणि त्याच्या अमात्यांना भगवंतानें भिक्षु केलें, व उप्पलवण्णा भिक्षुणीकडून अनोजादेवीला व तिच्या स्त्रीपरिवाराला भिक्षुणी करविलें.

६९. ही दंतकथा मनोरथपूरणी व सारत्थपकासिनी ह्या दोन अट्ठकथांत सांपडते. संयुत्त निकायाच्या मूळ सुत्तांत कप्पिनासंबंधानें मजकूर आहे तो असा. "भगवान् श्रावस्ती येथें रहात होता. त्यानें आयुष्मान् महाकप्पिनाला येतांना दुरून पाहिलें; आणि तो भिक्षूंना म्हणाला, 'भिक्षुहो, ह्या इकडे येणाऱ्या गोऱ्या, सडपातळ, उंच नाकाच्या भिक्षूला तुम्ही पहात अहां काय? याला सर्व प्रकारची समाधि प्राप्त झाली आहे; आणि ज्यासाठीं कुलपुत्र गृहत्याग करतात, त्या निर्वाणाचा ह्यानें साक्षात्कार करून घेतला आहे."[१]

७०. महाकप्पिन राजकुलांत जन्मला होता कीं नाहीं, हें जरी सांगतां आलें नाहीं, तरी ह्या सुत्तांतील वर्णनावरून तो काबूल किंवा कंदहार ह्या प्रांतांतील रहाणारा असावा असें दिसतें. येथें आम्हाला एवढेंच दाखवावयाचें आहे कीं, बुद्ध भगवंताच्या हयातींतच त्या प्रांतांतील लोकांवर त्याच्या धर्माचा प्रभाव पडूं लागला होता. कुरु देशांत ब्राह्मणांचें प्रस्थ फार होतें, तरी सरहद्दीवरील प्रांतांत बुद्धाचा अहिंसावादी धर्म लोकांना प्रिय होत चालला होता. त्याचा परिणाम असा झाला कीं, ज्या पशुपति महादेवाला मोठ्या बैलाचा बलि देऊन आळवावें लागत असे, तोच महादेव गाईबैलांचा संरक्षक बनला; बैल त्याचें वहान झालें, व त्याच्या मंदिरासमोर नंदीची स्थापना होऊं

---

१. निदानवग्ग, भिक्खुसंयुत्त, सुत्त ११.

लागली. वेमा कद्फिसेस् ( Wema Kadphises ) याच्या नाण्यांवर महेश्वराची मूर्ति व नंदीबैल सांपडतात. याचा काळ अद्यापि निश्चित झाला नाहीं; तरी तो इ० स० पहिल्या शतकाच्या आरंभीं धरण्यास हरकत नाहीं. त्या पूर्वी दोन तीन शतकें तरी महादेवाचें परिवर्तन गोरक्षक महेश्वरदेवांत झालें असावें.

७१. येनाक्षरसमाम्नायमधिगम्य महेश्वरात् ।
कृत्स्नं व्याकरणं प्रोक्तं तस्मै पाणिनये नमः ॥

हा पाणिनीय शिक्षेच्या आरंभीं सांपडणारा श्लोक आहे. त्याच्यावरून असें दिसतें कीं, पाणिनि महेश्वराचा भक्त होता. ह्या दंतकथेला ह्युएन् त्संगच्या प्रवासवर्णनांतहि आधार सांपडतो. तो गांधार देशांत प्रवास करीत असतां शलातुर ह्या गांवीं आला. येथें पाणिनि जन्मला होता. व्याकरणाचे नियम शुद्ध करण्याचा त्यानें बेत केला, व तो ईश्वरदेवाला सांगितला. ईश्वरदेवानें पाणिनीला मदत करण्याचें वचन दिलें. महेश्वराकडून पाणिनि ऋषीनें शास्त्र समजावून घेतलें, आणि मोठ्या प्रयत्नानें व्याकरण रचलें. त्याची श्लोकसंख्या एक हजार; व दर श्लोकाचीं अक्षरें बत्तीस.[१]

७२. आतां एवढेंच ठरवावयाचें कीं, ज्या महेश्वराचा किंवा महादेवाचा भक्त पाणिनि होता तो महादेव पाणिनीच्या वेळीं वर दिलेल्या शूलगवाचा स्वीकार करीत होता कीं काय? आमच्या मतें पाणिनीच्या वेळीं महादेव महेश्वर झाला, आणि महेश्वर झाल्यापासून तो अहिंसक बनला. गांधार देशांतील राजांनी व्यवहारापुरतें बौद्धधर्माला उत्तेजन दिलें. परन्तु कुल-

---

१ Buddhist Records, i, 114-115.

परंपरेनें आलेल्या महादेवाला सोडण्याला ते तयार नव्हते. त्यांच्यांतील एकाद्यानें अशोकाप्रमाणें बौद्ध धर्माचा पूर्णपणें अंगीकार केला असता, तर इतर देव खोटे ठरून अशोकानें म्हटल्याप्रमाणें एक बुद्ध तेवढाच खरा ठरला असता; आणि ताबडतोब बौद्ध श्रमणांनी ब्रह्मदेवाप्रमाणें महादेवाचेंहि परिवर्तन करून त्याला बुद्धाच्या शाखेंत आणलें असतें.

७३. शक राजांच्या राज्याचा जसजसा विस्तार होत गेला, तसतसें महादेवाचेंहि प्रस्थ माजत गेलें. दक्षिणेकडील शालिवाहन कुलांतील राजांचें आणि शकांचें युद्ध झाल्याचें शिलालेखांवरून दिसून येतें. तथापि शालिवाहन वंशांतील राजांनीहि महेश्वराचा अंगीकार केला. म्हणजे त्या काळीं राजेरजवाड्यांत महादेवाची पूजा करणें ही एक फ्याशनच बनली म्हणावयाची. महाराष्ट्रांत मुसलमानांची कारकीर्द नष्ट होऊन मराठ्यांचें राज्य स्थापन झालें तरीहि मराठे सरदारांच्या बायका मुसलमानांकडून घेतलेला पडदा पाळीत असत, व आजलाहि तो कित्येक सरदारांच्या घराण्यांत पाळला जातो. तद्वत् शकांचा प्रभाव कमी होत गेला, तरी महेश्वरदेवाचा प्रसार जिकडे तिकडे वाढत गेला.

७४. अशा वेळीं ब्राह्मणांची स्थिति फार विचित्र झाली. दक्षिणेंत कांहीं राजांनी मधून मधून एकादा यज्ञ केल्याचा उल्लेख सांपडतो. पण त्यामुळें ब्राह्मणांना सतत राजाश्रय मिळणें शक्य नव्हतें. गृह्यसंस्कारांत भाग घेऊन सामान्य जनतेकडून अल्पस्वल्प दक्षिणा मिळविण्याचा मार्ग त्यांना खुला होता. पण तेथेंहि बौद्ध धर्माची अडचण होतीच. कां कीं, सामान्य जनतेवर त्या धर्माचेंच वजन जास्त होतें. तेव्हां ब्राह्मणांना सतत राजाश्रय मिळविण्याचा धोपट मार्ग एकच होता; तो हा कीं, महेश्वर-

देवाचे पुजारी व्हावें; आणि त्यांनी तो पतकरला. वराहमिहिरानें म्हटल्याप्रमाणें ब्राह्मण भस्मभूषित होऊन महेश्वराची पूजा करूं लागले.[१]

७५. शक राजांनी दुसऱ्या एका कल्पनेला फार महत्त्व आणलें. यहुदी लोक आपल्या जेहोवा देवाला जसा जगाचा कर्ता समजत असत, तसा महादेवहि जगाचा कर्ता आहे, अशी शक राजांची समजूत असावी. ही कल्पना त्यांनी यहुदी लोकांकडून घेतली असणें शक्य आहे. कारण पश्चिमेकडे यहुदी लोकांशीं त्यांचा निकट संबंध होता. बायबलमधील जुन्या करारांतील जेहोवा म्हणजे महासंहारक देव; तो क्रुद्ध होऊन काय करील याचा नेम नाहीं. ख्रिस्तानें त्याला सौम्य स्वरूप दिलें. तरी पण नवीन करारामध्यें त्याची प्रार्थना आहे कीं, 'हे देवा, तूं आम्हाला वाईट मार्गाला लावूं नकोस.'[२] म्हणजे जेहोवाचें लोकांना संकटांत पाडण्याचें सामर्थ्य ख्रिस्तानंतरहि कायम होतें म्हणावयाचें !

७६. तसाच कांहींसा प्रकार महादेवाचा दिसतो. वेदकालापासून तहत शकांपर्यंत महादेव म्हणजे अत्यंत क्रूर देव. त्याची प्रार्थना एवढ्याचसाठीं करावयाची कीं, त्यानें भक्तांचा संहार करूं नये. शूलगवादिक यज्ञांच्या रूपानें त्याला जें बलिदान देण्यांत येत असे, तें बौद्ध धर्माच्या प्रभावानें बंद पडलें. तरी पण त्याच्यांतील क्रूरपणा नष्ट झाला नाहीं. त्याची थोडी बहुत संहारक शक्ति कायम राहिली. अशा वेळीं कोणी तरी श्वेताश्वतर नांवाच्या पंडितानें कोणा तरी शक राजाला प्रसन्न करून

---

१ बृहत्संहिता अ० ६०।१९.

२ 'And lead us not into temptation'. [Luke, 11,4.]

घेण्याच्या हेतूनें श्वेताश्वतरोपनिषद् लिहिलें असावें. त्यांत बायबलाप्रमाणेंच भक्तिमार्गाचें महत्त्व वर्णिल्याचें दिसून येतें. हा भक्तिमार्ग बायबलमधून घेतला असेल याला कांहीं आधार नाहीं. परंतु तो बायबलांतून घेतला नाहीं, असेंहि म्हणतां येत नाहीं. बायबलमधील जेहोवा व उपनिषदांमधील परमात्मा ह्यांचें ह्या उपनिषदांत मिश्रण झालेलें सांपडतें; आणि तें कोणत्या तरी शक राजाला प्रसन्न करण्याच्या उद्देशानें केलें असावें, अशी बळकट शंका येते. अल्लोपनिषद् रचून अकबराला संतुष्ट करण्याचा जसा ब्राह्मणांनी प्रयत्न केला, तसाच हाहि असावा.

७७. जेहोवाला बायको नव्हती, पण महादेवाला होती. ही कल्पना कोठून आली हें सांगतां येत नाहीं.[1] पण तिचा फायदा असा झाला कीं, सामान्य लोकांत अनेक देव आणि ज्या अनेक देवी फैलावल्या होत्या त्या सर्वांचा महादेव व पार्वती ह्या जोडप्यांत अंतर्भाव करणें ब्राह्मणांना शक्य झालें. त्यांच्या पूजेनें शकांची आराधना करणें सोपें होतें; आणि दुसऱ्या बाजूला सामान्य जनतेलाहि कह्यांत आणण्याचा तो एक राजमार्ग होता.

७८. महादेव व पार्वती हीं ब्राह्मणांचीं दैवतें नसतां एकाएकीं तीं सर्व देवांपेक्षां श्रेष्ठ कशीं बनलीं, याचें वर्णन महाभार-

---

१ By the side of En-lil in the early days there was ranged a consort, Nin-lil, the queen of the lower world, and when En-lil was identified with Bel she became Belit. She is also called Nin-khar-sag, "queen of the great mountain." [ The Religion of Babylonia and Assyria, by R. W. Rogers, p. 81. ]. ह्या देवतेशीं तर पार्वतीचा संबंध नसेल ना ?

तांतील शान्तिपर्वांत सांपडतें.[1] "दक्षानें हिमालयावर गंगाद्वारीं यज्ञाला आरंभ केला. त्या यज्ञाला देव, दानव, गंधर्व, पिशाच्च, उरग, राक्षस, ऋषि इत्यादिक सर्व आले. तेव्हां दधीचि म्हणाला, 'ज्यांत रुद्राची पूजा केली जात नाहीं, तो यज्ञहि नव्हे व धर्महि नव्हे. तुम्ही ह्या पशूंना बांधण्यांत व मारण्यांत काय लागलां अहां ? काय हा काळाचा विपर्यास ? ह्या यज्ञानें घोर विनाश होणार, हें ह्यांना समजत नाहीं कसें ?'

७९. "त्यानंतर त्या ऋषीनें ध्यानचक्षूनें महादेवाला, पार्वतीला व तिच्याजवळ असलेल्या नारदमुनीला पाहिलें, आणि तो संतुष्ट झाला. दक्षादिकांनी कट करून महादेवाला निमंत्रण दिलें नाहीं हें त्यानें जाणलें, व तेथून जरा दूर अंतरावर जाऊन तो म्हणाला, 'अपूजनीय देवतांच्या पूजेपासून व पूजनीय देवतांची पूजा न केल्यानें मनुष्य सदोदित नरहत्येचें पाप पावतो....... येथें हा पशुपति, जगाचा कर्ता, यज्ञाचा भोक्ता, सर्वांचा प्रभु आलेला आहे. त्याला तुम्ही पहात नाहीं काय ?' दक्ष म्हणाला, 'शूलहस्त, जटाधारण करणारे व अकरा ठिकाणीं रहाणारे असे पुष्कळ रुद्र आमच्याजवळ आहेत. ह्या महेश्वराला मी ओळखत नाहीं.'

८०. "दधीचि म्हणाला, 'तुम्ही सर्वांनी कट करून ह्याला निमंत्रण दिलें नाहीं. पण ज्या अर्थी मी शंकराशिवाय दुसरें थोर दैवत पहात नाहीं, त्या अर्थी हा यज्ञ उत्तम होणार नाहीं, असें मी समजतों.' दक्ष म्हणाला, 'विधि व मंत्रानें पवित्र असें हें हवि मी विष्णूला अर्पण करतों. तो प्रभु विभु हवनीय आहे.' ही गोष्ट पार्वतीला आवडली नाहीं. तेव्हां महादेवानें आपल्या

---

१. कुंभकोण, अध्याय २९०; औंध, अ० २८४.

मुखांतून एक भयानक पुरुष उत्पन्न केला; व त्या पुरुषानें दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस केला."

८१. ही पौराणिक भाषा आहे. खरा प्रकार असा असणें संभवनीय आहे कीं, ब्राह्मणांनी आरंभलेल्या कोणत्या तरी एका मोठ्या महायज्ञाचा एकाद्या शक राजानें विध्वंस केला. येथें आम्हाला झेंघिश खानाची गोष्ट आठवते. तो जेव्हां समरकंदमध्यें शिरला तेव्हां तेथील मुख्य मशीदींत नमाज पढणारे मौलवी लोक त्यानें पाहिले; व त्यांना विचारलें कीं, येथें हें काय करीत अहां ? 'आपण परमेश्वराची प्रार्थना करीत आहोंत' असें त्यांनी सांगितल्यावर तो क्षुब्ध झाला; व मौलवींचें कुराण घेऊन त्यानें तें आपल्या घोड्याच्या पायाखालीं तुडविलें. महादेवानें उत्पन्न केलेल्या पुरुषानें दक्ष यज्ञाचा केलेला विध्वंस जवळ जवळ अशाच प्रकारचा दिसतो.

८२. महेश्वराच्या प्रभावानें क्षत्रियांचा नाश होणार या कल्पनेचाहि महाभारतांत समावेश केला आहे. नारदमुनीनें धर्मराजाला तीन प्रकारचे उत्पात सांगितले. ते सर्व चैद्याच्या ( शिशुपालाच्या ) मरणानंतर घडले. त्यावर धर्मराजानें व्यासाला प्रश्न केला कीं, त्या उत्पातांचें फळ काय होणार आहे ? त्यांचें फळ म्हटलें म्हणजे तेरा वर्षांनंतर सर्व क्षत्रियांचा संहार होणार आहे, असें सांगून व्यास म्हणाला—

स्वप्ने द्रक्ष्यसि राजेन्द्र क्षपान्ते त्वं वृषध्वजम् ।<br>
नीलकण्ठं भवं स्थाणुं कपालिं त्रिपुरान्तकम् ॥<br>
उग्रं रुद्रं पशुपतिं महादेवमुमापतिम् ।<br>
हरं शर्वं वृषं शूलं पिनाकिं कृत्तिवाससम् ॥<br>
कैलासकूटप्रतिमे वृषभेऽवस्थितं शिवम् ।<br>
निरीक्षमाणं सततं पितृराजाश्रितां दिशम् ॥

एवमीदृशकं स्वप्नं द्रक्षसि त्वं विशाम्पते ।
मा तत्कृते ह्यनुध्याहि कालो हि दुरतिक्रमः ॥[१]

( हे राजेन्द्र ! आज रात्रीं स्वप्नांत वृषध्वज, नीलकंठ, भव, स्थाणु, कपाली, त्रिपुरान्तक, उग्र, रुद्र, पशुपति, महादेव, उमापति, हर व शर्व, त्याचा वृषभ, शूल, पिनाकधारण व चर्मवसन तूं पहाशील. कैलासकूटासमान बैलावर बसलेल्या व यमदिशेकडे ( दक्षिण दिशेकडे ) सतत पहाणाऱ्या शिवाला तूं पहाशील. हे लोकपति, अशा प्रकारचें स्वप्न तुला दिसेल. पण त्याची तूं काळजी करूं नकोस. कारण काळ दुरतिक्रम आहे. )

८३. ह्यांत नुसता पांडवांचा व कौरवांचा क्षय नाहीं, पण सर्व क्षत्रियांचा क्षय होणार, असें भविष्य वर्तविलें आहे; आणि तें शकांचा जिकडे तिकडे विजय झाल्यावर व्यासाच्या तोंडीं घालण्यांत आलें, याजबद्दल शंका बाळगण्याचें कारण नाहीं. सतत दक्षिण दिशेकडे पहाणारा महादेव दिसेल म्हणजे शकांचा दक्षिणेकडे सारखा विजय होत जाईल, असा याचा अर्थ समजावयास पाहिजे.

८४. ह्या महाभारतांतील वर्णनावरून असें अनुमान करतां येतें कीं, ब्राह्मणांना शक राजे फारसे प्रिय नव्हते. तथापि दुसरा कांहीं मार्ग राहिला नसल्यामुळें या महादेवाची पूजा त्यांनी उचलली, व ती त्यांना फायदेशीर झाली.

## लिंगपूजा

८५. आतां महेश्वराच्या पूजेमधून लिंगपूजा कशी उद्भवली या प्रश्नाकडे वळूं. येथेंहि आम्हाला बहुतांशीं अनुमानावर

---

१ औंध सभापर्व, अ० ४६ । १३–१६; कुंभकोण, अ० ७३ । १६–१९.

अवलंबून रहावें लागेल. बुद्धाच्या किंवा महावीरस्वामीच्या वेळीं श्रमण लोक चातुर्मास्याखेरीज एका जागीं रहात नसत. ते सतत चोहोंकडे फिरून धर्मोपदेश करीत. दुसरें असें कीं, ते गृहस्थाश्रमाचा उपभोग घेऊन व संसारदुःखाला कटाळून श्रमण होत असत. ह्या दोन कारणांस्तव त्यांच्या कामवासनेला मुळींच वाव मिळत नसे. पण दुसऱ्या किंवा तिसऱ्या शतकांत ही स्थिति पार बदलून गेली होती. लहान मुलांना दीक्षा देऊन संन्यासी करण्याची प्रथा ह्या दोन्ही पंथांत सुरू झाली, व मोठमोठाले विहार व उपाश्रय यांचा आश्रय करून हे लोक सुखानें राहूं लागले. त्यामुळें कामवासनेवर विजय मिळवणें या लोकांना जड झालें. स्त्रीसंग तर राहूंच द्या, पण स्त्रीस्पर्शाला देखील ह्या श्रमणपंथांत सक्त मनाई आहे. आजलाहि गाडींतून किंवा होडींतून उतरतांना एकाद्या भिक्षूनें एकाद्या स्त्रीला हात दिला, तर त्याबद्दल त्याला मोठें प्रायश्चित्त घ्यावें लागेल. ह्या कडक नियमामुळें त्या काळच्या तरुण सन्याशांची वृत्ति वाममार्गाकडे वळली असल्यास नवल नाहीं. हस्तस्पर्शादिक न करतां केवळ नग्न स्त्रीच्या दर्शनानें कोणत्याहि नियमाचा भंग होत नसे; व कामवासना तर अंशतः तरी तृप्त होत असे. अशा ह्या प्रकारांतून लिंगपूजा निघाली असावी.

८६. जटिल तापसांचा पंथ बुद्धाच्या काळीं अस्तित्वांत होता. उरुवेलकश्यप, नदीकश्यप आणि गयाकश्यप या तीन जटिलांना त्यांच्या एक हजार जटिल शिष्यांसह बुद्धानें भिक्षु केलें, ही दंतकथा महावग्गांत आली आहे. तिचा अर्थ एवढाच असावा कीं, बुद्धाच्या भिक्षुसंघांत जटिलांचा भरणा जास्त होता. ह्या तापसांना तत्त्वज्ञान असें कांहींच नव्हतें. ते अग्नीची पूजा करून अरण्यवासांत रहात असत.

८७. बुद्धाच्या वेळीं जे दुसरे मोठे संघ होते त्यांतून एकादा श्रमण बौद्ध पंथांत आला, तर त्याला चार महिनेपर्यंत परिवास देत असत. परिवास म्हणजे श्रामणेर होऊन भिक्षूंची सेवा करून रहाणें. चार महिन्यांनंतर त्याचें वर्तन योग्य आहे असें वाटलें तर त्याला भिक्षुसंघांत दाखल करून घेत. हा परिवास देण्याचें कारण असें सांगितलें आहे कीं, एक दुसऱ्या पंथांतील श्रमण भिक्षुसंघांत शिरला, व आपल्याच उपाध्यायाला वादांत जिंकून पुन्हा आपल्या मूळच्या श्रमणसंघांत गेला. असे प्रकार होऊं नयेत म्हणून इतर पंथांतील श्रमणांना चार महिने परिवास देऊन मग संघांत घेत असत.

८८. पण असा परिवास जटिलांना व शाक्यांना देण्यांत येत नसे. शाक्य बुद्धाचे नातलगच. तेव्हां त्यांना परिवास देण्यांत येत नसे हें योग्य आहे. पण तो जटिलांना कां देण्यांत येत नसावा ? याचें कारण असें दिसतें कीं, जटिलांचें सांप्रदायिक असें कोणतेंहि दर्शन नव्हतें. तेव्हां ते वादविवादांत पडणार नाहींत, अशी बौद्ध श्रमणांची खात्री होती.

८९. आजकालहि जटाधारी बुवांची हीच स्थिति आहे. त्यांचें स्वतंत्र असें दर्शन किंवा तत्त्वज्ञान नाहीं. धुमी लावावी, अंगाला राख फांसावी व बदरीनारायणापासून रामेश्वरापर्यंत हिंडत फिरावें, हा त्यांचा धंदा. अलीकडे त्यांतहि कांहीं सम्प्रदाय दिसून येतात. पण त्या सम्प्रदायांचें कांहीं विशेष दर्शन असेल असें वाटत नाहीं. जीं चालू दर्शनें आहेत, त्यांजवरच ते भागवून घेतात. तात्पर्य काय कीं, बुद्धाच्या काळापासून तहत आजपर्यंत या जटिल सम्प्रदायाचा कोणताहि विशेष असेल, तर तो धुमी पेटवणें हा होय.

९०. एकीकडे वाममार्गांत शिरलेले तरुण भिक्षु, व दुसरी-

कडे हे जटिल तापसी, ह्या दोहोंच्या मधून पाशुपतांचा पंथ निघाला; व शकांच्या कारकीर्दीत तो एकसारखा फैलावत गेला. या पंथानें एक आपलें निराळें पाशुपत दर्शन बनविलें. त्याची चर्चा येथें करण्याची आवश्यकता वाटत नाहीं. जटाधारण करणें, अंगाला तीनदां भस्म लावणें, नग्न रहाणें किंवा चर्मखंड परिधान करणें, व लिंगाची पूजा करणें, हे त्यांच्या आचारांपैकीं कांहीं प्रकार होत. ह्याच पंथामुळें लिंगपूजेला महत्त्व आलें, यांत शंका नाहीं.

९१. इ० स० चौथ्या शतकांत तर ह्या लिंगाला फारच महत्त्व आलें असें दिसतें. वाकाटक नांवाचे राजे होते. त्यांचे नातलग भारशिव राजे. ते आपल्या खांद्यावर शिवलिंग घेऊन फिरत असत; व त्यामुळें त्यांचा राजवंश स्थिर झाला, अशी त्यांची समजुत होती.[1] याच वाकाटक वंशांतील दुसऱ्या रुद्रसेन राजाला गुप्त वंशांतील दुसऱ्या चंद्रगुप्तानें आपली कन्या प्रभावती दिल्याचा दाखला शिलालेखांत सांपडतो. म्हणजे गुप्त राजांमध्यें, भारशिवांमध्यें व वाकाटक राजांमध्यें लिंगाविषयीं आदर फार होता असें दिसतें.

९२. असें असलें तरी लिंगपूजा सर्वत्र प्रचारांत आली नव्हती. एक दोन शतकें तरी ती खाजगी असावी. कां कीं, ह्यएन् त्संग याच्या प्रवासवृत्तांत कुठेंहि लिंगपूजेचें वर्णन आढळत नाहीं, व महादेवाच्या मूर्तींचीं वर्णनें वाटेल तेवढीं आढळतात. काशीला तर त्यानें जवळ जवळ शंभर फूट उंचीची महा-

---

१ अंसभारसंनिवेशितशिवलिंगोद्वहनशिवसुपरितुष्टसमुत्पादितराजवंशानां...भारशिवानां इत्यादि.

[Corpus Inscriptionum Indicarum, iii, 236-37, 245.]

देवाची तांब्याची मूर्ति पाहिली.[१] असें असतां आजला जी सर्व हिंदुस्थानांत लिंगपूजा दिसते, ती सार्वत्रिक झाली कशी? आणि ह्युएन् त्संगनें पाहिलेल्या मूर्ति गेल्या कुठें ?

९३. महमूद गझनीच्या वेळीं लिंगाची सार्वजनिक पूजा अमलांत आली होती; तरी पण महादेवाच्या मूर्तिहि होत्या. सोमनाथ येथें लिंगपूजा केली जात असे; व इतर कांहीं ठिकांणी महादेवाच्या मूर्तिहि पुजल्या जात असाव्या. त्या मूर्ति कशा करीत याचें वर्णन अल्बेरूनीनें बृहत्संहितेच्या आधारें दिलें आहे. त्यावरून असें वाटतें कीं, मुसलमानांच्या स्वाऱ्यांनंतर महादेवाच्या मूर्ति बनवण्याचा प्रघात बंद पडला असावा. हे लोक दगडी मूर्ति असल्या तर त्या छिन्न भिन्न करीत, व धातूच्या असल्या तर घेऊन जात. अशा वेळीं लिंगपूजा सोइस्कर झाली. जरी मुसलमानांनी लिंग फोडून टाकलें, तरी तें पुन्हा करण्यास फार प्रयास पडत नसत.

९४. येथें असा प्रश्न उपस्थित होतो कीं, अशा ह्या पंथाला आळा घालणें शक्य नव्हतें काय ? बौद्ध श्रमण जर सुखवस्तु बनले नसते तर तें शक्य झालें असतें; किंवा दुसरा मार्ग म्हटला म्हणजे जपानांतील सिंगोंजो पंथांतील भिक्षूंप्रमाणें ह्या देशांतहि भिक्षूंना लग्न करण्यास मुभा पाहिजे होती. हे जपानी भिक्षु एकदाच लग्न करतात. त्यांच्या हयातींत बायको मेली, तर ते दुसरें लग्न करीत नाहींत. जपानांत जे दहा बारा बौद्ध संप्रदाय आहेत त्या सर्वांत हा संप्रदाय मोठा आहे. अशा तऱ्हेचा संप्रदाय येथें निघाला असता, तर कदाचित् लिंगपूजेसारख्या बीभत्स प्रकारांना आळा घालतां आला असता.

---

१ Buddhist Records, ii, 45.

९५. परंतु तसा संप्रदाय निर्माण करण्याचें धैर्य परंपरेचे दास बनलेल्या बौद्ध श्रमणांत राहिलें नव्हतें. तेव्हां तसा पंथ काढण्याऐवजीं आपल्या संघाला बचावण्यासाठीं त्यांनी तंत्रांच्या रूपानें असल्या वाममार्गांना एकतऱ्हेचें धार्मिक स्वरूप दिलें. सहाव्या किंवा सातव्या शतकांत बौद्ध श्रमणांनी लिहिलेलीं तंत्रें लिंगपूजेइतकींच बीभत्स आहेत. नग्न स्त्रीची पूजा करावयाची, मद्यमांसादिक यथेच्छ सेवन करावयाचें इत्यादिक बीभत्स प्रकार त्यांत भरपूर आहेत. अशा श्रमणांकडून लिंगपूजेला विरोध होणें शक्य नव्हतें, हें सांगावयालाच नको. ह्याच वाममार्गी श्रमणांपासून लिंगपूजा उत्पन्न झाली, व ती वाढत जाऊन गंज जसा लोखंडाला खाऊन टाकतो, त्याप्रमाणें त्याच लिंगपूजेनें श्रमणसंस्कृतीला गिळंकृत केलें !

## वासुदेव कृष्ण

९६. पहिल्या विभागांत आपण पाहिलें आहे कीं, कृष्णानें इंद्राला दाद दिली नाहीं. जंगली प्रदेशाचा आश्रय करून त्यानें आपला व आपल्या लोकांचा बचाव केला.[१] अर्थात् मध्य हिंदुस्थानांत त्याची पूजा सुरू झाली असल्यास आश्चर्य मानण्याजोगें कांहीं नाहीं. तो गोपालकृष्ण मागाहून बनला असें सर भांडारकर यांचें म्हणणें आहे.[२] परंतु आम्हाला वाटतें कीं, तो—गोपींशीं क्रीडा करणारा नसला, तरी गाईबैलांचें रक्षण करणारा ह्या दृष्टीनें—वैदिक कालापासूनच गोपालकृष्ण होता. गाईबैलांचें बलिदान त्याला पसंत नव्हतें, व एवढ्याचसाठीं

१ वि० ११४८-५०.

२ Vaishnavism etc. pp. 49-54.

इंद्राशीं त्यानें विरोध केला. पशुयज्ञाची प्रथा अंगीकारून इंद्राचें स्वामित्व कबूल केलें असतें, तर त्याचें इंद्राशीं भांडणच झालें नसतें.

९७. आमचें चातुर्वर्ण्य इंद्राच्या पूर्वी होतें हें पहिल्या विभागांत दर्शविलेंच आहे.[१] तेव्हां कृष्णाच्या वेळींहि मध्य हिंदुस्थानांत जातिभेद होता असें समजलें पाहिजे. पण वासुदेव कृष्ण ह्या बाबतींत बराच सुधारक दिसतो. जातकांत, त्याच्यासंबंधीं दोन गाथा सांपडतात, त्या अशा—

यं यं कामी कामयति अपि चंडालिकामपि ।
सब्बेहि सदिसो होति नत्थि कामे असदिसो ॥
अत्थि जंबावती नाम माता सिविस्स राजिनो ।
सा भरिया वासुदेवस्स कण्हस्स महिसी पिया ॥[२]

( कामी मनुष्य ज्या ज्या स्त्रीची इच्छा करतो, त्या त्या स्त्रीविषयीं तो तन्मय होतो; मग ती चांडालिका कां असेना. कामोपभोगांत समानासमानतेचा प्रश्न येत नाहीं. शिबीची जंबावती नांवाची आई होती. ती कृष्ण वासुदेव राजाची अत्यंत आवडती पट्टराणी. )

९८. याच्यावर टीका करतांना अट्ठकथाकार म्हणतो, “सिबि राजाची आई जांववती ही चांडाली होती. ती कृष्ण वासुदेवाची आवडती पट्टराणी झाली. तो एके दिवशीं द्वारकेहून निघून आपल्या उद्यानांत जात होता. वाटेंत त्यानें एक सुस्वरूप तरुणी पाहिली. ती चांडाली होती. हें त्याला समजलें, तरी पण ती अविवाहित असल्यामुळें तिला घेऊन तो तसाच राज-

---

१ वि० ११७०.

२ Jataka, vi, 421 (Fausboll's edition).

वाड्यांत परत आला; व तिला जवाहिरांच्या राशीवर बसवून त्यानें आपली पट्टराणी केलें."

९९. ह्या जातकांतील गोष्टीवरून कृष्ण जातिभेदाला मुळींच मानीत नव्हता हें सिद्ध होतें. पुढें जेव्हां हा वासुदेव गुप्त राजांचा कुलदेव बनला, व जेव्हां त्याची पूजा करून उदर-निर्वाह करण्याचा ब्राह्मणांवर प्रसंग आला, तेव्हां असा प्रश्न उपस्थित झाला कीं, हजारों वर्षें चालत आलेल्या ह्या गोष्टीचें काय करावें? जांबवती कृष्णाची बायको नव्हती असें म्हणणें शक्य नव्हतें. यास्तव त्यांनी जांबवतीच्या बापाला अस्वल बनविलें, व तिला चांडाल जातींतून काढून अस्वलाच्या जातींत घातलें. जणूं काय पशूशीं संबंध ठेवणें चांडालिकेच्या संबंधा-पेक्षां चांगलें होतें! परंतु जातिभेदानें अंध झालेल्यांना हें दिसावें कसें?

१००. जातकानंतर वासुदेवाचा उल्लेख चूळनिद्देसांतील खालील उताऱ्यांत सांपडतो—

देवतानं ति। आजीवकसावकानं आजीवका देवता। निगण्ठ-सावकानं निगण्ठा[1] देवता। जटिलसावकानं जटिला देवता। परिब्बाजकसावकानं परिब्बाजका देवता। अवरुद्धकसावकानं अवरुद्धका देवता। हत्थिवतिकानं हत्थी देवता। अस्सवतिकानं अस्सा देवता। गोवतिकानं गावो देवता। कुक्कुरवतिकानं कुक्कुरा देवता। काकवतिकानं काका देवता। वासुदेववतिकानं वासुदेवो देवता। बालदेववतिकानं बलदेवो देवता। पुण्णभद्दवतिकानं पुण्णभद्दो देवता। मणिभद्दवतिकानं मणिभद्दो देवता। अग्गि-वतिकानं अग्गि देवता। नागवतिकानं नागा देवता। सुपण्ण-

---

१ सयाम संस्करणः—निगन्थसावकानं निगन्था देवता।

वतिकानं सुपण्णा देवता। यक्खवतिकानं यक्खा देवता। असुरवतिकानं असुरा देवता। गंधब्बवतिकानं गंधब्बा देवता। महाराजवतिकानं महाराजा देवता। चन्दवतिकानं चन्दो देवता। सुरियवतिकानं सुरियो देवता। इन्दवतिकानं इन्दो देवता। ब्रह्मवतिकानं ब्रह्मा देवता। देववतिकानं देवा देवता। दिसावतिकानं दिसा देवता। ये येसं दक्खिणेय्या ते तेसं देवता ति।

१०१. येथें ह्या उताऱ्याचें भाषांतर करणें जरूर वाटत नाहीं. अर्थ सर्वांना समजण्यासारखा आहे. आजीवक नांवाचे परिव्राजक बुद्धाच्या वेळीं होते. त्यांच्या संघाचा पुढारी मक्खलि गोसाल याचा उल्लेख वर आलाच आहे.[१] अशोकानें आणि त्याच्या नातवानें ह्या आजीवकांना रहाण्यास कांहीं गुहा करून दिल्याचा उल्लेख शिलालेखांत सांपडतो. निद्देसाच्या वेळींहि आजीवकांचा पंथ अस्तित्वांत होता हें स्पष्टच आहे. निगण्ठ म्हणजे जैन. त्यांचा संप्रदाय आजलाहि अस्तित्वांत आहे. तेव्हां त्यासंबंधीं विशेष सांगणें नलगे. जटिलांची माहिती वर आलीच आहे.[२] परिव्राजकांचा संप्रदाय बुद्धाच्या वेळीं फार जोरांत होता. सारिपुत्त व मोग्गलान हे बुद्धाचे प्रमुख शिष्य त्याच संप्रदायांतून आलेले होते.[३] त्या संप्रदायाच्या तत्त्वज्ञानाची विशेष माहिती सांपडत नाहीं. आतां अवरुद्धक कोण होते हें मात्र सांगतां येत नाहीं. त्यांची माहिती इतर ठिकाणीं अद्यापि मिळाली नाहीं.

१०२. निद्देसाच्या वेळीं बौद्ध संघाशिवाय हे पांच श्रमणसमूह अस्तित्वांत होते असें दिसतें. त्यांपैकीं फक्त अवरुद्धकांचा

---

१ वि० २।२५. २ वि० ३।८६–८८.

३ विनय, महावग्ग, महाक्खन्धक.

पंथ बुद्धाच्या वेळीं अस्तित्वांत नव्हता. केसकंबली, पूरण कस्सप, संजय बेलट्ठपुत्त, व पकुध कात्यायन ह्या चार पुढाऱ्यांचे संप्रदाय निद्देसाच्या काळांत नष्टप्राय झाले होते. तेव्हां निद्देसाचा काळ अशोकानंतर गणावा लागेल. त्या काळीं ही घडामोड झाली असावी.

१०३. ह्या वरील पांच संप्रदायांच्या उपासकांचीं नांवें आल्यानंतर हस्तिव्रतिक इत्यादिकांचीं नांवें येतात. हत्तीचें व्रत पाळणारे ते हस्तिव्रतिक. ह्या हस्तिव्रतिकांतूनच सध्याचा गणपतिपूजेचा पंथ निघाला असला पाहिजे. अश्वाचें व्रत करणारे ते अश्वव्रतिक. घोड्याची पूजा ऋग्वेदाच्या पहिल्या मंडळाच्या १६३ व्या सूक्तांत सांपडते. तेव्हां घोड्याचें व्रत पाळणारे वेदकालापासूनच अस्तित्वांत होते असें समजण्याला हरकत नाहीं. गोव्रतिक आणि कुक्कुरव्रतिक यांची माहिती मज्झिम निकायांतील कुक्कुरोवाद सुत्तांत आली आहे.

१०४. "एके समयीं भगवान् कोलिय[1] देशांत हरिद्रवसन नांवाच्या शहरापाशीं रहात होता. त्या वेळीं गोव्रतिक पूर्ण कोलियपुत्र व सेनिय नांवाचा नग्न कुक्कुरव्रतिक भगवंतापाशीं आले. पूर्णानें भगवंताला सेनियाची पुढें गति काय होणार असा प्रश्न केला. त्याचें उत्तर देण्याचें भगवंतानें तीनदां नाकारलें. तरी पुन्हा पूर्णानें प्रश्न विचारला, तेव्हां भगवान् म्हणाला कीं, 'असें व्रत संपन्न झालें तर मनुष्य कुत्र्यांच्या सायुज्यतेला जाईल. पण अशा व्रतानें आपण देव होईन असें त्याला वाटत असेल, तर तशा मिथ्यादृष्टीनें तो नरकांत जाईल.' हें ऐकून सेनिय रडूं लागला.

---

१ कोलिय हे शाक्यांचे नातेवाईक असून त्यांचें शाक्यांच्या राज्याजवळच राज्य होतें.

१०५. "तेव्हां भगवान् म्हणाला, 'हे पूर्णा, हा प्रश्न मला विचारूं नकोस असें मी तुला पूर्वीच सांगितलें नव्हतें काय ?' त्यानंतर सेनियानें पूर्णासंबंधानें प्रश्न विचारला. भगवंतानें त्या प्रश्नाचें उत्तर देण्याचें तीनदां नाकारलें. तरी चौथ्यांदा तोच प्रश्न विचारण्यांत आला, तेव्हां वरच्याप्रमाणेंच म्हणजे 'गाईच्या व्रतानें मनुष्य एक तर गाईच्या सायुज्यतेला जाईल, किंवा देव होईन अशी मिथ्यादृष्टि असली, तर तो नरकांत जाईल,' असें भगवंतानें उत्तर दिलें. तें ऐकून पूर्ण रडूं लागला. त्यानंतर भगवंतानें त्या दोघांनाहि उपदेश केला. पूर्ण भगवंताचा उपासक बनला. सेनियानें प्रव्रज्या घेतली. त्याला चार महिनेपर्यंत परिवास देण्यांत आला, व त्यानंतर भिक्षुसंघांत दाखल करून घेण्यांत आलें. नंतर लवकरच तो अरहन्त झाला."

१०६. यापुढें निद्देसाच्या वरील उताऱ्यांत कावळ्यांचें व्रत येतें. अद्यापि बलिदानाच्या रूपानें तें चालू आहे. कावळ्यानें जर बलि स्वीकारला नाहीं, तर पितरांना अन्न पोंहोंचत नाहीं, अशी समजूत अद्यापिहि प्रचलित आहे. यावरून काकव्रतिक कशा तऱ्हेचे होते, याची कल्पना करतां येते.

१०७. वासुदेवव्रतिक हे कशा प्रकारचे होते, याची थोडीशी कल्पना महाराष्ट्रांतील पुणें वगैरे जिल्ह्यांत वासुदेव नांवाचे सकाळच्या प्रहरीं भिक्षा मागणारे जे लोक आहेत त्यांच्यावरून करतां येण्याजोगी आहे. हे लोक एक उंच, वर टोंक असलेली मोरांच्या पिसांची टोपी व लांब झगा घालतात. त्या टोपीवर व झग्यावर कवड्या लावलेल्या असतात. ते सकाळच्या प्रहरीं वासुदेवाचीं गाणीं गात भिक्षा मागतात. ह्या लोकांवरून प्राचीन काळचे वासुदेवव्रतिक कसे होते याची कल्पना करतां येणें शक्य आहे. बलदेवव्रतिक, पूर्णभद्रव्रतिक, व मणिभद्रव्रतिकहि

अशाच तऱ्हेचे असावेत. मात्र त्यांचीं चिन्हें निरनिराळीं असलीं पाहिजेत.[१]

१०८. अग्नीची पूजा करणारे ते अग्निव्रतिक. ते जंगलांत राहून किंवा आपल्या घरीं अग्निदेवतेची पूजा करीत असत. अग्निहोत्र्यांच्या रूपानें अद्यापि ते अल्प प्रमाणांत अस्तित्वांत आहेत. नागपंचमीच्या दिवशीं नागांची पूजा केली जाते. सर्वकाळ अशी पूजा करणाऱ्या लोकांना नागव्रतिक म्हणत. सुपर्णव्रतिक सुपर्णांची पूजा कशी काय करीत असत, हें सांगतां येत नाहीं. सुपर्ण म्हणजे गरुड. तो विष्णूचें वाहन या रूपानें अद्यापि प्रसिद्ध आहे. पण त्याची पूजा होत असल्याचें ऐकिवांत नाहीं. त्याशिवाय येथें सुपर्ण बहुवचन आहे. म्हणजे एका गरुडाची पूजा नसून सर्व गरुडांची पूजा एकदम केली जात असे.

१०९. असुरांची पूजा निद्देसाच्या वेळीं अस्तित्वांत होती ही गोष्ट महत्त्वाची आहे. महाभारतांतील वृत्रगीतेवरून वृत्रासुराचा मान बराच काळपर्यंत या देशांत ठेवला जात होता असें दिसून येतें. तेव्हां असुरांची पूजाहि त्या वेळीं अस्तित्वांत होती हें उघडच आहे.

११०. गंधर्वांचें व्रत पाळणारे ते गंधर्वव्रतिक. ते नटनर्तकादिक लोक असावेत. चार महाराजांची माहिती वर दिलीच आहे.[२] त्यांपैकीं पश्चिम दिशेचा महाराजा विरूपाक्ष ह्याची पूजा महादेवाच्या रूपानें निद्देसाच्या वेळीं अस्तित्वांत होती असें दिसतें. कां कीं, कालांतरानें विरूपाक्ष हें महादेवाचें नांव झालें. तो नागांचा राजा होता. यासाठीं महादेवाच्या गळ्यांत साप असतो.

---

१ वि० ३।११८ पहा. २ वि० ३।८–१२ पहा.

१११. चंद्राचें व्रत पाळणारे ते चन्द्रव्रतिक. चन्द्राची पूजा वेदामध्यें आहेच, व ती या वेळींहि अस्तित्वांत होती हें स्पष्ट आहे. सूर्याची पूजा वेदांत भरपूर आहे. होतां होतां सूर्याचीं देवळें बांधण्याचा प्रघात सुरू झाला. निद्देसाच्या वेळीं अशीं देवळें अस्तित्वांत होतीं कीं नाहीं तें सांगतां येत नाहीं. तरी पण सूर्याच्या मूर्ति करण्यांत येत असाव्यात असें दिसतें. वराहमिहिराच्या वेळीं सूर्याच्या पूजेचें काम मग नांवाच्या ब्राह्मणांकडे होतें, व सूर्याच्या मूर्तीचा पोशाख पर्शियन वरिष्ठ जातींतील लोकांच्या पोशाखाप्रमाणें असे.[१]

११२. ह्युएन् त्संगच्या वेळीं सूर्याचें मुख्य मंदिर मुलतान येथें होतें; आणि त्याची मूर्ति सोन्याची असून मौल्यवान् जवाहिरानें मढवलेली होती.[२] पण अल्बेरूनीच्या पूर्वी कांहीं काळ ती लाकडाची केलेली असून चामड्यानें मढवलेली होती; आणि तिच्या दोन्ही डोळ्यांत दोन माणकें होतीं. महंमद इब्न अल्कासीम यानें मुलतान जिंकलें तेव्हां त्याला असें दिसून आलें कीं, या सूर्याच्या देवळामुळें मुलतानला फार मोठा फायदा होतो. चारी दिशांकडून यात्री लोक येऊन मूर्तीची पूजा करतात, व त्यामुळें पुष्कळ धनदौलत एकत्र होते. म्हणून त्यानें त्या मूर्तीचा भंग केला नाहीं. तेवढा एक गाईच्या मासाचा तुकडा त्या मूर्तीच्या गळ्यांत त्यानें थट्टेनें अडकवून दिला. नंतर इब्न सायिबान यानें ती मूर्ति फोडली; आणि तेथल्या सर्व पुजाऱ्यांना ठार केलें.[३]

---

१ बृहत्संहिता अ० ६०।१९, व अ० ५८।४६.

२ Buddhist Records ii, 274.

३. Alberuni's India, i,116.

११३. ह्या मुसलमान लोकांनी अशा प्रकारें अनेक वेळां या मूर्तीचा उच्छेद केला असला तरी सूर्याची पूजा मुलतान येथें औरंगजेबापर्यंत चालू होती असें दिसतें. औरंगजेबानें हें मंदिर तोडल्यावर मात्र ती पूजा नामशेष झाली. तात्पर्य इ० स० सतराव्या शतकापर्यंत मूर्तीच्या रूपानें सूर्याची पूजा अस्तित्वांत होती; व आजलाहि ती कांहीं ठिकाणीं सूर्यनमस्कारांच्या रूपानें चालू आहे.

११४. निद्देसाच्या वेळीं इंद्र, ब्रह्मा व अनेक देव यांची पूजा होत असे, हें सांगावयास नकोच. दिशांची पूजा करण्याचा परिपाठ बुद्धाच्या वेळीं होताच. त्याचा उल्लेख दीघनिकायां-तील सिगालोवाद सुत्तांत सांपडतो. ती पूजा निद्देसापर्यंत चालू होती. त्यानंतर ती कोणत्या काळापर्यंत चालू राहिली हें सांगतां येत नाहीं.

११५. निद्देसानंतर वासुदेवाचा उल्लेख पाणिनिव्याकरणा-मध्यें सांपडतो, तो असा–'वासुदेवार्जुनाभ्यां वुन्' ४।३।९८. ह्या सूत्राचा अर्थ असा कीं, वासुदेवामध्यें ज्यांची भक्ति त्यांना वासुदेवक म्हणतात; व अर्जुनामध्यें ज्यांची भक्ति त्यांना अर्जु-नक म्हणतात.

११६. बेसनगर येथें एक शिलास्तंभ सांपडला आहे. त्यावर जो शिलालेख आहे त्यावरून असें दिसतें कीं, वासु-देवाच्या पूजेसाठीं हेलियोदोर यानें भागभद्र महाराजाच्या वेळीं तो शिलास्तंभ किंवा गरुडध्वज उभारला. ह्या लेखांत वासुदेवाला देवांचा देव म्हटलें आहे. हा शिलालेख ख्रिस्ती शकाच्या पूर्वी पहिल्या किंवा फार झालें तर दुसऱ्या शतकां-तील असावा.

११७. निद्देसाच्या उताऱ्यांत, पाणिनीच्या व्याकरणांत व

या शिलालेखांत सांपडणाऱ्या वासुदेवाच्या उल्लेखावरून सर भांडारकर असें सिद्ध करूं पहातात कीं, खिस्ती शकाच्या पूर्वी तिसऱ्या शतकांत वासुदेवाच्या भक्तीचा पंथ अस्तित्वांत होता. भगवद्गीता व एकांतिक धर्माची स्थापना त्याच वेळीं झाली असें त्यांचें म्हणणें.[१] पण त्यांच्या ह्या पुराव्यानें आमचें समाधान झालें नाहीं, असें निरुपायानें म्हणावें लागतें. त्यांचें म्हणणें बरोबर नाहीं एवढें दाखवण्यासाठींच वरील निद्देसाच्या उताऱ्याचें वर्णन विस्तारपूर्वक करण्यांत आलें आहे. त्यावरून असें दिसून येईल कीं, वासुदेव ही देवता त्या वेळीं पूर्णभद्र, बलभद्र, नाग, सुपर्ण वगैरे देवतांइतकीच प्रसिद्ध होती. म्हणजे त्या पूजेला फारसें महत्त्व नव्हतें.

११८. वासुदेवाच्या भक्तांना भागवत म्हणण्यांत आलें आहे, यावरून वासुदेवभक्तांचा एक मोठा पंथ होता असें समजण्याचें कांहीं कारण नाहीं. वासुदेवांच्या भक्तांना वासुदेवभागवत म्हणत. त्याचप्रमाणें शिवाच्या भक्तांना शिवभागवत म्हणत असत. 'अयःशूलदण्डाजिनाभ्यां ठक्ठञौ' ५।२।७६, ह्या सूत्राची चर्चा करतांना पतंजलि शिवभागवतांचा उल्लेख करतो. त्यावरून असें दिसतें कीं, हे शिवभागवत हातांत एक लोखंडाचा त्रिशूळ घेऊन फिरत असत. ते शिवाची मूर्ति दारोदार फिरवून आपली उपजीविका करीत हें 'जीविकार्थे चापण्ये' ५।३।९९, ह्या सूत्राच्या भाष्यावरून सिद्ध होतें. तेव्हां शिवभागवत जसे त्रिशूळ व शिवाची मूर्ति घेऊन आपला निर्वाह करीत, त्याचप्रमाणें वासुदेवक किंवा वासुदेवभागवतहि कांहीं विशेष चिन्हें धारण करून व वासुदेवाची

---

१. Vaishnavism etc. p 5.

मूर्ति बरोबर घेऊन दारोदार हिंडून आपला निर्वाह करीत असत असें दिसतें. यांच्याशिवाय जे गृहस्थ शिवाची आणि वासुदेवाची पूजा करीत त्यांनाहि शिवभागवत व वासुदेव-भागवत म्हणत असत.

११९. नंगुट्ठ जातकामध्यें ( क्रमांक १४४ ) अग्नीला भगवान् म्हटलें आहे.[१] ग्वाल्हेर संस्थानांत पवाया ( प्राचीन पद्मावती ) गांवीं मणिभद्राची शिरोभग्न मूर्ति सांपडली. तिच्या आधारपीठावर जो लेख आहे, त्यावरून मणिभद्रालाहि भगवान् म्हणत असत असें दिसून येतें.[२] तेव्हां अग्नीचे जे पूजक त्यांना अग्निभागवत, मणिभद्राचे जे पूजक त्यांना मणि-भद्रभागवत, व अशा रीतीनें, वर दिलेल्या निर्देसांतील उताऱ्यांत ज्यांना वतिक (व्रतिक) म्हटलें आहे, त्या सर्वांना त्या त्या देवतांचे भागवत म्हणत, असें अनुमान करणें असांप्रत होणार नाहीं.

---

१ सो एकदिवसं पच्चन्तगामके गोदक्खिणं लभित्वा तं गोणं अस्सम-पदं नेत्वा चिन्तेसि—अग्गिं भगवन्तं गोणमंसं खादापेस्सामीति।... अयं अग्गि भगवा अत्तनो सन्तकंपि रक्खितुं न सक्कोति।

२ राज्ञः स्वामिशिवनंदिस्य संवत्सरे चतुर्थे...मणिभद्रभक्ता गर्भ-सुखिताः भगवतो मणिभद्रस्य प्रतिमा प्रतिष्ठापयन्ति। गौष्ठ्यं भगवा आयु बलं वाचं कल्याणाभ्युदयं च प्रीतो दिशतु। ब्राह्मणस्य गोतमस्य कुमारस्य ब्राह्मणस्य रुद्रदासस्य शिवत्रातायें संभूतस्य जीवस्य खंजबलस्य शिवनेमिस्य शिवभद्रस्य कुमकस्य धनदेवस्य...।

श्रीयुत मो० ब० गर्दे ह्यांच्या लेखांतून हा उतारा घेतला आहे. (Archaeological Survey of India, Annual Report 1915-16 pp. 105-6 पहा.) मणिभद्राच्या भक्तांत दोघे ब्राह्मण होते, हें लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे.

१२०. आतां प्रश्न असा येतो कीं, हे अग्निभागवतादिक सर्व भागवत मागें पडून एक तेवढे वासुदेवभागवत पुढें आले कसे? याचें उत्तर सोपें आहे. शकांचें कुलदैवत महादेव असल्यामुळें शकांच्या वेळीं तो सर्वश्रेष्ठ देव बनला. त्याचप्रमाणें गुप्त राजांचें कुलदैवत वासुदेव असल्याकारणानें गुप्त राजांच्या वेळीं तो जगन्नियंता झाला.

१२१. वर सांगण्यांत आलेंच आहे कीं, वासुदेव कृष्णाचें अस्तित्व वेदकालापासून होतें, व मध्यहिंदुस्थानांत विभूतिरूपानें त्याची पूजा होत असे. मेगस्थेनेस याच्या म्हणण्याप्रमाणें वासुदेव हिन्दुस्थानचा हेराक्लेस असून त्याची पूजा सौरसेनी लोकांत चालू होती. ह्या लोकांच्या दोन मुख्य शहरांपैकीं एक मथुरा असे.[1] आजकाल जशी बलदायक अशा दृष्टीनें मारुतीची पूजा होते, तशी त्या काळीं वासुदेवाची पूजा होत असावी. याचसाठीं मेगस्थेनेस यानें त्याला हेराक्लेस म्हटलें आहे. ग्रीक लोकांना हा हेराक्लेस येथें सांपडल्यामुळें हेलियोदोरासारख्यानें त्याची पूजा आरंभली असली तर त्यांत आश्चर्य कोणतें? पण ह्यावरून वासुदेवाचा एक स्वतंत्र पंथ होता हें मात्र मुळींच सिद्ध होत नाहीं.

१२२. गुप्त राजे शकांचे शत्रु होते. कां कीं, शकांचें राज्य मोडून त्यांना आपलें राज्य स्थापन करावयाचें होतें. अर्थात् शकांच्या महेश्वरदेवाला त्यांनी आपलें कुलदैवत केलें नाहीं. पण तशाच तऱ्हेचें कोणतें तरी बळकट एतद्देशीय कुलदैवत त्यांना पाहिजे होतें; व तें त्यांस वासुदेवामध्यें सांपडलें. त्यांचा कुलदेव वासुदेव झाल्याबरोबर ब्राम्हणांनी

---

[1] Vaishnavism etc. p. 13.

त्याची महती वाढवण्यासाठीं आपलें सामर्थ्य खर्चण्यास आरंभ केला.

१२३. गुप्त राजे सर्वांना समानतेनें वागवणारे होते. अर्थात् सर्वत्र पसरलेल्या महादेवाचाच नव्हे, तर महादेवाच्या लिंगाचाहि त्यांनी उच्छेद केला नाहीं. महादेवाचे परमभक्त जे वाकाटक राजे त्यांच्या वंशांतील दुसऱ्या रुद्रसेनाला दुसऱ्या चंद्रगुप्तानें आपली मुलगी प्रभावती ही दिली होती.[1] या त्यांच्या वर्तनामुळें महादेव मूर्तिरूपानें किंवा लिंगरूपानें, जशाचा तसाच कायम राहिला. पण ते स्वतः वासुदेवाचे भक्त असल्याकारणानें त्या देवाचीहि महती एकसारखी वाढत गेली. वासुदेवाला जर गुप्तांनी आपला कुलदेव केलें नसतें, तर आजला वासुदेवाचा मागमूसहि राहिला नसता; आणि पांचरात्रादिक प्रकरणांत जो एकांतिक धर्म प्रतिपादला आहे, तो पण उद्भवला नसता. विविधरूपानें एक तेवढी महादेवाची पूजा शिल्लक राहिली असती.

१२४. शकांच्या पडत्या काळांत जसें महादेवाचें रूपांतर लिंगांत झालें, तसेंच गुप्तांच्या उतरत्या काळांत वासुदेवाचें रूपांतर व्यभिचारी गोपालांत झालें. या राजांची जसजशी चैन वाढत गेली तसतसें वासुदेवालाहि चैनी व व्यभिचारी बनवण्यांत आलें. कोणी म्हणतात कीं, वासुदेवाचें हें रूपांतर बरेंच आधुनिक आहे. परन्तु गुप्तांच्या समकालीन कालिदासाच्या 'बर्हेणेव स्फुरितरुचिना गोपवेशस्य विष्णोः'[2] या वचनावरून त्यांच्याच काळीं वासुदेवाला चैनी गोपाळाचें स्वरूप येत गेलें असें सिद्ध होतें.

---

१ Political History of Ancient India, pp. 346-47.

२ मेघदूत, श्लोक १५.

## महाभारत

१२५. अल्बेरूनीच्या इण्डियामध्यें पुराणाच्या खालीं दिलेल्या दोन याद्या सांपडतात.[१]

| | |
|---|---|
| १ आदि | १ ब्रह्म |
| २ मत्स्य | २ पद्म |
| ३ कूर्म | ३ विष्णु |
| ४ वराह | ४ शिव |
| ५ नरसिंह | ५ भागवत |
| ६ वामन | ६ नारद |
| ७ वायु | ७ मार्कण्डेय |
| ८ नंद | ८ अग्नि |
| ९ स्कन्द | ९ भविष्य |
| १० आदित्य | १० ब्रह्मवैवर्त |
| ११ सोम | ११ लिंग |
| १२ सांब | १२ वराह |
| १३ ब्रह्माण्ड | १३ स्कन्द |
| १४ मार्कण्डेय | १४ वामन |
| १५ तार्क्ष्य | १५ कूर्म |
| १६ विष्णु | १६ मत्स्य |
| १७ ब्रह्म | १७ गरुड |
| १८ भविष्य | १८ ब्रह्माण्ड |

१२६. या दोन याद्यांपैकीं दुसरी यादी विष्णुपुराणाच्या आधारें दिली आहे. पहिल्या यादींतील काहीं पुराणें दुसऱ्या

१ Alberuni's India, i, 130–131.

यादींत, व दुसऱ्या यादींतील कांहीं पहिल्या यादींत नाहींत. तरी पण गुप्तांच्या वेळीं या पुराणांची रचना झाली असावी. वर दिलेल्या निद्देसाच्या उताऱ्यांतील आदित्य, सोम, ब्रह्म, अग्नि, व गरुड ह्या देवता या याद्यांतहि सांपडतात. अशा देवतांच्या कांहीं दंतकथा त्यांच्या भक्तांमध्यें चालू होत्याच. त्या एकत्र करून आणि त्यांत नवीन भर घालून हीं पुराणें रचलीं असावींत. मत्स्य, कूर्म, वराह, नरसिंह, वामन या देवतांचा उल्लेख निद्देसांत नाहीं. तरी बाबिलोनियन दंतकथांतून ह्या देवता आल्या असाव्यात, व त्यांच्याच दंतकथांवरून ह्या पुराणांची उत्पत्ति झाली असावी. ह्या सर्व पुराणांचा नीट अभ्यास करून त्यांतील सार शोधून काढणें फार कठिण काम आहे. त्याला जो काळ पाहिजे आहे तो मजपाशीं नाहीं. तेव्हां तें काम पुढल्या पिढीवर सोंपवून आतां महाभारताकडे वळतों.

१२७. ही यादी दिल्यानंतर अल्बेरूनीनें महाभारताचा उल्लेख केला आहे; व त्याच्या अठरा पर्वांची यादी दिली आहे. त्यांत एकोणिसाव्या हरिवंश पर्वाचाहि समावेश होतो असें त्याचें म्हणणें. तेव्हां अल्बेरूनीच्या वेळीं महाभारत बहुतेक आज असलेल्या स्वरूपांत अस्तित्वांत होतें असें दिसतें.

१२८. परन्तु या महाभारताचा काळ ठरविणें जवळ जवळ अशक्य आहे. त्यांत मूळ भाग कोणता व प्रक्षिप्त कोणता याचें पृथक्करण करणें कोणालाहि शक्य नाहीं. तथापि भारत-काव्याला महाभारताचें स्वरूप गुप्तांच्या कारकीर्दीत आलें, यांत शंका नाहीं. कां कीं, त्यांत हूणांचा निर्देश अनेक ठिकाणीं सांपडतो. हूणाशीं सामना स्कन्दगुप्ताला करावा लागला. इ० स० ४५५ च्या सुमारास त्यानें हूणांचा पराभव केला असें त्याच्या भितारी शिलास्थंभलेखावरून दिसून येतें. तरी हूणांच्या

स्वाऱ्या इ० स० ५२८ पर्यंत चालू होत्याच.[1] ह्या काळांत किंवा ह्या कालानंतर भारताला सध्याचें स्वरूप येत चाललें, असें समजण्यास हरकत नाहीं. तथापि इ० स० तेराव्या शतकापर्यंत त्यांत एकसारखी भर पडत चालली असावी.

१२९. वनपर्वांतील १९० वा ( कुंभकोण, १९३ वा ) अध्याय किंवा त्यांतील बराच मजकूर महंमद घोरीच्या स्वाऱ्यांनंतर लिहिला असावा असें दिसतें. कित्येक पंडितांची समजूत अशी आहे कीं, हा सर्व अध्याय बौद्धांना उद्देशून आहे. ही चूक होण्याला मुख्य कारण 'एडूकान्पूजयिष्यन्ति' हें वाक्य झालें आहे. पाश्चात्य विद्वानांनी 'एडूक' शब्दाचा अर्थ बौद्धांचे स्तूप असा केल्यानें व त्यांचीच री आमच्याकडील पौरस्त्य पंडितांनी ओढल्यामुळें हा सर्व घोटाळा झाला.

१३०. एडूक शब्दाचा अर्थ स्तूप असा बौद्ध वाङ्मयांत किंवा वैदिक वाङ्मयांत सांपडत नाहीं. 'भित्तिः स्त्री कुड्यमेडूकं यदन्तर्न्यस्तकीकसम्' हें अमरकोषाचें वाक्य. त्याचा अर्थ असा कीं, 'भित्ति शब्द स्त्रीलिंगी, कुड्य हा पण भित्तिवाचक शब्द; त्यांत आणि एडूक यांत एवढाच भेद कीं, ज्या भिंतींत कठिण पदार्थ घातलेला असतो तिला एडूक म्हणतात.' कीकस शब्दाचा साधा अर्थ हाड असा आहे. परंतु येथें तो उपलक्षणेनें कठिनद्रव्यवाचक आहे असें टीकाकाराचें ( महेश्वर भट्टाचें ) म्हणणें;[2] आणि तें अगदीं रास्त आहे. ज्या भिंतींत बळकटीसाठीं लाकडाचा किंवा बांबूंचा सांगाडा घालतात, किंवा दगडांचे वगैरे मधून मधून खांब घालतात, त्या भिंतीला एडूक

---

१. The Early History of India pp. 326-337.

२ कीकसं कठिनद्रव्यस्योपलक्षणम्

म्हणावें, असा याचा सरळ अर्थ आहे. परंतु पाश्चात्य पंडितांनी कीकस याचा अर्थ हाड असा घेतल्यामुळें एकदम त्यांची बुद्धि बौद्धांच्या स्तूपाकडे धांवली, व भिंतीला एडूक म्हणतात हें ते पार विसरून गेले; आणि भिंत व स्तूप यांच्यामध्यें महदंतर आहे, हें त्यांच्या मुळींच लक्ष्यांत राहिलें नाहीं.

१३१. तर मग हे वरील अध्यायांत सांगितलेले एडूक कोणते ? ह्या अध्यायाचें नीटपणें अवलोकन केल्यास त्याचें उत्तर देणें कठिण नाहीं.

म्लेच्छीभूतं जगत्सर्वं निष्क्रियं यज्ञवर्जितम् ।
भविष्यति निरानन्दमनुत्सवमथो तथा ॥२९॥

( सर्व जग म्लेच्छमय होणार. त्यांत यज्ञयागादिक क्रिया, आनन्द व उत्सव रहाणार नाहींत. ) हिंसात्मक यज्ञयागादिक क्रिया जरी बौद्धांच्या काळीं नष्ट झाल्या असल्या, तरी त्या अहिंसात्मक अग्निहोत्रादिकांच्या रूपानें चालू होत्याच. आनन्दमय उत्सव हे तर प्रथमतः अशोक राजानें सुरू केले.[1] बौद्धांच्या

---

१ ते अज देवानं प्रियस प्रियदसिनो राञो धंमचरणेन भेरीघोसो अहो धंमघोसो ॥ चतुर्थशिलालेख ॥

"कनोज राजधानीच्या आग्नेयेस एक भव्य विहार आहे. त्याचा पाया दगडी, भिंती विटांच्या व उंची २०० फूट आहे.... त्याच्या दक्षिणेला थोड्या अंतरावर आदित्यदेवाचें मंदिर, आणि त्याच्या दक्षिणेला थोड्या अंतरावर महेश्वराचें मंदिर आहे. ह्या तीन ठिकाणीं प्रत्येकीं झाडू देण्यास व पाणी वगैरे आणण्यास १००० नोकर आहेत; आणि ह्या मंदिरांतून रात्रंदिवस वाद्यांचा व गाण्याचा गजर सारखा चालू असतो." (Buddhist Records ii. 222–223). ह्या ह्युएन् त्संगच्या वर्णनावरून त्याच्या वेळींहि बौद्धमंदिरांत वाद्यगानाचा जयघोष चालत असे हें स्पष्ट आहे.

विहारांतून ते आजलाहि चालू आहेत. अशाच एका बौद्ध उत्सवामुळें १९१५ सालीं सिलोनमध्यें बौद्धांत व मुसलमानांत भयंकर दंगा झाला. तेव्हां बौद्धांच्या वेळीं आनन्दमय उत्सव बंद पडतील, असें भविष्य वर्तवणें हें पूर्णपणें चुकीचें आहे.

१३२. आतां हा दुसरा श्लोक घ्या.

हाहाकृता द्विजाश्चैव भयार्ता वृषलार्दिताः ।
त्रातारं अलभन्तो वै भ्रमिष्यन्ति महीमिमाम् ॥ ५९ ॥

( वृषलांनी पीडित, भयभीत होऊन गेलेले ब्राह्मण लोक कोणी संरक्षक न मिळाल्यामुळें हाहाःकार करीत सर्व जगभर भटकत फिरतील. ) हा प्रकार बौद्धांच्या चढत्या काळांत झाला असल्याचें आम्हाला तरी माहीत नाहीं. अशोकानें तर, श्रमणांबरोबर ब्राह्मणांचाहि मान ठेवावा व त्यांना दान द्यावें, असें आपल्या शिलालेखांत अनेक ठिकाणीं सांगितलें आहे. ब्रह्मदेशांत व सयामांत, जेथें ब्राह्मण मुळींच नव्हते तेथें, बौद्ध राजांनी ब्राह्मणांना आणून त्यांना वर्षासनें देऊन आपल्या पदरीं ठेवलें. आतां ब्रह्मदेशांत राजाश्रय नसल्यामुळें ब्रह्मी ब्राह्मणांची बरीच दुर्दशा झाली आहे. तरी पण पूर्वीच्या राजगुरूच्या व इतर कांहीं ब्राह्मणांच्या कुटुंबांना ब्रह्मदेशांतील बौद्धांकडून अद्यापिहि मदत मिळते. सयामांत तर त्यांना राजाश्रय आहेच आहे. सिंहलद्वीपांत जर एकादा सुशिक्षित ब्राह्मण गेला तर त्याचा चांगला मान राखण्यांत येतो, असा माझा स्वतःचा अनुभव आहे. तेव्हां बौद्धांच्या वेळीं कोणी त्राता न मिळाल्यामुळें ब्राह्मण जिकडे तिकडे हाहाःकार करीत भटकत फिरणार, असें म्हणणें विलक्षण नव्हे काय ?

१३३. विपरीतश्च लोकोऽयं भविष्यत्यधरोत्तरः ।
एडूकान्पूजयिष्यन्ति वर्जयिष्यन्ति देवताः ।

शूद्रा परिचरिष्यन्ति[1] न द्विजान्युगसंक्षये ॥६५॥
आश्रमेषु महर्षीणां ब्राह्मणावसथेषु च ।
देवस्थानेषु चैत्येषु नागानामलयेषु च ॥६६॥
एडूकचिह्ना पृथिवी न देवगृहभूषिता ।
भविष्यति युगे क्षीणे तद्युगान्तस्य लक्षणम् ॥६७॥[2]

(हा लोकसमाज वरचा खालीं व खालचा वर असा विपरीत होणार आहे. लोक एडूकांची पूजा करतील, व देवतां-वर बहिष्कार घालतील. युगान्ताच्या काळीं शूद्र द्विजांची सेवा करणार नाहींत. महर्षींच्या आश्रमामध्यें, ब्राह्मणांच्या छत्रांमध्यें, देवस्थानांत, चैत्यांत व नागांच्या गृहांत, या सर्व ठिकाणीं ते सेवा करणार नाहींत. जेव्हां युग क्षीण होत जाईल, तेव्हां पृथ्वी एडूकचिह्नांनी अंकित होईल; देवळांनी भूषित होणार नाहीं. तें युगान्ताचें लक्षण समजावें.) ह्या श्लोकांत महर्षींच्या आश्रमांत, ब्राह्मणांच्या छत्रांत, देवस्थानांत आणि चैत्यांत शूद्र लोक सेवा करणार नाहींत, असें लेखक म्हणतो. चैत्य म्हणजे बौद्धांचे स्तूप. अर्थात् ह्या लेखकाचा बौद्धांविषयीं विरोध नाहीं. त्याला उलट वाईट वाटतें कीं, चैत्यांच्या परि-चर्येला शूद्र मिळत नाहींत.

१३४. 'आश्रमेषु महर्षीणां' या श्लोकाचा संबंध एका भाषांतरकारानें 'एडूकचिह्ना पृथिवी' ह्या श्लोकाशीं लावला आहे. तेव्हां त्याचा अर्थ असा होईल कीं, 'महर्षींच्या आश्रमांत, ब्राह्मणांच्या छत्रांत, देवस्थानांत, चैत्यांत व नागगृहांत पृथ्वी एडूकचिह्नांनी अंकित होईल; त्या ठिकाणीं ती देवगृहांनी भूषित रहाणार नाहीं.' कोणचाहि अर्थ घेतला तरी एडूक म्हणजे

१ कुंभकोण—शूद्रा प्रभविष्यन्ति न द्विजा युगसंक्षये ।

२ श्लोकांक कुंभकोण संस्करणाला अनुसरून दिले आहेत.

बौद्धांचे चैत्य ठरत नाहीं. उलट बौद्धांच्या चैत्यांतच एडूक होणार असें हा लेखक म्हणतो.

१३५. आतां एडूक कोणते हें सांगण्याची आवश्यकता आहे काय ? मुसलमान लोकांच्या या देशावर प्रथमतः जेव्हां स्वाऱ्या होऊं लागल्या, तेव्हां त्यांनी या देशांत मोठमोठाल्या मशीदी न बांधतां इदगे बांधण्यास सुरुवात केली. इदगा म्हणजे एक भिंत, जिच्या समोर नमाज पढतात. इदगा काय किंवा मशीद काय नुसत्या भिंती. तेथें देवतांना मज्जाव असावयाचाच. इदग्याच्या किंवा मशीदीच्या आसपास वाद्यें वाजवून किंवा अन्य प्रकारें आनंदोत्सव केला, तर त्याचा परिणाम काय होतो हें आजलाहि सर्वांस माहीत आहेच. तेव्हां हा अध्याय मुसलमानांच्या स्वाऱ्यांनंतर लिहिला गेला, यांत मुळींच शंका नाहीं.

१३६. मुसलमानांची पहिली स्वारी इ० स० सातशें बाराव्या वर्षी झाली. त्या वेळच्या खलीफानें बरेंच सैन्य बरोबर देऊन महंमद इब्न कासीम याला हिंदुस्थानांत पाठविलें. त्यानें मुलतान वगैरे शहरें जिंकलीं; तरी पण भयंकर विध्वंस केला नाहीं. त्यानंतर दुसरे कांहीं मुसलमान पंजाब व सिंधमध्यें आले. त्या सर्वांत मोठा विध्वंसक म्हटला म्हणजे गझनीचा महमूद. त्यानें हिन्दुस्थानांत अनेक देवळांचा विध्वंस केला; ब्राह्मणांचा व बौद्ध भिक्षूंचा एकसारखाच उच्छेद मांडला. त्याच्या ह्या स्वाऱ्यांमुळें जिकडे तिकडे हाहाःकार माजून राहिला. तरी त्यानें देवळांवर व चैत्यांवर इदगे आणि माशीदी बांधल्या नाहींत. हें काम महंमद घोरीनें केलें.

१३७. पाशुपतांच्या अत्याचारांनी बौद्ध आणि जैन पंथांना क्षीणता येत गेली, हें पुढें सांगण्यांत येईलच. तरी पण महंमद

घोरीच्या स्वाऱ्यांपर्यंत पूर्व प्रांतांत बौद्धांचे चैत्य आणि विहा
अस्तित्वांत होतेच. इ० स० ११९७ च्या सुमारास महंम
बख्त्यार यानें बिहार प्रांतांतील एका प्रमुख शहरांत केव
दोनशें घोडेस्वारांसह प्रवेश केला, व तेथील मुंडित ब्राह्मणांच
म्हणजे बौद्ध भिक्षूंचा समूळ उच्छेद केला. महंमदाला मोठ
लूट मिळाली. परंतु तेथील पुस्तकालयांतील पुस्तकें वाचू
त्यांत काय आहे, हें सांगणारा एकहि मनुष्य शिल्लक राहिल
नव्हता. त्यानंतर त्याला असें आढळून आलें कीं, तें तटबं
शहर म्हणजे एक मदरसा (विद्यापीठ) होता. हिंदुस्थानच्य
भाषेंत त्याला विहार म्हणत.[१]

१३८. महंमद घोरीनें आणि त्याच्या सरदारांनी अश
रीतीनें पंक्तिप्रपंच न ठेवतां श्रमणांचा आणि ब्राह्मणांचा सार
खाच संहार चालविला असतां या भविष्यवाद्याला वाई
वाटतें तें हें कीं, ब्राह्मणांच्या देवळांची व बौद्धांच्या चैत्यांच
सेवा शूद्र करूं इच्छित नाहींत. मुसलमानांनी फारच दां
गाई केली असली, तरी त्यांच्या हल्ल्यांपासून खालच्य
जातींच्या पिकून निघणाऱ्या लोकांना थोडाबहुत फायद
झाला असलाच पाहिजे. ब्राह्मणांच्या अन्नछत्रांना व देवळांन
आणि बौद्धांच्या विहारांना ज्या मोठमोठाल्या जहागिऱ्या असत
त्यांतील कुळांवर कसा जुलूम होत असावा, याचें अनुमा
आजकालच्या जमीनदारी पद्धतीवरून करतां येणें शक्य आ
मुसलमानांच्या स्वाऱ्यांनी ह्या पिकून निघणाऱ्या लोकां

१. The Early History of India, pp. 419–20
महंमद घोरीच्याच कुतुबुद्दीन सरदारानें सारनाथ येथील बौद्ध विहारां
नाश केला. वि० ३।२१९ पहा.

मोकळें केलें. त्यायोगें ब्राह्मणांना व भिक्षूंना सेवेसाठीं शूद्र लोक न मिळाल्यामुळें युगक्षय आला असें वाटूं लागलें! मुसलमानांची एकी पाहून देखील त्यांचे डोळे उघडले नाहींत; शूद्रांविषयीची तुच्छ बुद्धि यत्किंचितहि कमी झाली नाहीं!

१३९. वरील विवेचनावरून दिसून येईल कीं, महाभारतांतील हा अध्याय, किंवा निदान त्यांतील वर दिलेला मजकूर महंमद घोरीच्या स्वाऱ्यांनंतर लिहिला गेला आहे. तेव्हां त्याचा काळ तेराव्या शतकांत येतो. अशीं प्रकरणें महाभारतांत अनेक असणें संभवनीय आहे. पण यावरून कोणीहि अशी समजूत करून घेऊं नये कीं, महाभारत फार आधुनिक आहे. त्यांत प्राचीनतम अशा कांही गोष्टी आहेत. उदाहरणार्थ, आम्ही वर निर्दिष्ट केलेली वृत्राचीच कथा घ्या. वृत्र विष्णूचा भक्त होता, ही गोष्ट वेदांच्याहि पूर्वींची असून तिचें पौराणिक पद्धतीनें केलेलें तें वर्णन असणें संभवनीय आहे. तेराव्या शतकापर्यंत ह्या महाभारतांत एकसारखी भर पडत गेली, एवढेंच काय तें आमचें म्हणणें.

१४०. आदिपर्वाच्या पहिल्याच अध्यायांत व्यास म्हणतो—

अष्टौ श्लोकसहस्राणि अष्टौ श्लोकशतानि च ।
अहं वेद्मि शुको वेत्ति संजयो वेत्ति वा न वा ॥८१॥

(आठ हजार आणि आठशें श्लोक मी जाणतों, व शुक जाणतो; पण संजय जाणतो किंवा जाणतहि नाहीं.) म्हणजे महाभारताचे मूळ श्लोक आठ हजार आठशें होते, व ते देखील संजयाला माहीत नव्हते. तेव्हां लहानशा बीजापासून जसा मोठा वृक्ष होतो, तसें हें महाभारत थोड्याशा श्लोकांपासून एक लाख श्लोकांचें झालें. ह्यांत मूळचे श्लोक कोणते व प्रक्षिप्त कोणते हें शोधून काढणें कोणालाहि शक्य नाहीं.

१४१. मूळची गोष्ट अगदीं बेताची असली, तरी त्यांत भर पडण्यास गुप्त राजांच्या वेळीं सुरुवात झाली. त्यांना शकांशीं सामना करावयाचा होता; व त्यासाठीं लोकांमध्यें युद्धप्रेम उत्पन्न करण्याकरतां त्यांनी हें महाभारत पुढें आणलें असावें. त्यांची कृपादृष्टि झाल्याबरोबर ह्या ग्रंथांत वाटेल त्यानें वाटेल ती भर घालण्यास सुरुवात केली; आणि हें काम एकसारखें तेराव्या शतकापर्यंत चालू राहिलें, हें वरील विवेचनावरून समजून येईलच.

१४२. ह्यांत अशा कांहीं विलक्षण गोष्टी रचून भरल्या आहेत कीं, त्यांच्यावर आमच्या पूर्वजांनी विश्वास कसा ठेवला याचें राहून राहून आश्चर्य वाटतें ! प्रथमतः लेखकांनी हें जाळें सामान्य जनतेसाठीं विणलें असावें. पण मागाहून त्यांचेच वंशज कोळ्याप्रमाणें ह्या जाळ्यांत गुरफटले गेले. अशा चमत्कारिक गोष्टींचीं एक दोन उदाहरणें येथें देणें योग्य वाटतें.

१४३. "व्यासानें गांधारीला 'शंभर पुत्र होवोत' असा वर दिला. गांधारी गरोदर झाली; पण दोन वर्षे मूल होईना. इतक्यांत कुंतीला पुत्र झाल्याचें वर्तमान आलें. हें ऐकून गांधारीनें आपलें पोट बडविलें. त्यामुळें तिच्या पोटांतून मांसाचा गोळा निघाला. तें जाणून व्यास तावडतोब तेथें आला; व त्यानें तुपानें शंभर घडे भरावयास लावून ते सुरक्षित स्थळीं ठेवविले, व तो गोळा थंड पाण्यानें धुवावयास लावला. तो धुतला जात असतांच त्याचे बोटांच्या पेरांएवढ्या आकाराचे एकशें एक तुकडे झाले. ते तुकडे त्या तुपाच्या घड्यांमध्यें घालून ठेवावयास लावून व्यास चालता झाला. त्यांतून प्रथम दुर्योधन निघाला....त्यानंतर बाकीचे पुत्र निघून शंभरांची

भरती झाली; व एका महिन्यानंतर एक कन्या निघाली." [ आदिपर्व, अ० ११५ ].[१] ही कथा इतकी असंभवनीय आहे कीं, तिच्यावर कोणाचाहि विश्वास बसणें शक्य दिसत नाहीं. तथापि पांच पन्नास वर्षांमागें आमच्यामध्यें ती कथा ऐतिहासिक समजणारे पुष्कळ लोक होते; व आजला देखील खेड्यापाड्यांतून पुष्कळ सांपडतील.

१४४. दुसरी एक कथा म्हटली म्हणजे खांडव वन जाळण्याची होय.[२] "अग्नि ब्राह्मणवेषानें येऊन कृष्णार्जुनापाशीं आपल्या तृप्तीसाठीं कांहीं मागूं लागला. त्यांनी त्याला 'कोणतें अन्न हवें' असें विचारलें. तो म्हणाला, 'मला अन्न नको. पण हें खांडव वन खावयास पाहिजे. इंद्र त्याचें रक्षण करतो, म्हणून तें मी खाऊं शकत नाहीं. मी पेट घेतल्याबरोबर इंद्र त्यावर पावसाचा वर्षाव करतो.'

१४५. "ही कथा ऐकून जनमेजय विचारतो, 'पण हा अग्नि खांडव वन कां जाळूं पहात होता ?' वैशंपायन त्याला सांगतो, 'श्वेतकि नांवाच्या राजाला यज्ञाची फारच चट लागली. ऋत्विज धुराला कंटाळून यज्ञ सोडून गेले. त्यांच्या परवानगीनें दुसरे ऋत्विज आणून तें यज्ञसत्र संपविण्यांत आलें. त्यानंतर श्वेतकीनें शंभर वर्षें चालू रहाणारें यज्ञसत्र करण्याचा विचार केला. ब्राह्मणांच्या पायां पडला; त्यांना दान दिलें; पण श्वेतकीच्या यज्ञांना ब्राह्मण येईनात. ते रागावून म्हणाले, 'आम्ही थकून गेलों आहोंत. तूं रुद्रालाच बोलावून तुझा यज्ञ करावयास लाव.' तेव्हां त्या राजानें कैलासाला जाऊन उग्र तप केलें.

---

१ औंध संस्करण; कुंभकोण अ० १२९.

२ आदिपर्व, औंध सं० अ० २२५–२३० कुंभकोण, अ० २४९-२५४.

त्यामुळें शंकर प्रसन्न झाला, व वर माग म्हणाला. 'तूंच माझ्या यज्ञांत ऋत्विज हो', असा श्वेतकीनें वर मागितला. पण महादेवाला याजक होणें शक्य नव्हतें. त्यानें श्वेतकीला बारा वर्षें पर्यंत सतत तुपाच्या धारांनी अग्निपूजा करण्यास लावलें. त्या प्रमाणें श्वेतकीनें केल्यावर महादेव प्रसन्न झाला आणि म्हणाला, 'माझाच अवतार दुर्वास ऋषि आतां तुझ्या यज्ञांत ऋत्विज होईल.'

१४६. "त्याप्रमाणें श्वेतकीनें यज्ञाची तयारी केली; व मग महादेवानें दुर्वासाला पाठविलें. तो यज्ञ फार मोठा झाला. त्यामुळें अग्नीला विकार जडला; तो निस्तेज झाला; व त्याला फार ग्लानि आली. ब्रह्मदेवाजवळ जाऊन त्यानें यावर उपाय विचारला. बारा वर्षें आहुति खाल्यामुळें तुला हा रोग जडला, असें सांगून ब्रह्मा म्हणाला, 'तूं काळजी करूं नकोस. खांडव वनांतील सर्व प्राण्यांची चरबी खाल्यावर तुझा हा रोग बरा होईल.' अग्नि खांडव वन जाळण्यास आरंभ करी, व तेथील प्राणी तें विझवीत. असा प्रकार सातदां घडला.

१४७. "तेव्हां अग्नि रागावून ब्रह्मदेवापाशीं गेला. ब्रह्मदेवानें त्याला वासुदेवार्जुनांकडे पाठविलें. त्यानंतर कृष्णार्जुनांनी मोठी तयारी करून खांडव वन अग्निसात् करण्याला सुरुवात केली. त्या वेळीं खांडव वनांतील प्राण्यांची कशी स्थिति झाली, याचें भेसूर वर्णन दोनशें अठ्ठाविसाव्या अध्यायांत[1] आहे. तें वाचून पाहिलें म्हणजे महमूद गझनीच्या स्वाऱ्यांचीं वर्णनें त्याच्यासमोर अगदींच फिकीं वाटतात. अशा संकटसमयीं तेथील प्राणी इंद्राला शरण गेले. इंद्रानें एकदम पावसाचा

१ कुम्भकोण, अ० २५२.

वर्षाव केला. पावसाला अडथळा करण्याकरितां अर्जुनानें बाणांनी आकाश आच्छादून टाकलें. त्या वेळीं तक्षक नाग कुरुक्षेत्रांत होता. त्याचा मुलगा अश्वसेन आगींत सांपडला. त्याच्या आईनें त्याला वांचवण्यासाठीं गिळून टाकलें व ती पळूं लागली. अर्जुनानें बाण सोडून तिचें डोकें कापलें. अश्वसेन तिच्या पोटांतून बाहेर निघाला. त्याचा बचाव करण्यासाठीं इंद्रानें वाऱ्याचा प्रवाह सोडून अर्जुनाला मोहित केलें. त्यामुळें अश्वसेन बचावला गेला....

तस्मिन्वने दह्यमाने षडग्निर्न ददाह च।
अश्वसेनं मयं चैव चतुरः शार्ङ्गकांस्तथा॥

(तें वन जाळलें गेलें असतां अश्वसेन, मय आणि चार शार्ङ्गक म्हणजे शार्ङ्ग पक्षाचीं पिलें, हे सहा प्राणी तेवढे अग्नीनें जाळले नाहींत.)"[1]

१४८. या कथेचा सारांश तेवढा येथें दिला आहे. त्याच्यावरून असें दिसून येईल कीं, या कथेंत अथपासून इतिपर्यंत ताळतंत्र असा कोठेंच नाहीं. अग्नीला तुपामुळें मांद्य आलें. पण त्याच्यावर उपाय काय, तर खांडव वनांतील प्राण्यांची वसा खाणें. पुष्कळ तूप खाल्ल्यानें उत्पन्न झालेला रोग वसा खाल्ल्यानें बरा होतो ही एक अपूर्वच गोष्ट म्हणावयाची! ब्रह्मदेव सर्व प्राण्यांचा पितामह. पण तोच खांडव वनांतील प्राण्यांना खाण्याचा अग्नीला सल्ला देतो! वासुदेवाचा व अर्जुनाचा खांडव वनांतील प्राण्यांशीं कांहीं एक संबंध नाहीं. असें असतां ते तेथील एकूण एक प्राण्यांचा संहार करतात! इतकेंच नव्हे,

---

१ औंध, अ० २३०।४७; कुंभकोण, अ० २५४।४७.

अश्वसेन पळून गेल्यामुळें खवळून जाऊन ते व अग्नि सगळयाच नागांना शाप देतात ! इंद्र अर्जुनाचा बाप. इतर ठिकाणीं अर्जुनाचें रक्षण करण्यासाठीं ब्राह्मणवेषानें तो कर्णाचीं कवचकुंडलें हिरावून घेतो;[1] आणि येथें अर्जुनाशींच युद्ध करतो ! तेव्हां अशा असंबद्ध गोष्टी रचणारांची डोकीं ताळयावर होतीं कीं काय, अशी वारंवार शंका येते.

१४९. ह्या गोष्टीच्या मागें लपून बसलेलें थोडेसें सत्य असणें संभवनीय आहे. कृष्णाची व इन्द्राची लढाई झाल्याचा उल्लेख पहिल्या विभागांत आलाच आहे.[2] त्यांत इन्द्राला माघार घ्यावी लागली. त्यानन्तर कृष्णानें द्वारकेकडे जाण्याचा प्रयत्न केला असावा. पण वाटेंत या खांडव वनांत अशा कांहीं लोकांच्या टोळया होत्या कीं, त्या त्याच्या मार्गांत आड येऊं लागल्या. तेव्हां कृष्णानें ह्या वनाला आग लाऊन सर्व वन भस्मसात् केलें, व आपला मार्ग मोकळा करून घेतला. असा कांहीं तरी मूळ प्रकार असून त्याला सध्या महाभारतांत सांपडणारें अत्यन्त विलक्षण व भेसूर स्वरूप आलें असणें शक्य आहे. पण महाभारतांतल्या असल्या गोष्टींतून ऐतिहासिक सत्य शोधून काढणें म्हणजे डांबरांतून साखर काढण्याइतकेंच कठिण काम आहे; आणि अनेक ठिकाणीं तर तें वाळूंतून तेल काढण्याच्या प्रयत्नाइतकें निष्फळ आहे. तेव्हां हें महाभारताचें परीक्षण येथेंच सोडून देऊन त्यांतील जें सध्या लोकमान्य झालेलें प्रकरण त्याजकडे वळूं.

---

१ औंध, आदिपर्व, अ० १११ । २७–२८; कुंभकोण, अ० १२० । ४६–४८.   २ वि० १ । ४८–५४.

# भगवद्गीता

१५०. कौरवांचीं व पांडवांचीं सैन्यें समोरासमोर येऊन भिडलीं. तेव्हां अर्जुनाला आपल्याच भाऊबंदांना कसें मारावें असा विचार पडला, व तो खिन्न होऊन बसला. त्या वेळीं कृष्णानें त्याला अनेक प्रकारें उपदेश करून युद्धाला प्रवृत्त केलें. हा या गीतेचा संदर्भ. आतां येथें असा प्रश्न येतो कीं, जर ह्या ग्रंथकाराला कांहीं विशिष्ट तत्त्वज्ञान सांगावयाचें होतें, तर त्यानें तें अशा प्रसंगीं कां घुसडून दिलें ? खरोखर पाहिलें असतां कोणतें एक विशिष्ट तत्त्वज्ञान सांगण्याचा ग्रंथकाराचा उद्देश नाहीं, असें गीतेच्या निरीक्षणावरून दिसून येईल. अर्जुनाला लढाई नको आहे. त्याला अनेक युक्तिवादांनी लढाईला प्रवृत्त करावें, हाच काय तो या ग्रंथाचा उद्देश. तथापि त्यांत अनेक तत्त्वदृष्टींची अशी कालवाकालव केली आहे कीं, त्यामुळें विद्वान् म्हणवणाऱ्या माणसांनाहि भ्रम उत्पन्न होतो.

१५१. उदाहरणार्थ दुसरा अध्याय घ्या. "हा आत्मा जन्मत नाहीं व मरत नाहीं. हा जन्मला होता किंवा पुढें जन्मेल असें नाहीं. हा अज, नित्य, शाश्वत व पुरातन असा आहे. शरीराची हत्या झाली तरी ह्याची हत्या होत नाहीं." (२०). याप्रमाणें आत्म्याचें अजरामरत्व सिद्ध करून भगवान् म्हणतात, "आतां हा आत्मा नेहमीं जन्मतो व नेहमीं मरतो, असें तूं मानीत असलास तरीहि, हे महाबाहो, त्याबद्दल शोक करणें तुला योग्य नाहीं. कारण जो जन्माला आला त्याला मृत्यु निश्चित आहे; आणि जो मेला त्याला जन्म निश्चित आहे. म्हणून ह्या अपरिहार्य गोष्टीचा शोक करणें तुला योग्य नाहीं. हीं भूतें जन्मापूर्वी अव्यक्त स्थितींत असतात; नंतर व्यक्त होतात, व

मरणानंतर पुन्हा अव्यक्त होतात. तेव्हां त्यांविषयीं शोक कां करावा ?" ( २६–२८ ). म्हणजे भगवंताचें म्हणणें हें कीं, आत्मा अविनाशी मानला किंवा विनाशी मानला, तरी लढाई करणें योग्य आहे. ही नुसती वकिली झाली. आत्मा नित्य असला किंवा अनित्य असला तरी लढाई न करणें कां योग्य होऊ नये ?

१५२. त्याला भगवान् उत्तर देतात, "स्वधर्माच्याहि दृष्टीनें कचरणें तुला योग्य नाहीं. कां कीं, क्षत्रियाच्या धर्माला अनुकूल असें जें युद्ध त्याच्याहून अधिक श्रेयस्कर दुसरें कांहीं क्षत्रियासाठीं नाहीं. हे पार्था ! दैवगत्या उघडलेलें हें स्वर्गाचें द्वारच आहे. अशा तऱ्हेचें युद्ध भाग्यवान् क्षत्रियांना लाभत असतें. असें हें स्वधर्मानुकूल युद्ध जर तूं करणार नाहींस, तर स्वधर्म आणि कीर्ति गमावून पापांत पडशील. सर्व लोक तुझी निरंतर अपकीर्ति गातील; व संभाविताला अपकीर्ति मरणापेक्षांहि जास्त आहे." ( ३१–३४ ). येथें भगवान् तत्त्वज्ञान सोडून व्यवहारांत आले. क्षत्रियाचा स्वधर्म म्हणजे लढाई करणें; तो धर्म सोडून तूं पळालास तर तुझी लोकांत अपकीर्ति होईल; आणि ती मरणापेक्षांहि वाईट. याच्यावरून स्पष्ट होत आहे कीं, या गीतेचा उद्देश अर्जुनाला कोणत्या ना कोणत्या रूपानें लढाईला प्रवृत्त करण्याचा आहे.

१५३. असें असतां ह्याच अध्यायांत जी ब्राह्मी स्थिति सांगितली तिचा आणि या अध्यायाचा अर्थाअर्थी कांहीं संबंध दिसत नाहीं. भगवान् म्हणतात, "हे पार्था, जेव्हां कोणी आपल्या मनांतील कामवासना सोडून देतो आणि आपल्याच ठायीं संतुष्ट होऊन रहातो, तेव्हां त्याला स्थितप्रज्ञ म्हणतात. ज्याचें मन दुःखांत उद्विग्न होत नाहीं, सुखांत ज्याला आसक्ति नाहीं, काम, भय आणि क्रोध हे ज्याचे नष्ट झाले, त्याला स्थित-

प्रज्ञ मुनि म्हणतात. ( ५५-५६ )...जो पुरुष विषयांचें चिंतन करतो, त्यांमध्यें त्याची आसक्ति जडते; आसक्तीपासून कामवासना उत्पन्न होते; कामवासनेपासून क्रोध उद्भवतो; क्रोधापासून संमोह, संमोहापासून स्मृतिविभ्रम, स्मृतिविभ्रमापासून बुद्धिनाश आणि बुद्धिनाशापासून तो समूळ नाश पावतो. ( ६२-६३ )...सर्व कामवासना सोडून जो मनुष्य निरिच्छपणें वागतो, आणि ज्याला ममत्व व अहंकार रहात नाहीं, त्याला शांति मिळते. हे पार्था, ब्राह्मी स्थिति ती हीच. ही प्राप्त झाली असतां मनुष्य मोहांत पडत नाहीं. अन्तकाळीं देखील ही स्थिति प्राप्त झाली, तरी तो ब्रह्मनिर्वाण पावतो." ( ७१-७२ ).

१५४. ब्राह्मी स्थितीच्या किंवा स्थितप्रज्ञाच्या वर्णनांतील कांहीं श्लोकांचें भाषांतर विस्तारभयास्तव गाळलें आहे. तें मुळांत पहातां येण्याजोगें आहेच. हें सर्व वर्णन बौद्ध ग्रंथांच्या आधारें लिहिलें आहे, असें बहुतेक पाश्चात्य विद्वानांचें मत आहे; आणि तें 'ब्रह्मनिर्वाणमृच्छति' या शेवटल्या श्लोकाच्या वाक्यावरून योग्य ठरतें. यांत स्मृतिविभ्रम, निराहार वगैरे शब्दांचे अर्थ बौद्ध परिभाषा जाणल्याशिवाय बरोबर समजणार नाहींत. ह्या बौद्ध तत्त्वज्ञानाचा आणि लढाईचा अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं. असें असतां तें ह्याच अध्यायांत घुसडून देण्यांत आलें आहे.

१५५. या परस्परविरोधाची उपपत्ति लावावयाची असली, तर हा ग्रंथ कोणासाठीं लिहिला, हें प्रथमतः समजून घ्यावें लागेल. वसुबंधूचा पुरगुप्त मित्र होता. त्यानें आपल्या मुलाला व महाराणीला वसुबंधूपासून बौद्ध तत्त्वज्ञान शिकावयास लावलें. पुरगुप्त निवर्तल्यानंतर बालादित्यानें वसुबंधूला आण-

तून आपल्या राजधानींत ठेवलें; व त्याची तो वारंवार सल्ला घेत असे. बालादित्याला आपल्याच नातलगांशीं आणि दुसऱ्या अनेक राजांशीं लढण्याचा प्रसंग आला असावा. तेव्हां त्याच्या मनांत वारंवार अशी शंका येणें साहजिक होतें कीं, केवळ राज्यलोभासाठीं मी माझ्या आप्तमित्रांशीं कां लढावें ? वसुबंधूसारख्या बौद्ध पंडिताचें त्याच्यावर बरेंच वजन असल्याकारणानें बौद्धांचें जें प्राप्तव्य—ज्याला येथें ब्राह्मी स्थिति म्हटलें आहे—त्याच्याविषयींहि त्याच्या मनांत फार आदर होता. तेव्हां एका बाजूला आप्तमित्रांशीं लढाई करण्याचा प्रसंग, व दुसऱ्या बाजूला वसुबंधूसारख्या बौद्धपंडिताचा उपदेश, ह्या दोहोंमध्यें त्याचें मन एकसारखें हेलकावे खात असल्यास मुळींच नवल नाहीं. अशा परिस्थितींत बालादित्यानें एकाद्या ब्राह्मणाला यांतून मार्ग काढण्यासाठीं एकादा ग्रंथ निर्माण करण्यास सांगितलें, व त्यानें ही भगवद्गीता महाभारतांत घातली असावी.

१५६. येथें असा प्रश्न उद्‌भवतो कीं, गीता बालादित्याच्या वेळीं लिहिली याला आधार काय ? वसुबंधु विज्ञानवादाचा उत्पादक; व त्या विज्ञानवादावर टीका खुद्द ब्रह्मसूत्रभाष्याच्या दुसऱ्या अध्यायाच्या दुसऱ्या पादांत खालील सूत्रांत केलेली आढळते. नाभाव उपलब्धेः ॥ २८ ॥ वैधर्म्याच्च न स्वप्नादिवत् ॥ २९ ॥ न भावोऽनुपलब्धेः ॥ ३० ॥ क्षणिकात्वाच्च ॥ ३१ ॥ अर्थात् वसुबंधु ब्रह्मसूत्रकाराच्या पूर्वी असावयास पाहिजे. फार झालें तर वसुबंधु व ब्रह्मसूत्रकार हे दोघेहि समकालीन ठरतील. 'ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ( अ० १३, श्लो० ४ )' या वाक्यावरून गीता ब्रह्मसूत्रानंतरची आहे, यांत कांहींच शंका रहात नाहीं. ती ब्रह्मसूत्राच्या कर्त्यानेंच किंवा कोणी तरी त्याच्या भक्तानें रचली असली पाहिजे. या दृष्टीनें ती

बालादित्यानंतरहि लिहिली असावी, असें समजण्यास हरकत नाहीं. तथापि सर्व गुप्त राजांचा कुलदेव वासुदेव, चातुर्वर्ण्याविषयीं त्यांचा पक्षपात, सार्वभौमत्व संपादण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा, व खास बालादित्याचा वसुबंधूविषयीं असलेला आदर, या सर्व गोष्टींचा विचार केला असतां गीता बालादित्याच्याच वेळीं लिहिली असावी, ह्या अनुमानाला विशेष बळकटी येते.

१५७. वसुबंधूला समुद्रगुप्ताचा गुरु ठरविण्याचा जो विन्सेन्ट स्मिथ यांनी पेरीच्या आधारें प्रयत्न केला आहे तो अप्रस्तुत दिसतो. प्रो० पाठक यांच्या लेखाचा, परमार्थ यानें लिहिलेल्या वसुबंधूच्या चरित्राचा, ह्युएन् त्संगनें दिलेल्या वसुबंधूच्या कथेचा, व तिबेटियन परंपरेचा विचार केला असतां वसुबंधु बालादित्याचाच गुरु होता असें सिद्ध होतें[१]. तेव्हां बालादित्याच्या वेळीं बादरायणानें किंवा त्याच्या एकाद्या शिष्यानें भगवद्गीता लिहिली असावी, असें गृहीत धरणें योग्य वाटतें.

---

१ Political History of Ancient India, p. 363. वसुबंधूच्या काळाचा ऊहापोह वि० स्मिथ यांनी Early History of India pp. 346-47 मध्यें केला आहे. त्यांच्या मताप्रमाणें वसुबंधु समुद्रगुप्ताचा गुरु होता. तसें धरलें तरी गीता गुप्तकालांतीलच ठरते. परंतु हेमचंद्र रायचौधरी यांनी निर्देशिलेला बालादित्यच वसुबंधूचा शिष्य असणें अधिक संभवनीय आहे. बालादित्य इ० स० ४६७ सांत गादीवर आला असें वि० स्मिथ यांचे म्हणणें. हाच वसुबंधूचा काळ धरला, तर परमार्थ, ह्युएन् त्संग व तिबेटियन ग्रंथकार या सर्वांनी लिहिलेल्या वसुबंधूच्या कथानकांची ह्या काळासंबंधीं एक वाक्यता होईल असें वाटतें.

१५८. भगवद्गीतेला इ० स० पूर्वी पहिल्या शतकांत घालण्याचे जे प्रयत्न चालू आहेत, ते सर्व निष्फळ दिसतात. हेलियोदोरानें बेसनगर येथें गरुडध्वज बांधला म्हणून जर गीता त्याच्या काळची ठरते, तर वेदांत शेंकडों ठिकाणीं वृत्राचें नांव आलें असल्याकारणानें महाभारतांतील वृत्रगीता वेदाच्या पूर्वींची कां ठरूं नये ? चूळनिद्देसांतील वासुदेवाच्या निर्देशावरून त्या वेळीं भगवद्गीता होती हें कसें सिद्ध होतें ? गीतेला बालादित्याच्या समकालीन समजल्यानें गीतेची किंमत कमी होईल असेंहि आम्हास वाटत नाहीं. कां कीं, प्राचीनतम ठरल्यानें ग्रंथाची किंमत वाढते, ही समजूत चुकीची आहे.

१५९. गीता वासुदेवाच्या तोंडीं घालण्याचें कारण एवढेंच कीं, तो गुप्त राजांचा कुलदेव होता. लढाई सोडून देण्याची वृत्ति नष्ट करण्यासाठीं प्रसंग युद्धभूमीवरचा आणला आहे. तरी पण बालादित्याला बौद्धांच्या निर्वाणाचीहि आवड होतीच. तेव्हां दुसऱ्याच अध्यायांत ही ब्राह्मी स्थितिहि घुसडून दिली आहे. त्यानंतर बालादित्याची आवड-निवड पाहून ग्रंथकारानें सांख्य, योग इत्यादिकांचीहि या ग्रंथांत वाटेल तेवढी भेसळ केली आहे; विश्वरूप दर्शनाचाहि काव्यात्मक प्रसंग आणला आहे. असा हा ग्रंथ त्या काळच्या अधिकारी वर्गाला प्रिय झाला यांत मुळींच आश्चर्य नाहीं. इकडे तिकडे थोडाबहुत फेरफार केला असतां आजकालच्या अधिकारी वर्गालाहि हें तत्त्वज्ञान पटण्याजोगें आहे.

१६०. समजा, एकादा रॅम्से म्याक्डोनल्डसारखा शांततावादी मुत्सद्दी सध्या चाललेल्या युद्धाच्या तयारीच्या प्रसंगीं राजकारणाचीं शस्त्रास्त्रें खालीं ठेवून म्हणाला, 'हे जर्मन, हे फ्रेंच, हे सर्व आमचे सखे सोयरे आहेत. त्यांची व आमची संस्कृति

एक आहे. त्यांत आमचे गुरु आहेत. आमच्यांत त्यांचे पुष्कळसे नातेवाईक आहेत. तेव्हां त्यांच्याशीं लढण्याची तयारी करण्यापेक्षां त्यांनीच आम्हांला मारावें हें अधिक श्रेयस्कर आहे ( आम्ही सत्याग्रह करूंया ).' त्यावर भांडवलशाहीचा भगवान् म्हणेल, 'कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम्. अरे गृहस्था, अशा बिकट प्रसंगीं हें दौर्बल्य तुला आलें कोठून ? मी हें भांडवलशाहीचें जग गुणकर्मविभागशः निर्माण केलें आहे. यांत सर्व गुण भांडवलवाल्यांपाशीं व सर्व कर्म ( म्हणजे काम ) मजुरांपाशीं देण्यांत आलें आहे. अशा जगांत उत्पन्न झालेला जो तूं त्यानें जर हें चक्र पुढें चालवलें नाहीं, तर हें जग नष्ट होऊन जाईल ( बोल्शेव्हिकी होईल ). हें पहा, मला कांहींच कर्में करण्याची जरूरी नाहीं. असें असतां मी इतरांप्रमाणें कर्में कां करतों ? कारण भांडवलशाही रक्षण्याचें काम जर मी केलें नाहीं, तर मी संकराचा कर्ता होईन. म्हणजे भांडवलवाले आणि मजूर यांची भेसळ होऊन जाईल; व त्यायोगें भांडवलवाल्यांचें जग नष्ट होईल ! यासाठीं लढणें तुला योग्य आहे. माझें स्मरण कर, व युद्धाला तयार हो.'

१६१. दुसरा एकादा शांततावादी जपानी परराष्ट्रमंत्री म्हणेल, 'ह्या चिनी लोकांपासून आम्ही सर्व कलाकौशल्य शिकलों. त्यांनीच आम्हाला बौद्ध धर्म दिला. अशा आमच्या गुरुतुल्य देशाला त्रास देऊन आमची राज्यतृष्णा शमविणें योग्य नाहीं. याच्यापुढें मी त्यांच्याशीं मैत्रीभावानें वागण्याचा मार्ग स्वीकारीन !' असें म्हणून तो जर आपलीं राजकारणाचीं सूत्रें मृदुपणें हालवूं लागला, तर जपानी भगवान् आराकीसारख्या युद्धसारथ्याच्या रूपानें प्रगट होऊन म्हणेल, 'अरे वेड्या, हे कसले विचार घेऊन बसला आहेस ? हा आत्मा

विनाशी किंवा अविनाशी असला, तरी देखील युद्धच श्रेयस्कर आहे. कारण आत्मा अविनाशी असला तर गुरूंना मारलें तरी त्यांचा आत्मा मरत नाहीं. जर त्यांचा आत्मा विनाशी आहे असें धरलें, तर नाशवंताचा नाश केल्यास पाप कोणतें? तुला ह्या दिवाणगिरीवर चढवण्याला मी कारण आहें; आणि आतां आयत्या वेळीं तूं जर रणक्षेत्र सोडून पळूं लागलास, तर तुझी सर्व लोक अपकीर्ति गातील. तेव्हां माझें स्मरण करून युद्धाला सिद्ध हो.'

१६२. परन्तु यदाकदाचित् या शांततावादी परराष्ट्रमंत्र्याला थोडीबहुत शंका उपस्थित झाली कीं, चीनला दावणें जरी सुलभ असलें, तरी आमच्या ह्या वर्तनानें दोन्ही राष्ट्रांवर संकट येणार नाहीं कशावरून? इकडे अमेरिका व इंग्लंड आणि तिकडे बोल्शेव्हिकांचें वाढतें सामर्थ्य, अशा कचाटींत आम्ही आहोंत. तेव्हां बौद्धांच्या तत्त्वाप्रमाणें प्रेमानें वागून परस्परांचा स्नेह-संबंध जोडणें हितावह नाहीं होणार कशावरून? हा विचार लष्करी भगवंताला समजल्याबरोबर पांच दहा मोठमोठ्या अधिकाऱ्यांचे खून करून तो आपलें विश्वरूप प्रकट करील. तें पाहिल्याबरोबर या परराष्ट्रमंत्र्याची खात्री होईल कीं, युद्धापेक्षां दुसरें कांहीं श्रेयस्कर नाहीं; व तो म्हणेल—

'नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत।
स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव॥'

(हे कधींच च्युत न होणाऱ्या लष्करी भगवंता, तुझ्या प्रसादानें माझा मोह गेला, व स्मृति उत्पन्न झाली. माझा संशय फिटला. आतां मी तुझ्या वचनाप्रमाणें चालतों.)

१६३. अशा प्रकारें सर्व राष्ट्रांतील अधिकारी वर्गांच्या भग-वंतांच्या तोंडीं ही गीता शोभण्यासारखी आहे. देशकाला-

प्रमाणें तींत थोडाबहुत फेरफार करावा लागेल, एवढेंच काय तें. त्या काळच्या स्त्रियांची, वैश्यांची व शूद्रांची जशी गीतेंत व्यवस्था लावण्यांत आली आहे, तशी भांडवलशाही जगांत आजहि लावतां येण्याजोगी आहे. या भांडवलशाही भगवंताची पूजा स्त्रियाहि करूं शकतात. त्यांना लढाईंत भाग घेतां आला नाहीं, तरी गिरणीमध्यें लढाऊ सामान वगैरे करण्याचें काम करतां येतें. ज्या म्हाताऱ्याकोताऱ्या असतील त्यांना लष्करी लोकांसाठीं कपडे विणतां किंवा शिवतां येतात. त्याचप्रमाणें लढाईंत भाग न घेणाऱ्या पुष्कळशा शूद्रांना खंदक खोदण्याचीं, रसद पुरवण्याचीं वगैरे कामें करतां येतात. वैश्यांना लढाईसाठीं कर्ज उभारतां येतें. एवंच अशा रीतीनें भांडवलशाही जगांतील सर्व वर्गांतील स्त्रीपुरुषांनी अनन्यभावें भगवंताची पूजा केली, तर कौरव-पांडवांप्रमाणें सर्वांनाच मोक्ष मिळणें शक्य आहे !

१६४. गीतेंत ब्राह्मी स्थिति बौद्धांपासून घेतली, हें वर सांगितलेंच आहे. पण बौद्धांच्या कांहीं तत्त्वांचा विपर्यास केला आहे. त्यांपैकीं मुख्य कर्मयोग आहे. बुद्धाचा कर्मयोग म्हटला म्हणजे, 'कोणत्याहि प्रकारें इतर जनांची हानि होईल अशीं कर्मे करूं नयेत, सर्वांचें कल्याण होईल अशा कर्मांचा पूर्ण विकास करावा, आणि त्यांतहि चित्तशुद्धि ठेवावी, म्हणजे सत्कर्मांचाहि अभिमान बाळगूं नये.'[1] याचा विपर्यास गीतेंत असा केला आहे कीं, 'बापानें चालविलेला जो धंदा असेल, तो स्वधर्म समजून करावा, व त्यांत आसक्ति ठेवूं नये; म्हणजे त्या कर्मांचा परिणाम काय होईल, याचा मुळींच विचार करूं नये.'

---

१ सब्ब पापस्स अकरणं कुसलस्स उपसम्पदा ।
सचित्तपरियोदपनं एतं बुद्धान सासनं ॥ धम्मपद ॥

१६५. लोकसंग्रह याचाहि असाच विपर्यास झाला आहे. बौद्ध ग्रंथांत लोकसंग्रह चार सांगितलेले आहेत; ते असे—

दानं च पेय्यवज्जं च अत्थचरिया च या इध ।
समानत्तता च धम्मेसु तत्थ तत्थ यथारहं ।
एते खो संगहा लोके रथस्साणीव यायतो ॥
एते च संगहा नास्सु न माता पुत्तकारणा ।
लभेथ मानं पूजं वा पिता वा पुत्तकारणा ॥[१]

( दान, प्रियवचन, अर्थचर्या आणि समभावानें वागणें, हे यथा-योग्य वेळीं आचरणांत येणारे चार संग्रह इहलोकीं—समाजाच्या—रथाच्या आंसाप्रमाणें आहेत. जर हे संग्रह नसते, तर केवळ मुलाला जन्म दिला म्हणून मातेला अथवा पित्याला मान व पूजा मिळाली नसती. )

१६६. आईबापांनी मुलाला योग्य पदार्थांचें दान दिलें नाहीं, गोड शब्दांनी त्याचें मन सन्मार्गाकडे वळवलें नाहीं, योग्य वयांत त्याच्या अभ्यासाची व उन्नतीची काळजी घेतली नाहीं, आणि तो वयांत आल्यावर त्याला समभावानें वागवलें नाहीं, तर केवळ जन्म दिला म्हणून तो मुलगा आईबापांचा मान ठेवील किंवा पूजा करील असें नाहीं. अर्थात् दान, प्रियवचन, अर्थचर्या किंवा हिताची काळजी घेणें, आणि समानात्मता किंवा समभाव हे चार लोकसंग्रह उत्तरोत्तर श्रेष्ठ आहेत.

१६७. परन्तु भगवद्गीतेंत त्यांचा निखालस विपर्यास केला आहे; तो असा—"मी जर कर्म न करीन तर हे सर्व लोक नाश पावतील; आणि मी संकराचा कर्ता होईन, व ह्या प्रजांचा घात

---

१ अंगुत्तरनिकाय, चतुक्कनिपात, पण्णासक १।४।२; दीघनिकाय, सिगालकसुत्त.

करीन. कर्मांत आसक्त झालेले अज्ञानी लोक ज्याप्रमाणें कर्में करतात, त्याप्रमाणें लोकसंग्रह करूं इच्छिणाऱ्या ज्ञानी पुरुषानें आसक्ति सोडून आपलीं कर्में करावींत. कर्मांच्याठायीं आसक्त असलेल्या अज्ञ जनांचा बुद्धिभेद करूं नये. विद्वान् मनुष्यानें आपण योगयुक्त होऊन इतरांकडून सर्व कर्में करवावींत." ( अध्याय ३, श्लो० २४–२६ ).

१६८. येथें लोकसंग्रह म्हणजे जेणेंकरून वर्णसंकर होणार नाहीं अशा तऱ्हेनें वागणें. त्यासाठीं आपणाला जरी तत्त्व माहीत असलें, तरी अज्ञ जनांचा बुद्धिभेद न करतां त्यांना चाललेल्या व्यवहाराप्रमाणें वागण्यास उत्तेजन द्यावें. अशाच समजुतीमुळें महाराष्ट्रांत गणपतीचे मेळे आणि शिवाजीचा उत्सव निघाला हें सांगावयास नकोच. परन्तु अशा लोकसंग्रहाचा परिणाम असा होतो कीं, जो शिंगें मोडून वासरांत शिरूं पहातो तो स्वतःहि वासरूंच बनतो. लोकांसाठीं म्हणून तो लिंगाची किंवा गणपतीची पूजा सुरू करतो, पण शेवटीं आपणच त्यांत गुरफटला जातो. त्यामुळें लोकांचें तर कल्याण होतच नाहीं, पण हा स्वतः मात्र अत्यन्त धर्मवेडा बनतो.

१६९. आतां असा प्रश्न येतो कीं, जर बौद्धांच्या तत्त्वज्ञानाचा अशा रीतीनें विपर्यास करण्यांत येत होता, तर त्यावर एकाद्या बौद्ध पंडितानें खरमरीत उत्तर कां दिलें नाहीं? भगवद्गीतेच्या वेळीं दिङ्नागासारखे मोठमोठाले बौद्ध पंडित होते. असें असतां गीतेसारख्या ग्रंथाला विरोधात्मक अशा त्यांनी चार सहा ओळी कां लिहिल्या नाहींत? एक तर हा ग्रंथ त्या वेळीं अत्यंत अप्रसिद्ध असावा. कारण शंकराचार्यापूर्वी पन्नास वर्षें लिहिलेल्या शान्तरक्षिताच्या तत्त्वसंग्रहांत या गीतेचा उल्लेख मुळींच सांपडत नाहीं. तेव्हां शान्तरक्षितापर्यंत हा ग्रंथ

अप्रसिद्ध होता असें समजण्यास हरकत नाहीं. प्रथमतः शंकराचार्यांनें टीका लिहून या ग्रंथाला पुढें आणलें.

१७०. जरी या ग्रंथाची माहिती बौद्ध पंडितांना होती असें धरलें, तरी त्याच्यावर कांहीं बोलतां येणें त्यांना शक्य नव्हतें. त्यांचा कर्मयोग आणि लोकसंग्रह जुने झाले होते; आणि त्यांच्या आधारें भगवद्गीताकाराशीं वाद करणें शक्य नव्हतें. समजा, एकाद्या बौद्ध पंडितानें या ग्रंथकाराला विचारलें असतें कीं, "काय हो, भगवंताला रणक्षेत्रांत आणून त्याच्या तोंडून तुम्ही अर्जुनाला आपल्याच कुळाचा उच्छेद करण्यासाठीं उपदेश करतां हें तुम्हाला शोभतें काय?" त्यावर गीताकारानें उत्तर दिलें असतें, "बा पंडिता, हा ग्रंथ जर मी लिहिला नसता, तर आमच्या महाराजानें युद्ध सोडून संन्यास घेतला असता; आणि मग तुमच्या विहारांना मोठमोठालीं इनामें कोठून मिळालीं असतीं? याच्याऐवजीं जर कोणी दुसरा शैव हूण राजा आला असता, तर तुमच्यावर उपाशी मरण्याची पाळी आली असती. तेव्हां हा ग्रंथ लिहिल्याबद्दल तुम्ही माझे आभार माना.

१७१. "आतां तुम्ही म्हणतां कीं, आम्ही तुमच्या लोकसंग्रहाचा विपर्यास केला. पण तुमच्या विहारांना जीं मोठमोठालीं इनामें आहेत, त्यांत काबाडकष्ट करणाऱ्या शूद्रांना तुम्ही समानात्मतेनें वागवण्याला कबूल अहांत काय? त्यांना तुम्ही कधीं दान दिलें आहे काय? त्यांच्यांशीं कधीं गोड बोललां अहांत काय? किंवा तुम्ही त्यांच्या हिताची काळजी घेतली आहे काय? इतकेंच नव्हे, ते जर तुमची सेवा करण्यासाठीं कांकूं करूं लागले, तर तुम्ही अहिंसाधर्मावर अवलंबून न रहातां राजदंडाचा आश्रय घ्याल. तेव्हां आम्ही जो येथें लोकसंग्रह दाखवून दिला आहे, तोच योग्य आहे.

१७२. "हें पहा, 'विद्याविनययुक्त ब्राह्मण, गाय, हत्ती, कुत्रा व चांडाळ या सर्वांच्या ठिकाणीं पंडिताची दृष्टि समान असते. ज्यांच्या मनामध्यें समता उत्पन्न झाली त्यांनी इहलोकींच संसार जिंकला. कारण ब्रह्म निर्दोष व सम आहे; आणि म्हणूनच ते ब्रह्माच्या ठायीं स्थिर झाले.' हा आमचा समानात्मभाव तुमच्या समानात्मतेपेक्षां श्रेष्ठ नाहीं काय ? तुम्हाला समानात्मता आणण्यासाठीं सर्व जगांत एकच जात उत्पन्न करावी लागेल; आणि तें तर अशक्य आहे. पण अशा तऱ्हेनें हत्ती, कुत्रा, चांडाळ या सर्वांमध्यें समतेनें पाहिलें कीं, समानात्मता सिद्ध झाली नाहीं काय ? तुम्ही याच्यापेक्षां अधिक तें काय करूं शकतां ?

१७३. "दुसराहि आम्ही एक समानतेचा अर्थ केला आहे तो पहा. 'हे धनंजया, कर्मफळाची आसक्ति सोडून यशापयशाविषयीं सारखी बुद्धि ठेवून योगयुक्त होत्साता कर्मे कर. अशा समत्वालाच योग म्हणतात. (अ० २ श्लोक ४८).' राजांना तर हें समत्व पाहिजेच आहे. कां कीं, युद्धांत जय होईलच असें कोणी सांगूं शकत नाहीं. पण तुम्हा-आम्हालाहि अशा तऱ्हेचें समत्व हवें आहे. युद्धांत जय मिळवून राजा सिंहासनारूढ झाल्यावर तुम्ही-आम्ही त्याजपाशीं याचनेसाठीं जातों. पण तो सर्वदा कांहीं देतोच असें नाहीं; कधीं तुमच्या विहाराला दान देतो, तर कधीं आमच्या देवळाला देतो. परंतु सिद्धि आणि असिद्धि यांचा विचार न करतां आम्हाला त्याजपाशीं गेलें पाहिजे. मिळालें तरी वाहवा, नाहीं मिळालें तरी वाहवा, अशी बुद्धि धरली पाहिजे. याला आम्ही योग म्हटलें आहे. हा योग तुम्हाला पटतो कीं नाहीं ?"

१७४. तात्पर्य, ब्राह्मण काय कीं श्रमण काय, दोघेहि एकाच पायरीवर उतरले होते. दोघांनाहि राजांकडून इनामें मिळवाव-

याचीं होतीं. त्यांत फरक एवढाच होता कीं, तुझ्या भाऊबंदांना मारून तूं राज्य सम्पादन कर, असें श्रमण सांगूं शकले नसते. पण सर्व भाऊबंदांना मारून एकादा राजपुत्र राजा झाल्याबरोबर त्याला घेरून इनामें मिळवण्यांत त्यांची शर्यतच लागत असे. अर्थात् त्यानें केलेल्या घातपातादि पूर्वकृत्यांना ते आपल्या आचरणानें एक प्रकारची संमति देतच. एवढेंच नव्हे, तर आपल्या मठाला पुष्कळ दानधर्म मिळाला असतां अशा राजाला ते धार्मिकतेच्या शिखरावर चढवीत. यापेक्षां ब्राह्मणांचा उद्योग बरा होता. ते राजाला भगवद्गीतेसारखे ग्रन्थ लिहून युद्धाला प्रवृत्त करीत. जर त्याचा लढाईंत नाश झाला, तर दुसऱ्या राजाचा आश्रय धरीत; पण जर जय झाला, तर त्याच राजाकडून इनामें मिळवीत. निदान युद्धाच्या पूर्वी व पश्चात् ते उपस्थित होत. पण युद्ध संपेपर्यन्त श्रमणांचा पत्ता नसावयाचा; व राजा जेव्हां राज्याभिषिक्त होई तेव्हां मात्र आपल्या मठांना इनामें मिळवण्यासाठीं ते उपस्थित व्हावयाचे !

## श्रमणांची अवनति

१७५. श्रमणांच्या अवनतीचें बीज त्यांनी अंगीकारिलेल्या राजाश्रयांत होतें. राजा म्हटला म्हणजे तो क्वचितच हिंसेशिवाय गादीवर येत असे. अशोकानें आपल्या अनेक भावांना मारल्याच्या कथा बौद्ध ग्रन्थांत सांपडतात. त्या खऱ्या नसाव्या असें विन्सेन्ट स्मिथ इत्यादिक पाश्चात्य विद्वानांचें म्हणणें आहे. तरी पण आपणाला विरोध करणाऱ्या बांधवांचा उच्छेद करूनच अशोक गादीवर आला असला पाहिजे. कलिंग देशाला जिंकीपर्यंत त्यानें लढण्याचें तर सोडलेंच नव्हतें. त्या

लढाईनंतर अशोकाला पश्चात्ताप झाला; व तो बुद्धोपासक बनला. बौद्ध ग्रंथकारांनी त्याची अतोनात स्तुति केली आहे. त्यांच्या मतें जगांत कोणी धर्मराजा झाला असेल, तर तो राजा अशोकच होय; आणि कांहीं अंशीं तें खरेंहि आहे. एवढ्या मोठ्या पदावर चढलेल्या माणसानें अत्यन्त इन्द्रियनिग्रहानें व संयमानें वागणें अशोकाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि राजाला शक्य झालें असेल, असें वाटत नाहीं. परन्तु या अशोकाच्या सद्‌गुणांचा बौद्ध संघाला कितपत फायदा झाला हें सांगतां येत नाहीं. मोठमोठे विहार बनले, बौद्ध भिक्षु चारी दिशांना जाऊन त्यांनी बौद्ध धर्माचा प्रचार केला; हें सगळें झालें खरें, पण त्यामुळें भिक्षूंना राजाश्रयाची चट लागली. किंबहुना राजाश्रयावांचून त्यांचें कांहींच चालेनासें झालें.

१७६. मौर्यांचें राज्य त्यांचा सेनापति पुष्यमित्र यानें हिरावून घेतलें, व ब्राह्मणांच्या यज्ञयागांचें पुनरुज्जीवन केलें. एवढेंच नव्हे, तर त्यानें आसपासच्या बौद्धांना बराच त्रास दिला, भिक्षूंचे कांहीं मठ मोडून टाकले, इत्यादि कथा उत्तरेकडील बौद्ध ग्रंथांमध्यें सांपडतात. अशा वेळीं बौद्ध भिक्षूंनी मगध देश सोडून दूरदूरच्या देशांचा आश्रय धरला असल्यास आश्चर्य नाहीं. त्या प्रसंगीं भिक्षूंनी आत्मनिरीक्षण करावयास हवें होतें. 'अशोकाच्या आश्रयानें आपणाला मोठमोठाले विहार बांधतां आले, पण त्यामुळें परिग्रहवान् बनलों, व बहुतांशीं कष्टी जनतेच्या कल्याणाचा मार्ग आपण सोडून दिला,' असें त्यांस दिसून आलें असतें, आणि ते पुन्हा राजाश्रय मिळवण्याच्या प्रयत्नाला लागले नसते; व त्यायोगें हिंदुस्थानच्या इतिहासाला निराळीच गति मिळाली असती.

१७७. मौर्यांचें राज्य मोडल्यावर पुष्यमित्राला मौर्यांप्रमाणें

साम्राज्य स्थापतां येणें शक्य नव्हतें. वायव्येकडून यवनांच्या आणि शकांच्या स्वाऱ्या त्याला थांबवतां येईनात; व त्यामुळें ह्या परकीय लोकांचें हिंदुस्थानांत एकसारखें पाऊल पुढें पडत गेलें. अशा वेळीं बौद्ध भिक्षूंनी ह्या परकीय लोकांची मर्जी संपादण्याचा सारखा प्रयत्न चालविला, व त्यांत त्यांना बरेंच यश आलें, असें मिलिन्दपञ्ह इत्यादिक ग्रन्थांवरून दिसून येतें.

१७८. ह्या परकीय लोकांना भिक्षूंचे आचार-विचार मानवले. परन्तु आपल्या देवतांना सोडून एका बुद्धाला शरण जाण्याला ते तयार नव्हते. अशोकाएवढीच कनिष्काची महती महायान पंथांत आहे. परन्तु त्यानेंहि आपल्या कुलदेवतांना फांटा दिला नाहीं, हें त्याच्या नाण्यांवरून स्पष्ट दिसून येतें. कांहीं नाण्यांवर त्यानें बुद्धाचेंहि चित्र छापलें, एवढीच काय ती बौद्ध धर्मावर त्याची मेहरबानी. परन्तु अशोकासारखा राजा मिळणें शक्य नसल्यामुळें बौद्ध भिक्षूंनी एवढ्यांतच संतोष मानून घेतला.

१७९. शक राजे मोठे शूर होते; व शौर्याची त्यांना फार चाड असे. त्यांना प्रसन्न करण्यासाठीं बौद्ध भिक्षूंनी बुद्धाच्या पूर्वजन्मींच्या कथा पुढें आणल्या. ह्या कथांत नवरसांपैकीं रौद्र आणि बीभत्स रस मुळींच नाहीं म्हटलें तरी चालेल. बाकी रस मित प्रमाणांत सांपडतात. साहित्य ग्रंथांत दानवीर, दयावीर, धर्मवीर व युद्धवीर असे वीर रसाचे चार भाग आहेत. त्यांत पहिल्या तिहींना ह्या जातककथांत विशेष महत्त्व दिलें आहे, असें दिसून येतें. ह्या कथा केवळ राजे लोकांनाच नव्हे, तर सामान्य लोकांनाहि फार प्रिय झाल्या. पण त्यांमुळें लोकांचीं मनें पौराणिक बनलीं.

१८०. याप्रमाणें पुष्यमित्रानंतर भिक्षूंनी राजाश्रय संपादन

करून पुन्हा आपल्या धर्माचें वर्चस्व स्थापन केलें. राजांना आणि वरिष्ठ लोकांना वळवण्यासाठीं मूळच्या बौद्ध वाङ्मयांत त्यांनी इतके फेरफार केले कीं, त्याला बुद्धाचा उपदेश कितपत म्हणतां येईल हें सांगतां येत नाहीं. जरी अहिंसा, सत्य इत्यादिक मुद्दे त्यांनी सोडले नाहींत, तरी पण मूळच्या साध्या उपदेशाचा त्यांच्या ग्रंथांत फारच थोडा अंश राहिला आहे, असें दिसून येतें. शकांच्या दोनशें तीनशें वर्षांच्या कारकीर्दीत ह्या महायानपंथाचा प्रसार फार झाला; व मूळचा स्थविरवाद-पंथ ( महायानपंथाचे लोक ह्या पंथाला हीनयानपंथ म्हण-तात ) मागें पडत चालला. ह्या पंथाचे लोक सिलोन, ब्रह्मदेश, सयाम व कांबोडिया या दक्षिणेकडील चार देशांत आहेत. उत्तरेकडील तिबेट वगैरे देश महायानपंथाचे आहेत. म्हणून महायानपंथाला उत्तरेकडील बौद्ध पंथ, व स्थविरवादाला किंवा हीनयानपंथाला दक्षिणेकडील बौद्ध पंथ म्हणण्याचाहि प्रघात आहे. अस्तु.

१८१. महायानपंथाच्या प्रसारामुळें ब्राह्मण लोक अग-दींच मागें पडले. सामान्य जनांच्या देवता महायान पंथानें आपल्याशा करून घेतल्या; व यज्ञयागांना तर शकांचा व यव-नांचा आश्रय मिळेना. लहानसहान गृह्यसंस्कारादिक कृत्यें करून निर्वाह चालवितां येणें ब्राह्मणांना शक्य होतें. तरी पण राजाश्रयाइतका तो धंदा किफायतशीर नव्हता. बौद्ध भिक्षूंना महादेवाला तेवढें आपल्या पंथांत घेतां आलें नाहीं. कारण त्याच्या ज्या गोष्टी होत्या त्यांना अहिंसात्मक स्वरूप देतां येणें शक्यच नव्हतें. अर्थात् शक राजांना प्रसन्न करण्यासाठीं, किंवा त्यांच्याकडून राजकीय दक्षिणा मिळविण्यासाठीं महादेवाचे पुजारी होणें हाच काय तो एक मार्ग ब्राह्मणांना खुला होता; व

तो त्यांनी प्रथमतः अढेवेढे घेऊन पतकरला असावा. पण पत-करल्यावर तो किफायतशीर आहे, असें त्यांस दिसून आलें. कारण शक राजांकडूनच नव्हे, तर त्यांच्या मांडलिकांकडूनहि महादेवाच्या पूजेसाठीं ब्राह्मणांना चांगली दक्षिणा मिळूं लागली.

१८२. 'इन्द्र-वरुण-भव-शर्व- रुद्र-मृड-हिमारण्य-यव-यवन-मातुलाचार्याणामानुक्' ४।१।४९, ह्या पाणिनीच्या सूत्रावरून भवानी, शर्वाणी, रुद्राणी व मृडानी ह्या देवींची त्या काळीं पूजा होत असे, हें सिद्ध होतें. ह्या निरनिराळ्या चार देवी होत्या, कीं एकाच देवीचीं हीं निरनिराळीं चार नांवें होतीं, हें सांगतां येत नाहीं. पण पुढें तीं एकाच पार्वतीचीं नांवें बनलीं; व पार्वतीची पूजाहि लोकप्रिय झाली. त्यामुळें गांवो-गांवच्या भिन्न भिन्न देवींचा या एकाच देवींत समावेश करून त्या देवींची पूजा करणेंहि ब्राह्मणांना फायदेशीर वाटलें. अशा रीतीनें ब्राह्मणांनी यज्ञयागांचा नाद सोडून व 'आलिया भोगासी सादर' होऊन आपली उपजीविका चालवली. आणि त्यामुळें महा-देव व पार्वती या दैवतांना वरिष्ठ जातींत फारच महत्त्व आलें.

१८३. ह्याच अवधींत विहाराच्या नियमावलींत असंतुष्ट झालेले श्रमण व जटिल यांच्या मिश्रणानें लिंगपूजेला प्राधान्य देणारा पाशुपतांचा पंथ निघाला.[१] प्रथमतः ब्राह्मण लिंगपूजा करीत नसावे. पण जेव्हां पाशुपतांच्या प्रभावानें राजेहि लिंग आपल्या खांद्यांवर घेऊन चालूं लागले, तेव्हां ब्राह्मणांनी लिंग-पूजाहि सुरू केली. त्यामुळें ब्राह्मणांना राजाश्रयच नव्हे, तर पाशुपतांचाहि आश्रय मिळाला.

१८४. शकांचें राज्य मोडकळीला आल्यावर पहिल्या चंद्र-

---

१ वि० ३।८९–९१.

गुप्त राजानें गुप्तसाम्राज्याचा पाया घातला. त्यावर समुद्रगुप्तानें साम्राज्याची मोठी इमारत उठवली. हे गुप्त राजे वासुदेवाचे भक्त होते. वासुदेव त्यांचा कुलदेव होता हें पूर्वी सांगण्यांत आलेंच आहे.[१] तथापि महादेवाच्या किंवा लिंगाच्या पूजेला त्यांनी मुळींच विरोध केला नाहीं. त्यामुळें ती पूजा तशीच चालू राहिली; आणि तिच्या मागोमाग वासुदेवाचीहि पूजा सुरू झाली. कोणत्या देवाची पूजा करावी व कोणत्या देवाची करूं नये, हा विधिनिषेध ब्राह्मणांनी निखालस सोडून दिला. कोणताहि कां देव होईना, त्याच्या पूजेनें जर ब्राह्मणांना दक्षिणा मिळत असली, तर त्या दैवताचें स्तोम माजवण्यास ब्राह्मण जणूं काय एका पायावर उभे असत. आणि ह्या गुप्त कालांत त्यांनी अनेक दैवतांचो व तीर्थांचो महती वाढवण्यासाठीं वाटेल तेवढीं पुराणें रचलीं.

१८५. अदैवं दैवतं कुर्युर्दैवतं चाप्यदैवतम् ।
यमिच्छेयुः स राजास्याद्यो नेष्टः स पराभवेत् ॥[२]

( ब्राह्मण अदैवाला दैवत आणि दैवताला अदैवत बनवतील; पाहिजे त्याला राजा करतील; जो नको असेल त्याचा पराभव होईल. ) कांहीं वीस वर्षांमागें जेव्हां हा श्लोक श्री. चि. वि. वैद्य यांच्या संक्षिप्तमहाभारतांत माझ्या वाचनांत आला, तेव्हां मला वाटलें कीं, बौद्ध आणि जैन श्रमणांच्या रागानें ब्राह्मणांनी लिंगाला देव बनवलें. पण आतां बऱ्याच विचारा-

---

१ वि० ३।१२२.

२ संक्षिप्तमहाभारत, अनुशासन प० अ० २।६६; कुंभकोण अनु० प० अ० ६८।१७. ह्या पर्वांत अ० ६८–७१ ब्राह्मणमहात्म्यावर आहेत, ते मुळांत पहावे.

अंतीं दिसून येतें कीं, शकांच्या स्वाऱ्यांनंतर काय किंवा पूर्वी काय ब्राह्मणांच्या अंगीं हें सामर्थ्य मुळींच नव्हतें.

१८६. इंद्रासारख्याला ब्राह्मणांनी केवळ निरुपायानें देव केलें. शक राजांनी आपलीच उपासना करण्यास लावलें असतें, तरी ब्राह्मणांनी त्यांची पूजा करण्यास कमी केलें नसतें. पण शक महादेवाचे भक्त असल्याकारणानें त्यांना आत्मपूजेपेक्षां आपल्या कुलदेवतेची पूजा विशेष महत्त्वाची वाटली, व ती त्यांना पाहिजे होती त्याप्रमाणें ब्राह्मणांनी उचलली. ती पचनीं पडते न पडते तोंच गुप्तांनी वासुदेवाला पुढें आणलें, व ब्राह्मणांनी त्याचीहि पूजा सुरू केली. एवढेंच नव्हे, तर त्या काळीं जेवढीं देवदैवतें होतीं त्या सर्वांवर पुराणें रचून आपला योगक्षेम नीट चालावा हाच काय तो धोपट मार्ग त्यांनी स्वीकारला. यज्ञ करून दक्षिणा मिळाली तरी ठीक, आणि कोणत्याहि दैवताची पूजा करून मिळाली तरी ठीक, अशी त्यांची कायमची समजूत झाली असावी.

१८७. लोकमान्य टिळकांनी एके वेळीं,

प्रामाण्यबुद्धिर्वेदेषु साधनानामनेकता ।
उपास्यानामनियम एतद्धर्मस्य लक्षणम् ॥

अशी वैदिक धर्माची व्याख्या केली होती. त्याच्याहिपेक्षां

योगक्षेमो ब्राह्मणानां जायते येन केनचित् ।
तदेव वैदिकं कर्म स धर्मो वैदिकः स्मृतः ॥

अशी व्याख्या केली असती, तर ती विशेष शोभली असती. आणि वरच्या महाभारताच्या श्लोकाबद्दल

अदैवं दैवतं कुर्युर्लभेरन्यदि दक्षिणाम् ।
राज्ञां प्रियाण्यासृजेयुः पुराणान्यपि चार्थिनः ॥

असा श्लोक असता, तर तो इतिहासानुरूप म्हणतां आला असता.

१८८. ब्राह्मणांना ह्याबद्दल दोष देतां येत नाहीं. कां कीं, वेदकालापासून राजानुवर्तित्व हें त्यांचें शीलच बनलें होतें. 'राजा कालस्य कारणम्', 'ना विष्णुः पृथिवीपतिः' इत्यादि म्हणी प्रसिद्धच आहेत. पण श्रमणांची गोष्ट अशी नव्हती. कष्टी जनतेसाठीं त्यांचे पंथ निघाले. लोकांमध्यें समता घडवून आणावी, हें त्यांचें मुख्य ध्येय. तेव्हां अशा प्रसंगीं पुढें येऊन त्यांनी या प्रकाराला विरोध करावयास पाहिजे होता. ब्राह्मणं वाटेल त्या देवतेची पूजा करूं लागले, राजे लोक खांद्यावर शिवलिंग घेऊन फिरूं लागले, श्रमणांनी पाशुपतासारखा बीभत्स पंथ काढला, जातिभेदाला फांटे फुटूं लागले, अस्पृश्यांचा छळ होऊं लागला, तरी पण श्रमण स्वस्थ बसलेले ! अशा परिस्थितींत आजकालच्या सामान्य माणसालाहि उद्वेग उत्पन्न झाला असता; पण त्या काळच्या श्रमणांना कांहींच विषाद वाटेना. त्यांच्या विहारांचीं इनामें चालू होतींच, राजे लोक त्यांना मानीत होते, आणि मध्यम वर्गांतील जनतेकडून यथास्थित भिक्षा मिळून चांगलें आदरातिथ्य होत होतेंच; मग शूद्र आणि चांडाल जर पिळून निघत असले, व वाटेल त्या देवतांची पूजा होत असली, तरी ह्या सुखवस्तु श्रमणांना त्याची काय परवा ?

## फाहियन्चा काळ

१८९. फाहियन् हा चिनी प्रवाशी दुसऱ्या चंद्रगुप्ताच्या वेळीं हिंदुस्थानांत आला. मथुरेच्या आसपासच्या प्रदेशाचें वर्णन करीत असतां तो म्हणतो, "ह्या प्रदेशाला मथुरा म्हणतात. पुन्हा आम्ही यमुनेच्या कांठा-कांठानें चाललों. ह्या नदीच्या दोन्ही बाजूला वीस संघाराम आहेत, व त्यांत तीनेक हजार भिक्षु

रहातात. बुद्धधर्माचा विकास व उत्कर्ष होत आहे. ...ह्या देशां-तील राजे बुद्धधर्मावर दृढ विश्वास ठेवणारे आहेत. ते भिक्षूंना दान देत असतांना आपलया पगड्या काढून बाजूला ठेवतात. राजाच्या कुटुंबांतील मंडळी व सर्व मुख्य प्रधान स्वतःच्या हातांनी भिक्षूंना दान देतात. भिक्षूंचें जेवण संपल्यावर एका बाजूला सतरंजी पसरून ते तिच्यावर बसतात. भिक्षूंसमोर ते कधींहि उच्चासनावर बसूं शकत नाहींत. बुद्धाच्या वेळेपासून आजपर्यंत हे दानविधीचे नियम चालू आहेत...

१९०. "ह्या सर्व देशांत चांडाळांशिवाय दुसरे लोक प्राणिहिंसा करीत नाहींत व दारू पीत नाहींत; कांदा आणि लसूण खात नाहींत. चांडाळांना पापी म्हणतात, व ते गांवां-बाहेर रहातात. जेव्हां ते शहरांत किंवा बाजारांत येतात, तेव्हां लोकांना सूचना देण्यासाठीं लाकडाचा ठोकळा लाकडी दांड्यानें वाजवजात. त्यामुळें इतर लोक त्यांना ओळखतात, व त्यांच्या स्पर्शापासून दूर रहातात. या देशांतील लोक डुकरें व कोंबडीं पाळीत नाहींत; आणि गुरें विकण्याचा धंदा करीत नाहींत. ते बाजारांत कसाईखाने व दारूचे गुत्ते ठेवीत नाहींत. विक्री-खरेदी-मध्यें ते कवड्या वापरतात. चांडाळ तेवढे शिकार करतात व मांस विकतात.

१९१. "तहत बुद्धाच्या परिनिर्वाणापासून या देशांत राजे लोकांनी व श्रीमंत लोकांनी भिक्षूंसाठीं विहार बांधून दिले आहेत; आणि माणसें व गाईबैल यांच्यासह जमिनी, घरें व बागबगीचे इनाम देऊन त्यांची तरतूद केली आहे. कोरीव लेख परंपरेनें चालू ठेवण्यांत आले आहेत. आजपर्यंत त्या लेखांचा भंग झाला नाहीं. कां कीं, कोणीहि ते लेख माघारे घेण्यास समर्थ नाहीं. जे भिक्षु विहारांत रहातात, त्यांच्यासाठीं

बिछाने, सतरंज्या, अन्न, पान व वस्त्र हे सर्व पदार्थ काटकसर न करतां देण्यांत येतात. सर्व ठिकाणीं हा प्रकार चालू आहे. भिक्षु आपल्या शीलाचे नियम पाळण्यांत, स्वाध्याय करण्यांत, किंवा ध्यानसमाधींत दक्ष असतात."[१]

१९२. याप्रमाणें भिक्षूंचा योगक्षेम उत्तम रीतीनें चालला होता. विहारांना शेतें, घरें, बगीचे, माणसें, गाईबैल इत्यादिक इनामाच्या रूपानें मिळत असतां तक्रार करण्यास जागा कोणती होती? पण ह्याच वेळीं इतर संप्रदायांचेंहि प्रस्थ कसें माजत चाललें होतें तें पहा. फाहियन् म्हणतो, "मध्य हिंदुस्थानांत[२] शाण्णव मिथ्या दृष्टि संप्रदाय आहेत. ते आत्म्याची नित्यता मानतात. प्रत्येक संप्रदायाच्या शिष्यपरंपरा आहेत. ते भिक्षा मागतात; पण भिक्षापात्र ठेवीत नाहींत. वस्ती नसलेल्या ठिकाणीं ते देखील पांथस्थांच्या सोईसाठीं धर्मशाळा बांधतात; व त्यांमधून पांथस्थांच्या विश्रांतीची, निजण्याची, खाण्यापिण्याची वगैरे व्यवस्था करण्यांत येते. प्रवासांत बौद्ध लोकांचीहि या धर्मशाळांतून सोय होते; त्यांच्या आवडीप्रमाणें रहाण्याची निराळी व्यवस्था करण्यांत येते."[३]

१९३. हे शाण्णव संप्रदाय कोणते, तें फाहियन्नें कोठें सांगितलें नाहीं. त्यालाहि त्यांची माहिती क्वचितच असेल, व केवळ लोकांच्या सांगण्यावरून ही संख्या त्यानें दिली असेल. तथापि इतिहासाच्या इतर साधनांवरून असें दिसून येतें कीं,

---

१ Buddhist Records, Introduction, pp. xxxvii–xxxviii.

२ सरासरी विंध्य, हिमालय, बंगाल व पंजाब यांच्या मधला प्रदेश.

३ Buddhist Records, p. xlviii.

त्या काळीं पाशुपतांचा पंथ सारखा बळावत चालला होता. ते निरनिराळ्या ठिकाणीं धर्मशाळा वगैरे बांधून लोकांची व्यवस्था लावीत होते असें दिसतें. जैन श्रमण अस्तित्वांत होतेच. परंतु ते धर्मशाळा बांधून लोकांना वळवीत असण्याचा संभव नाहीं. कां कीं, तें त्यांच्या नियमाविरुद्ध आहे. बौद्धांच्या विहारांत बौद्ध भिक्षूंची तेवढी व्यवस्था होत असे. परंतु पाशुपतांसारखे दुसऱ्या संप्रदायांचे बैरागी लोक सामान्य लोकांचीहि व्यवस्था लावीत होते असें दिसतें; व त्यामुळेंच ते बौद्ध भिक्षूंपेक्षांहि सामान्य जनतेला प्रिय झाले असावेत.

## ब्राह्मणांना पुराणें फायदेशीर झालीं

१९४. ह्या अवधींत ब्राह्मणांनी पुराणांवर फार जोर दिला असें दिसून येतें. बौद्धांच्या बोधिसत्त्वाच्या कथा म्हटल्या म्हणजे फारच सौम्य असावयाच्या. कां कीं, श्रमण लोक अहिंसेचें अतिक्रमण करूं शकत नसत. परंतु ब्राह्मणांना हा निर्बंध मुळींच नव्हता. यज्ञयाग बंद पडल्यामुळें त्यांची व्यावहारिक पशुहिंसाहि बंद पडली; व कदाचित् त्याच कारणानें ह्या पुराणांच्या रूपानें ब्राह्मणांच्या हिंसक वृत्तीला अनेक फांटे फुटले; आणि त्यांत बीभत्स व रौद्र ह्या रसांचीहि रेलचेल होऊन गेली.

१९५. काव्यरस म्हटला म्हणजे तो थोड्या बहुत प्रमाणानें मादक असावयाचाच. तो लोकांना पाजण्यास बौद्ध श्रमणांनी सुरुवात केली.. तरी अहिंसेचें ध्येय त्यांच्या समोर असल्याकारणानें काव्यरस लोकांना हानिकारक होईल अशा बेतानें उत्पन्न करणें त्यांना शक्य नव्हतें. ब्राह्मणांना लोकांची परवा मुळींच नव्हती. अर्थात् त्यांनी शृंगारादि काव्यरस इतके

तीव्र केले कीं, लोकांना त्यांचें व्यसनच लागून गेलें. गुप्तांच्या राज्यांत मद्यपानाला बंदी असल्याकारणानें हें पौराणिक नव-रसांचें मानसिक मद्य लोकांना अतिशय आवडूं लागलें असावें. आजकालच्या सिनेमांवर जशी सेन्सरची देखरेख असते, तशी ती गुप्त राजांकडून पुराणांवर ठेवण्यांत आली असती, तर एकहि पुराण दोषारोपांतून मुक्त होऊं शकलें नसतें. पण हें कांहीं तरी धार्मिक आहे अशा समजुतीनें त्यांनी ब्राह्मणांच्या ह्या कृतींत हात घातला नसावा; आणि कडक दारू पिणाऱ्या लोकांना जशी आणखीहि कडक दारू हवी असते, त्याप्रमाणें हिंदी जनतेला ह्या पुराणांची अधिकाधिक चट लागली असावी.

१९६. ब्राह्मणांना तर ही एक उत्पन्नाची मोठी किफायतशीर अशी खाणच सांपडली म्हणाना. इकडे तिकडे पुराणें सांगून व लोकरंजन करून दक्षिणा तर मिळत असेच; आणि त्यांतल्यात्यांत पुराणांत जेथें तेथें ब्राह्मणांचें महत्त्व घुसडून देण्यासहि चांगलीच संधि मिळत असे. राजे लोकांकडून मिळवलेल्या इनामांचे रक्षण करण्यासाठीं व्यासाच्या नांवाचा व पुराणाच्या आधाराचा ते कसा उपयोग करीत, ह्याचीं बरींच उदाहरणें त्यांनी मिळवलेल्या ताम्रपटांत सांपडतात. नमुन्या दाखल त्यापैकीं येथें एक देतों.

१९७. उक्तं च महाभारते भगवता व्यासेन—

स्वदत्तां परदत्तां वा यत्नाद्रक्ष युधिष्ठिर ।
महीं महीमतां श्रेष्ठ दानाच्छ्रेयोनुपालनम् ॥
बहुभिर्वसुधा भुक्ता राजभिः सगरादिभिः ।
यस्य यस्य यदा भूमिस्तस्य तस्य तदा फलम् ॥
प्रायेण हि नरेन्द्राणां विद्यते नाशुभागतिः ।
पूयन्ते ते तु सततं प्रयच्छन्तो वसुन्धराम् ॥

षष्टिवर्षसहस्राणि स्वर्गे मोदति भूमिदः।
आच्छेत्ताऽनुमन्ता च तान्येव नरके वसेत्॥
आस्फोटलन्ति पितरः प्रवल्गन्ति पितामहाः।
भूमिदोऽस्मत्कुले जातः स नस्त्राता भविष्यति॥
सर्वसस्यसमृद्धां तु यो हरेत वसुन्धराम्।
स्वविष्ठायां कृमिर्भूत्वा पितृभिस्सह मज्जति॥[1]

(आणि महाभारतांत भगवान् व्यासानें म्हटलें आहे,—हे पृथ्वीपालांमध्यें श्रेष्ठ युधिष्ठिर, स्वतः दिलेली असो, किंवा परक्यानें दिलेली असो, अशा जमिनीचें तूं प्रयत्नानें रक्षण कर. भूमिदानापेक्षां दान दिलेल्या भूमीचें अनुपालन करणें श्रेयस्कर होय. ही भूमि सगरादिक पुष्कळ राजांनी उपभोगली. पण ज्या ज्या वेळीं ज्या ज्या राजाची भूमि असते त्या त्या वेळीं त्या त्या राजाला त्या भूमिदानाचें फळ मिळतें. कारण बहुधा राजांना अशुभगति प्राप्त होत नाहीं; भूमिदान केल्यानें ते सदोदित शुद्ध होत जातात. भूमिदान करणारा साठ हजार वर्षें स्वर्गलोकीं आनन्द करतो. ती हिरावून घेणारा आणि हिरावून घेण्यास अनुमति देणारा तितकींच वर्षें नरकांत पडतो. दान देणाऱ्याचे पितर टाळ्या वाजवतात व पितामह बढाया मारतात कीं, आमच्या कुळांत भूमिदान देणारा उत्पन्न झाला. तो आम्हाला तारील. सर्व धान्यांनी समृद्ध अशी भूमि जो हरण करील, तो आपल्या पितरांसह आपल्याच विष्ठेंत किडा होऊन बुडून जाईल.)

१९८. हा ताम्रपट उच्छकल्पाच्या महाराज जयनाथाचा (इ० स० ४९३–९४ सालचा) आहे. त्याच्या पूर्वीच्या महा-

---

१. Corpus Inscriptionum Indicarum, iii, 119.

राजा हस्ती वगैरेच्या लेखांत व त्यानंतर महाराजा जयनाथ याचा मुलगा महाराजा सर्वनाथ यानें दिलेल्या ताम्रपटांतहि ह्यांपैकीं बरेच श्लोक आहेत. पण त्यांच्या क्रमांत व कांहीं शब्दांत थोडासा फेरफार आढळतो. परंतु नमुन्यासाठीं वरील उतारा पुरे आहे. त्यावरून ब्राह्मण लोक आपल्या इनामांना कशा रीतीनें संरक्षण घालून घेत असत, याची बरोबर कल्पना करतां येते; व सर स्याम्युअल होअर यांच्या सेफ-गार्डांना हांसण्याचें कांहीं कारण रहात नाहीं. या सेफ-गार्डांना निदान ब्रिटिश सेनेचा पाठिंबा आहे. परंतु ब्राह्मणांच्या सेफ-गार्डांना पाठिंबा म्हटला म्हणजे व्यासाचा, स्वर्गाचा व नरकाचा !

# हर्षकाल

१९९. फाहियन्च्या नंतर म्हणजे गुप्तांच्या माध्यान्ह-कालानंतर पुराणांचा आणि पाशुपतादिक संप्रदायांचा कस-कसा विकास होत गेला, हें सध्या उपलब्ध असलेल्या सामग्री-वरून सांगतां येणें बरेंच कठिण आहे. सगळ्या पुराणांचा नीट अभ्यास केला, तर त्यांतून बरीच माहिती गोळा करतां येईल. परंतु त्या कामीं जी सवड पाहिजे आहे ती आमच्यापाशीं नाहीं. तेव्हां फाहियन्पासून हर्षवर्धनापर्यंतच्या काळाची ही माहिती मिळवण्याचें काम कोणा तरी होतकरू इतिहासकारावर सोंपवून आम्ही आतां हर्षकाळच्या विचारास लागतों.

२००. ह्युएन् त्संग सातव्या शतकाच्या प्रथम पादांत हिंदु-स्थानांत आला. त्या वेळीं सर्व देश बौद्धांच्या विहारांनी गज-बजलेला होता. तरी पण काश्मिरांतील लोकांनी बौद्ध विहारां-विरुद्ध बंडें केल्याचें वर्तमान त्याच्या ऐकण्यांत आलें होतेंच.

त्याशिवाय शशांक राजाच्या छळाची कथा त्यानें दिली आहे. बंगालचा राजा शशांक यानें बुद्धगयेच्या विहारांचा विध्वंस केला, व बोधिवृक्ष समूळ उपटून जाळून टाकला. त्यामुळें मगध देशांतील बौद्ध संघावर मोठेंच संकट गुदरलें. हा राजा गुप्त वंशांतील असावा असें विन्सेन्ट स्मिथ यांनी अनुमान केलें आहे. परंतु मञ्जुश्रीमूलकल्पावरून ( श्लोक ७३० ) तो ब्राह्मण होता असें दिसतें; व तेंच बरोबर असावें. हर्षवर्धनाचा वडील भाऊ राज्यवर्धन माळव्यावर स्वारीस गेला असतां शशांकानें कट करून त्याचा खून करविला. ह्यावरून असें दिसून येतें कीं, मालव देशाच्या राजाचा व शशांकाचा कांहीं तरी गुप्त तह झाला होता; व त्यामुळें शशांकानें राज्यवर्धनाचा खून करविला.

२०१. राज्यवर्धनानंतर श्रीहर्ष गादीवर आला, व त्यानें सहा सात वर्षांत चारी बाजूंचीं बंडें मोडून टाकून आपल्या राज्याचा पाया मजबूत केला. बौद्ध संघाविषयीं श्रीहर्षाचा पक्षपात प्रसिद्धच आहे. तो दर पांच वर्षांनी प्रयागास एक मोठा मोक्ष नांवाचा दरबार भरवीत असे, व आपल्या खजिन्यांतील सर्वस्व दान करून स्वतः भिक्षूचीं वस्त्रें धारण करी. ह्याशिवाय तो मधून मधून मोठमोठाले दरबार भरवून शीलवान् व विद्वान् श्रमण-ब्राह्मणांचा सत्कार करीत असे.

२०२. एकदां श्रीहर्षानें आपल्या राजधानीजवळ एका संघारामांत असा एक मोठा दरबार भरवला. त्या दरबाराला आसामचा कुमार राजा व शीलादित्याच्या राज्यांतील सर्व मांडलिक राजे हजर होते. ह्या उत्सवासाठीं एक शंभर फूट उंचीचा भव्य मनोरा बांधण्यांत आला होता; आणि त्याच्यांत राजाच्या उंचीची एक बुद्धाची स्वर्णमूर्ति ठेवण्यांत आली होती. ह्या प्रसंगीं एकवीस दिवसपर्यंत श्रमण-ब्राह्मणांना अन्नवस्त्रादिकांचा दानधर्म

करण्यांत आला. पण शेवटल्या दिवशीं एकाएकीं त्या भव्य मनोऱ्याला आग लागली. तेव्हां शीलादित्याला अतिशय वाईट वाटलें; आणि तो एकदम आपल्या निवासस्थानांतून संघारामाच्या फाटकाकडे धांवत गेला. आश्चर्याची गोष्ट ही कीं, ती आग न फैलावतां तेथेंच विझली. त्यानंतर राजा सगळ्या मांडलिकांसह आजूबाजूचा देखावा पहाण्यासाठीं जवळच्या स्तूपावर चढला. तेथून खालीं येतांना एका पाखंड्यानें सुरा घेऊन त्याच्यावर एकाएकीं हल्ला केला. शीलादित्यानें खालीं वांकून आपला बचाव केला, आणि त्या पाखंड्याला पकडून खालीं आणलें.

२०३. तेथें सर्व मांडलिक राजांनी त्या पाखंड्याला एकदम ठार मारावें अशी सल्ला दिली. पण शीलादित्यानें त्याला ठार न मारतां आपल्यावर हल्ला करण्याचें कारण काय तें विचारलें. त्याच्या जबानीवरून दिसून आलें कीं, त्या कटांत पुष्कळ पाखंडी सामील होते, व तो मनुष्य केवळ त्यांच्या हातांतलें बाहुलें होतें. त्यानंतर राजानें त्या सर्व पाखंड्यांना आणि त्यांच्या भक्तांना आणून चौकशी केली. तिजवरून असें दिसून आलें कीं, या कटांत पांचशें विद्वान् ब्राह्मण सामील होते. राजा बौद्ध श्रमणांना इतका मान देतो, हें त्यांना आवडलें नाहीं. बाणाला जळके काकडे लावून त्यांनी ते मनोऱ्यावर फेकले, व मनोऱ्याला आग लावली. ह्या गडबडींत लोक धांवपळ करतील, व ती संधि साधून शीलादित्याचा खून करावा, असा त्यांचा बेत होता. पण मनोऱ्याची आग विझल्यामुळें गडबड झाली नाहीं. मग त्यांनी ह्या पाखंड्याला राजाचा खून करण्यास पुढें केलें. या रीतीनें हा कट उघडकीला आल्यावर मांडलिक राजांनी मागणी केली कीं, सर्व पाखंड्यांचा एकदम उच्छेद करावा. श्रीहर्षाला ही मागणी पसंत पडली नाहीं. कटाच्या

पुढाऱ्यांना त्यानें दंड केला व इतरांना हद्दपार केलें. त्यांत पांचशें ब्राह्मण होते.[१]

२०४. शशांक राजा कट करून राज्यवर्धनाचा खून करवतो, व बुद्ध गयेचे विहार मोडून भिक्षूंचा छळ करतो. श्रीहर्ष त्याच्यावर हल्ला करून त्याची शक्ति संपुष्टांत आणतो. पण त्यामुळें दुसरा कट उपस्थित होऊन श्रीहर्षाचा खून करण्याचा प्रयत्न केला जातो; आणि त्या खुनाच्या मागें कोण, तर पुष्कळसे पाखंडी व ब्राह्मण. ह्या घडामोडींवरून शशांकाच्या राजकारणामागें ब्राह्मणांचें आणि पाशुपतांचें कारस्थान होतें, असें समजणें गैरवाजवी होणार नाहीं. शशांकापूर्वीचे गुप्त राजे सर्वांना समानतेनें वागवणारे होते. त्यामुळें त्यांच्या कारकीर्दीत बौद्धांचा छळ झाला नाहीं. त्यांचें साम्राज्य मोडकळीला आल्यावरोवर पाशुपतांनी व श्रमणद्वेष्ट्या ब्राह्मणांनी हीं कारस्थानें चालविलीं.

२०५. हा संकटकाळ बौद्ध श्रमणांना मननीय व्हावयास पाहिजे होता. सामान्य जनतेंत मिळून मिसळून वागून गंजल्या गांजल्या लोकांना हितोपदेश करण्याचा बुद्धानें घालून दिलेला कित्ता पुन्हा गिरवण्याची ही संधि होती. पण बौद्ध श्रमणांना त्या कित्यांतील अक्षरओळख देखील राहिली नव्हती. विहारांत बसून वरिष्ठ वर्गाला चकवणारे न्यायादिक उत्तमोत्तम ग्रन्थ निर्माण करणें, हा त्यांचा धंदा होता. त्यामुळें वरिष्ठ वर्गाकडून त्यांना इनामें मिळत असत, व त्यांच्या संघारामांचा योगक्षेम सुखरूपपणें चाले; मग सामान्य जनतेसाठीं खटपट करण्याचें कारण काय उरलें ?

---

१ Buddhist Records, i, pp. 218–221.

२०६. विनय पिटकांतील चुल्लवग्गांत दोघां ब्राह्मण बंधूंची गोष्ट आहे ती अशी—“यमेळु व तेकुल[1] ह्या नांवाचे ब्राह्मण जातीचे विद्वान् भाऊ भिक्षु झाले होते. ते एकदां भगवंताला वंदन करून म्हणाले, ‘सध्या निरनिराळे भिक्षु आपापल्या भाषेंतून बुद्धोपदेश लोकांना सांगतात. तेव्हां आम्हाला तो वैदिक भाषेंत तयार करण्यास परवानगी द्या.’ त्याबद्दल भगवन्तानें त्यांना दोष दिला; व तो भिक्षूंना म्हणाला, ‘बुद्धोपदेशाचें वैदिक भाषेंत भाषान्तर करूं नये; पण आपापल्या भाषेंतून बुद्धोपदेश शिकण्यास मी परवानगी देतों.” ही कथा बुद्धाच्या वेळची असणें शक्य नाहीं. ती बुद्धाच्या परिनिर्वाणानन्तर तीन चार शतकांनी, किंबहुना महायान पंथाच्या प्रसाराच्या आरंभीं रचून चुल्लवग्गांत घालण्यांत आली असावी. तरी पण त्या काळच्या भिक्षूंना आपल्या कर्तव्याची थोडी बहुत तरी जाणीव राहिली होती असें म्हणावें लागतें. बुद्धाचा उपदेश वैदिक भाषेंत न घालतां चालू भाषेंत असावा, हें या गोष्टीचें सार आहे.

२०७. परन्तु महायान ग्रंथकारांना चालू भाषेविषयीं पूर्ण तिटकारा असल्याचें दिसून येतें. उघडच आहे कीं, त्यांना लोककल्याणापेक्षां आपल्या संघारामांची विशेष काळजी होती; व संघारामांचें सर्व सुखस्वास्थ्य अधिकारी वरिष्ठ वर्गावर अवलंबून होतें. अर्थात् त्या वर्गाला आवडणाऱ्या उच्च भाषेंतून ग्रंथरचना करणें हें त्यांचें कर्तव्य ठरलें. आजकाल ज्याला राजाश्रय पाहिजे असेल, तो इंग्लिशभाषाभिज्ञ गृहस्थ देशी भाषेंत ग्रंथरचना करील काय ?

---

१ ‘यमेळु-तेकुला’ हा ओल्डेनबर्गचा (H. Oldenberg's) पाठ; परन्तु सयामसंस्करणांत ‘मेट्ट-कोकुट्टा’ असा घेतला आहे.

२०८. श्रीहर्षाच्या पूर्वी म्हणजे गुप्त राजांच्या काळीं व श्रीहर्षानंतर आठव्या शतकाच्या समाप्तीपर्यंत बौद्ध श्रमणांनी पुष्कळ वाङ्मय निर्माण केलें. वसुबंधूचा अभिधर्मकोष, दिङ्नागाचा प्रमाणसमुच्चय, शान्तिदेवाचा बोधिचर्यावतार, शान्तरक्षिताचा तत्त्वसंग्रह अशा प्रकारचे उत्तमोत्तम बौद्ध संस्कृत ग्रंथ या कालांत निर्माण झाले. या काळचें पुष्कळसें बौद्ध वाङ्मय ह्या देशांतून नष्ट झालें. पण त्याचीं भाषांतरें तिबेटी आणि चिनी भाषेत उपलब्ध आहेत. आणि कधींना कधीं तिबेट व चीन देशांतील मोठमोठाल्या विहारांतून मूळ संस्कृत ग्रंथहि सांपडतील, अशी आशा बाळगण्यास जागा आहे. त्यांचा इतिहासाच्या कामीं फार उपयोग होईल. पण त्यामुळें भिक्षूंनी सामान्य जनतेच्या हिताचा मार्ग सोडून वरिष्ठ वर्गाची मर्जी संपादण्याचा मार्ग स्वीकारला, ह्या विधानाला बाध येईल असें वाटत नाहीं.

२०९. शशांकानें चालविलेल्या हल्ल्यानें मगध देशांतूनच नव्हे तर हिंदुस्थानांतील पुष्कळशा प्रांतांतून बौद्ध धर्म नष्टप्राय होण्याचीच पाळी आली होती. परंतु सुदैवानें श्रीहर्ष राज्यावर आला, आणि त्यानें बौद्ध धर्माची मालवणारी ही जोत आणखी कांहीं काळ पेटत ठेवली. त्याच्या मरणानंतर नालंदा व इतर ठिकाणच्या संघारामांची स्थिति कशी पालटत गेली हें समजण्याला कांहीं मार्ग नाहीं. पण आठव्या शतकांत हिंदुस्थानांत आलेल्या इत्सिंग या चिनी यात्रेकरूच्या प्रवासवृत्तावरून असें दिसून येतें कीं, ह्या ज्योतीचा प्रकाश हळू हळू कमी पडत चालला होता व ती मालवण्याच्या पंथाला लागली होती.

# शैवांचा जुलूम

२१०. इ० स० सातव्या शतकाच्या आरंभीं शशांकानें उत्तरेकडील बौद्धांचा जसा छळ आरंभला, तसाच दक्षिणेकडील जैनांचा कून, नेडुमारन् किंवा सुन्दर पाण्ड्य यानें याच शतकाच्या उत्तरार्धांत छळ सुरू केला. हा राजा गादीवर आला तेव्हां जैनधर्मी होता. परंतु त्याच्या बायकोचा गुरु तिरुज्ञानसंमंद यानें त्याला शैव धर्माची दीक्षा दिली. तेव्हांपासून तो आपल्या पूर्वीच्या धर्मगुरूंवर—जैन साधूंवर—उलटला. त्यानें त्यांचा अनेक रीतीनें छळ मांडला. आठ हजारांपेक्षां जास्त जैन साधूंना त्यानें हाल हाल करून ठार केलें. त्यानें केलेल्या क्रूर कृत्यांचें प्रदर्शन अर्काटमधील तिरुवत्तूर मंदिराच्या भिंतीवरील कोरीव चित्रांत करण्यांत आलें आहे. त्याच्या अघोरी कृत्यांमुळें दक्षिणेंत जैन धर्माला मोठा धक्का बसला.[१]

२११. इ० स० सोळाव्या शतकांत सिंहलद्विपाचा राजा राजसिंह आपल्या बापाचा वध करून गादीवर आला. त्यानें बौद्ध संघाला निमंत्रण देऊन पितृवधाबद्दल प्रायश्चित्त विचारलें. पण भिक्षुसंघानें प्रायश्चित्त देणें आपल्या हातचें नाहीं असा निकाल दिला. तेव्हां शैव धर्माचा अंगीकार करून त्यानें भिक्षुसंघाचा अत्यंत भयंकर छळ आरंभला. चार पांच वर्षांच्या आंत सर्व सिंहलद्वीपांत एकहि भिक्षु राहिला नाहीं. मोठमोठालीं बौद्ध पुस्तकालयें त्यानें आपल्या हातानें जाळलीं. हें काम तो एकसारखें तीन महिनेपर्यंत करीत होता असें म्हणतात. सुदैवानें त्याची कारकीर्द थोडक्यांत आटपली. जांभळें खावयास गेला असतां पायाला विषारी कांटा लागून तो मरण

---

१ Early History of India, pp. 474-75.

पावला.[1] पण त्याच्या ह्या अल्पावधीच्या कारकीर्दींत सिंहलद्वीपांतील बौद्धधर्म नष्टप्राय झाला.

२१२. परंतु सिंहलद्वीपांत शैवांचें ठाणें कायमचें रहाणें शक्य नव्हतें. एकतर हजारों वर्षांच्या सवयीनें बौद्ध धर्म लोकांच्या हाडींमासीं खिळलेला, व दुसरें हें कीं, शैव संन्यासी तामील देशांतून आले असल्या कारणानें सिंहली लोक त्यांना मानतील हें संभवनीय नव्हतें. त्यामुळें राजसिंहाच्या पश्चात् विमलधर्मसूर्य राजाला शैवांना हांकून देऊन पुन्हा बौद्ध धर्म स्थापावा लागला. संघाची स्थापना करण्याला सिंहलद्वीपांत भिक्षु राहिलेच नव्हते. तेव्हां त्यानें स्याम देशांतून भिक्षु आणले, व पुन्हा संघाची स्थापना केली. आजकाल जो सिलोनांत प्रमुख पंथ आहे, त्याला स्यामनिकाय असें म्हणतात. ही गोष्ट येथें देण्याचें कारण हेंच कीं, शैवांनी जैनांची आणि बौद्धांची शिकार करण्याचें काम सवड मिळेल त्याप्रमाणें तहत सोळाव्या शतकापर्यंत चालू ठेवलें होतें; व सिंहलद्वीपापर्यंत लोकांना त्यांच्या ह्या शिकारीचीं फळें भोगावीं लागलीं.

२१३. हे राजे बौद्धांचा आणि जैनांचा छळ केवळ शैवांच्या सांगण्यामुळें करीत असत असें समजणें चुकीचें होईल. त्यांना आपल्या सैन्यासाठीं द्रव्याची मदत लागली, तर ती एकदम मिळवण्याला बौद्धांचा आणि जैनांचा छळ हें एक साधन होऊन बसलें होतें. कां कीं, त्या काळीं बहुतेक संपत्ति बौद्ध आणि जैन मन्दिरांतून एकवटली होती. त्याशिवाय बौद्धांच्या संघा-

---

१ महावंस ९३वा परिच्छेद. तो कसा मेला हें महावंसावरून समजत नाहीं. सिंहली लोकांत प्रचलित असलेली त्याच्या मरणाची कथा येथें दिली आहे.

रामांचीं आणि जैनांच्या उपाश्रयांचीं इनामें हिरावून घेण्यास तो एक चांगला उपाय होता; आणि बौद्ध किंवा जैनधर्मी राहून तो उपयोगांत आणतां येणें शक्य नव्हतें. म्हणूनच ह्या राजे लोकांनी शैव धर्माचा पुढाकार घेऊन बौद्धांचा आणि जैनांचा छळ आरंभिला असला पाहिजे.

## गौडपाद व शंकराचार्य

२१४. प्रो० पाठक यांना सांपडलेल्या एका हस्तलिखित पुस्तकावरून असें दिसून येतें कीं, शंकराचार्य इ० स० ७८८ सालीं जन्मले व ८२० सालीं परलोकवासी झाले.[1] ह्या अवघ्या बत्तीस वर्षांच्या आयुष्यांत त्यांनीं शारीरिकभाष्यासारखे मोठे ग्रंथ लिहिले हें संभवनीय दिसत नाहीं, असें पुष्कळ पाश्चात्य पंडितांचें मत आहे. तथापि शंकराचार्यांचा काळ आठव्या शतकाच्या शेवटीं व नवव्या शतकाच्या आरंभीं धरण्यास कोणतीच हरकत नाहीं. त्यांच्या चरित्रासंबंधानें शंकरदिग्विजय नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. पण तो काव्यात्मक असल्यामुळें ऐतिहासिक मानतां येत नाहीं. शंकराचार्यांचें शिक्षण कोठें झालें, व त्यांनी आपल्या धर्माचा प्रसार कसकसा केला, हें समजण्याचा मार्ग अद्यापि खुला झाला नाहीं. तरी ते गोविन्दपादाचे शिष्य होते, व गोविंदपाद गौडपादाचे शिष्य होते असें दिसतें.

२१५. गौडपाद आणि गोविंदपाद यांच्या ग्रंथांचें नीट निरीक्षण करून त्यांतून कांहीं ऐतिहासिक मजकूर शोधून काढतां

---

१ The Date of Shankarāchārya by Prof. K. B. Pathak; Indian Antiquary XI, 174.

येणें शक्य आहे. पण तें काम कालावधीचें असल्याकारणानें सध्या तरी हातीं घेतां येणें शक्य नाहीं. एवढें गृहीत धरून चालण्यास हरकत नाहीं कीं, गौडपादाचार्यांनंतर शंकराचार्य पन्नास साठ वर्षांनी उदयास आले. गौडपादाचार्यांनी लिहिलेल्या मांडूक्यकारिका तेवढ्या आमच्या अवलोकनांत आल्या. ह्या कारिकांच्या चौथ्या प्रकरणाच्या आरंभींचा श्लोक असा आहे—

ज्ञानेनाऽऽकाशकल्पेन धर्मान्यो गगनोपमान्।
ज्ञेयाभिन्नेन संबुद्धस्तं वन्दे द्विपदां वरम्॥

( ज्ञेय धर्मांपासून अभिन्न अशा आकाशकल्प ज्ञानानें आकाशसदृश पदार्थ ज्यानें जाणले, त्या द्विपदश्रेष्ठ संबुद्धाला मी नमस्कार करतों. )

२१९. या श्लोकावरूनच नव्हे, तर या सर्व प्रकरणावरून गौडपादाचार्य बुद्धाचे भक्त होते असें सिद्ध होतें. त्या वेळच्या बौद्ध पंडितांशी एकाच बाबतींत त्यांचा मतभेद होता; बौद्ध पंडित ज्ञान अनित्य समजत असत व गौडपाद तें नित्य समजत असत. पण त्यामुळें बौद्धांचा आणि त्यांचा खडतर विरोध नव्हता. तत्त्वसंग्रहाचा कर्ता शांतरक्षित अद्वैतवाद्यांचें म्हणणें खालील कारिकेंत दर्शवितो—

नित्यज्ञानविवर्तोऽयं क्षितितेजोजलादिकः।
आत्मा तदात्मकश्चेति सङ्गिरन्तेऽपरे पुनः॥ ३२८ ॥[1]

( दुसरे म्हणतात कीं, क्षिति, तेज, जल इत्यादिकांच्या रूपानें परिणत झालेला हा नित्यज्ञानरूपी एकच आत्मा आहे ); आणि तो पुढें म्हणतो कीं,

---

१ तत्त्वसंग्रह, पृष्ठ १२३ ( Gaekwad's Oriental Series )

तेषामल्पापराधं तु दर्शनं नित्यतोक्तितः ।

( त्यांचें हें दर्शन अल्पापराध आहे; कारण ते ज्ञानाला नित्य समजतात ). म्हणजे अद्वैत्यांच्या मतानें ज्ञान नित्य आहे हाच काय तो त्यांच्या दर्शनांत दोष; इतर बाबतींत त्यांच्या दर्शनांत व बौद्ध दर्शनांत मुळींच फरक नाहीं, असें शांतरक्षिताचार्यांचें म्हणणें दिसतें. शांतरक्षिताचार्यांचा काल इ० स० ७०५ ते ७६२ पर्यंतचा समजला जातो.[1] अर्थात् तो व गौडपादाचार्य समकालीन असणें संभवनीय आहे; व त्या कालापर्यंत बौद्धांत आणि अद्वैतवाद्यांत कोणत्याहि रीतीनें तंटा नव्हता, असें मानण्यास हरकत नाहीं.

२१७. परंतु शंकराचार्यांच्या वेळीं हा मनु पालटला. ते बौद्धांचे कट्टे शत्रु झाले. त्याचीं कारणें काय झालीं, हें सांगतां येणें कठिण आहे. एकतर दक्षिणेंतून येतांनाच त्यांनी श्रमणविद्वेष बरोबर आणला असावा, किंवा त्यांच्या वेळीं उत्तर हिंदुस्थानांत शैव संप्रदायाचें प्राबल्य वाढत गेल्यामुळें आपणहि त्यांतच शिरून बौद्धांवर व जैनांवर हल्ला करणें त्यांना फायदेशीर वाटलें असावें. असें असलें तरी गौडपादांच्या तत्त्वज्ञानाचा त्यांना त्याग करतां येणें शक्य नव्हतें. गौडपाद उघड रीतीनें बुद्धभक्त होते, पण शंकराचार्य 'प्रच्छन्नबौद्ध' बनले, एवढाच काय तो फरक.

२१८. शंकराचार्यांनी सर्व बौद्धांना हिंदुस्थानांतून हांकून दिलें अशीहि एक किंवदंती आहे. परंतु ती ऐतिहासिक नव्हे. शंकराचार्यांच्या वेळीं बौद्ध धर्म मोडकळीला आला होता; व त्याचें श्रेय बौद्ध श्रमणांच्या आळसाशिवाय दुसऱ्या कोणालाहि

---

१ तत्त्वसंग्रह [ Forward ] पृष्ठ १०—१६.

द्यावयाचें असेल तर तें पाशुपतादिक शैव सन्याशांना, त्यांना आंतून फूस देणाऱ्या ब्राह्मणांना आणि मदत करणाऱ्या शैव राजांना द्यावें लागेल. शंकराचार्यांनी या कामीं आपणाकडून शक्य तें साहाय्य केलें यांत शंका नाहीं. पण बौद्ध धर्म त्यांच्या नंतर महंमद घोरीच्या स्वाऱ्यांपर्यंत पूर्व हिंदुस्थानांत कसा बसा टिकाव धरून राहिला होता.[१]

२१९. बनारसजवळ सारनाथ म्हणून बौद्धांचें एक प्रसिद्ध स्थान आहे. येथें बुद्धानें आपल्या पहिल्या पांच शिष्यांना उपदेश केला हें वर सांगण्यांत आलेंच आहे. त्या स्थानाच्या जवळच सारनाथ नांवाचें महादेवाचें लिंग आहे. आजूबाजूच्या लोकांची समजूत अशी आहे कीं, जवळच्या बौद्धांना हांकून दिल्यावर शंकराचार्यांनी ह्या लिंगाची स्थापना केली. ही समजूत निखालस निराधार आहे. महमूद गझनी यानें प्रथमतः तेथील बौद्धांचे विहार लुटले असावे. परंतु त्याची स्वारी येऊन गेल्याबरोबर बंगालच्या महिपाल राजाच्या कारकीर्दीत इ० स० १०२६ सालीं स्थिरपाल व वसंतपाल या दोन श्रीमंत बंधूंनी तेथील एकूणएक इमारतींची डागडुजी केली. त्यानंतर बाराव्या शतकाच्या पूर्वार्धांत कनोज येथील गोविंदचन्द्र राजाच्या कुमारदेवी नांवाच्या राणीनें धर्मचक्र-जिनविहार नांवाचें एक मोठें मंदिर बांधलें. गोविंदचन्द्र राजा इ० स० ११५४ पर्यंत राज्य करीत होता. अर्थात् त्याच्या कारकीर्दीत सारनाथ येथील सर्व इमारती शाबूत होत्या हें सांगणें नलगे. त्यांचा उच्छेद महंमद घोरीच्या वेळीं झाला असला पाहिजे हें उघड आहे.[२]

---

१. वि० ३।१३७ पहा. २ Guide to the Buddhist Ruins of Sarnath, by Rai Bahadur Daya Ram Sahni पहा.

# पुराणांचा हल्ला

२२०. गुप्त राजे स्वतः वासुदेवाचे भक्त होते. तरी पण त्यांच्या कारकीर्दीत त्यानीं बौद्धांचे पुष्कळ विहार बांधले, व संघारामांना इनामें दिलीं. त्यांच्या राजवटींत ब्राह्मणांनी पुराणें हातीं घेऊन त्यांत वाटेल तेवढे फेरफार केले. तरी देखील उघड रीतीनें बुद्धावर हल्ला करणें त्यांना शक्य नव्हतें, म्हणून बुद्ध हा एक वासुदेवाचा अवतार आहे, असें समजण्यास त्यांनी हरकत घेतली नाहीं. पण शीलादित्यानंतर बुद्धाला विष्णूचा अवतार समजणें ही एक मोठी अडचण ब्राह्मणांच्या आड येऊं लागली असें दिसतें. सामान्य जनतेंत गैरसमज फैलावण्याला ही एक मोठी आडकाठी होती.

२२१. इकडे शैव धर्माच्या प्रभावानें राजे लोकांकडून बौद्धांचा छळ चालू होताच; पण जनतेंत त्यांच्याविषयीं थोडाबहुत आदर कायम राहिला होता. त्याच्यावर शंकराचार्यांनी असा तोडगा काढला कीं, हा बुद्ध म्हणजे लोकांना मोहांत पाडून त्यांचा नाश करूं पहाणारा आहे. ते म्हणतात, 'अपि च बाह्यार्थ-विज्ञान-शून्यवादत्रयमितरेतरविरुद्धमुपदिशता सुगतेन स्पष्टीकृतमात्मनोऽसंबद्धप्रलापित्वं प्रद्वेषो वा प्रजासु विरुद्धार्थप्रतिपत्या विमुह्येयुरिमाः प्रजा इति। (आणखी बाह्यार्थ, विज्ञान व शून्य असे परस्पर विरुद्ध तीन वाद उपदेशणाऱ्या सुगतानें आपला बडबड करण्याचा स्वभाव, किंवा परस्परविरुद्ध मार्गाचें अवलंबन करून जनता मोहांत पडावी अशा बुद्धीनें आपला जनद्वेष स्पष्ट करून दाखविला ).

२२२. ही शंकराचार्यांनी दिलेली सूचना पौराणिक ब्राह्मणांनी उचलली, व अशाच तऱ्हेचा मजकूर ज्या त्या पुराणांत

घुसडून दिला. त्याचा चांगला नमुना विष्णुपुराणांत सांपडतो; तो असा—"देवासुरांच्या युद्धांत देवांचा पराजय झाला. तेव्हां त्यांनी क्षीरसागराच्या उत्तरेस जाऊन तप आरंभिलें, आणि विष्णूजवळ जाऊन त्याचें स्तोत्र गाइलें. विष्णु त्यांना प्रसन्न झाला; व स्वशरीरांतून मायामोह निर्माण करून तो त्यानें देवांना दिला. मायामोह मुंडी, दिगंबर व मोराचीं पिसें धारण करणारा होऊन असुरांजवळ गेला, व मधुर वाणीनें त्यांना म्हणाला, 'हे दैत्यपतिहो ! तुम्ही ही तपश्चर्या कां करतां ?' ते म्हणाले, 'पारत्रिक फललाभासाठीं आम्ही हें तप करतों. येथें तुझें म्हणणें काय ?' तेव्हां तो म्हणाला, 'हाच धर्म मोक्षदायक आहे. त्यांत स्थिर होऊन तुम्ही मुक्ति मिळवाल.' अशा रीतिनें मायामोहानें अनेकान्तवाद ( स्याद्वाद ) सांगून त्या दैत्यांना वैदिक धर्म सोडावयास लावलें.

२२३. "त्यानंतर रक्तपट धारण करून आणि जितेन्द्रिय होऊन मायामोह दुसऱ्या असुरांपाशीं गेला, व त्यांस म्हणाला, 'स्वर्गाची किंवा निर्वाणाची इच्छा करीत असाल, तर तुम्ही पशुघातादिक दुष्ट कर्मे करूं नका. जग विज्ञानमय आहे असें समजा. असेंच संबुद्धांनी सांगितलें आहे.' अशा रीतीनें नानाप्रकारच्या युक्त्या लढवून मायामोहानें त्या दैत्यांनाहि वैदिक धर्मापासून परावृत्त केलें. त्यानंतर देवांनी त्यांच्याशीं युद्ध करून त्यांचा उच्छेद केला." ( विष्णुपुराण, अंश ३, अ० १७—१८ )

२२४. त्यानंतर पराशर मैत्रेयाला एक गोष्ट सांगतो ती अशी—"राजा शतधनु आणि त्याची राणी शैब्या या दोघांनीहि जनार्दनाच्या आराधनेसाठीं व्रत आरंभिलें. एकदां कार्तिकी एकादशीला गंगेत स्नान करून तीं दोघेंहि वर आलीं असतां

त्यांनी समोरून येणाऱ्या एका पाषंडीला पाहिलें. राजाला ज्यानें धनुर्विद्या शिकविली, त्याचा हा पाषंडी मित्र होता. म्हणून राजानें त्याच्याशीं मैत्रीनें गोष्टी केल्या. पण राणी संयमी असल्याकरणानें सूर्याकडे दृष्टि लावून बसली. नंतर त्यांनी विष्णूची पूजा केली.

२२५. "कांहीं काळानें राजा मरण पावला. त्याच्या बरोबर राणी सती गेली. परन्तु राजा त्या पापाचरणानें कुत्रा झाला. आणि राणी पूर्वजन्मींचें ज्ञान असलेली काशिराजकन्या झाली. आपला पति विदिशानगरींत कुत्रा होऊन जन्मला आहे हें तिनें जाणलें, व तेथें जाऊन त्याला चांगला आहार वगैरे देऊन त्याचा सत्कार केला. त्यामुळें तो शेपूट वगैरे हालवून कुत्र्याचे चाळे करूं लागला. ती फार लाजली व म्हणाली, 'महाराज ! तुम्ही कोणत्या कारणानें कुत्र्याच्या योनींत पडलां, व मझ्या समोर असले चाळे करतां याचा विचार करा. तीर्थस्नानानन्तर पाषंड्याशीं संभाषण केल्यानें ही कुत्सितयोनि तुम्हाला मिळाली, ह्याचें स्मरण नाहीं काय ?'

२२६. "तिच्या भाषणानें त्याला संवेग उत्पन्न झाला; व नगराबाहेर जाऊन मरुत्प्रपातावरून उडी टाकून त्यानें प्राण दिला, व तो कोल्ह्याच्या योनींत जन्मला. तेथेंहि त्याला त्याच्या बायकोनें पूर्वचरित्राची आठवण दिली. त्यानें उपासानें आपला प्राण सोडला, व तो लांडगा झाला. नंतर तो गिधाड, कावळा, बगळा व मोर झाला. त्या वेळीं जनक राजाचा अश्वमेध चालू होता. त्यांत तिनें त्या मोराला अवभृथस्नान घातलें, व पूर्व जन्माची आठवण दिली. तेव्हां त्यानें शरीर सोडलें, व तो जनक राजाचा पुत्र झाला. मग त्या काशिराजाच्या कन्येनें स्वयंवर करून त्याला वरलें. म्हणून पाषंडांशीं संभाषण, संसर्ग किंवा

हास्यविनोद करणें अतिपाप आहे असें जाणून तें वर्ज्य करावें. ( अंश ३, अ० १८, श्लोक ५३–१०० )

पाषंडिनो विकर्मस्थान्बैडालव्रतिकाञ्छठान् ।
हैतुकान्बकवृत्तींश्च वाङ्मात्रेणापि नार्चयेत् ॥ १०१ ॥

( वेदबाह्य कर्में करणारे, मार्जारव्रत धारण करणारे, हेतुवादी आणि बकवृत्ति असे जे पाषंडी त्यांची शब्दानें देखील पूजा करूं नये )."

२२७. हाच श्लोक मनुस्मृतीच्या चौथ्या अध्यायांत सांपडतो. त्यांतील हैतुकान् शब्द महत्त्वाचा आहे. हेतुविद्येचा मूळ संस्थापक वसुबंधु होय. त्यामुळें हा श्लोक किंवा सर्वच मनुस्मृति वसुबंधूनंतर बऱ्याच वर्षांनी लिहिली गेली असें सिद्ध होतें. ह्या श्लोकाची व्याख्या विष्णुपुराणाच्या कर्त्यानें कथारूपानें केली आहे. बुद्धाला अवतार गणण्यांत येत असे, त्याचीहि विल्हेवाट ग्रंथकारानें लावली आहे. तो अवतार खरा, पण दैत्यांच्या नाशासाठीं झाला; अर्थात् त्या अवताराचे जे भक्त भिक्षु, त्यांची शब्दमात्रानेंहि पूजा करतां कामा नये, असें ह्या गोष्टीचें तात्पर्य आहे. पुनर्जन्माच्या गोष्टी सांगून जैन व बौद्ध श्रमण लोकांचीं मनें आपल्या पंथांकडे वळवीत. तशाच पुनर्जन्मकथेचा आधार घेऊन जैनांचा आणि बौद्धांचा पराजय करण्याची ही खाशी युक्ति आहे ! व्रताच्या दिवशीं जर नुसतें अशा पाखंड्यांशीं भाषण केलें, तर त्याचा केवढा भयंकर परिणाम होतो, हें दाखवण्यासाठीं या ग्रंथकारानें वरील गोष्ट रचली हें उघडच आहे.

२२८. श्रमणांना मार्जारव्रतिक, बकव्रतिक वगैरे विशेषणांनी संबोधून शिव्यागाळी देण्याचा प्रकार बराच प्राचीन आहे. खुद्द त्रिपिटकांतच त्याचा उल्लेख सांपडतो तो असा—"ककुसंध

बुद्धाच्या वेळीं दूसी नांवाच्या मारानें एकदां ब्राह्मणांच्या अंगांत प्रवेश केला. तेव्हां ते श्रमणांना पाहून म्हणत असत कीं, हे मुंडक, श्रमणक, चैनी कृष्णधर्मी, ब्रह्मदेवाच्या पायांपासून उत्पन्न झालेले, ध्यानाच्या मिषानें खालीं मान घालून मंदपणें चिंतन करीत असतात. जसें घुबड संध्याकाळच्या वेळीं झाडाच्या फांदीवर बसून उंदराचें ध्यान करीत असतें, किंवा जसा नदीतीरीं कोल्हा माशांचें ध्यान करतो, अथवा बोका घराच्या भिंतीआड, गटारावर किंवा उकिरड्यावर उंदराचें ध्यान करतो, अथवा निरुपयोगी गाढव अशाच ठिकाणीं ध्यान करीत असतो, त्याच प्रकारें हे मुंडक श्रमणक ध्यान करतात !

२२९. "ही गोष्ट ककुसंध बुद्धाला समजली, तेव्हां तो म्हणाला, 'भिक्षुहो, ब्राह्मणांना दूसी मारानें पछाडलें आहे. त्यामुळें ते तुम्हास शिव्यागाळी देत आहेत. अशा वेळीं तुम्ही मैत्रीचित्तानें चारी दिशा भरून टाका; करुणाचित्तानें, मुदिताचित्तानें आणि उपेक्षाचित्तानें चारी दिशा भरून टाका.' भिक्षूंनी या चार भावना आरंभिल्यामुळें दूसी माराला त्यांचा पराजय करण्याची संधि सांपडली नाहीं. तेव्हां ब्राह्मणांच्या अंगांत शिरून त्यांच्याकडून त्यानें भिक्षूंचा आदर सत्कार फार वाढविला. तेव्हां ककुसंध भिक्षूंना म्हणाला, 'हें माराचें कृत्य आहे असें जाणून तुम्ही मोहांत पडूं नका. आपलें शरीर घाणेरडें आहे हें लक्ष्यांत ठेवा; अन्नामध्यें प्रतिकूलता आहे असें जाणा; जगांत संतोष मानूं नका; व सर्व संस्कार अनित्य आहेत असा विचार करा." [ मारतज्जनीयसुत्त, मज्झिमनि० ]

२३०. गोष्ट ककुसंधाच्या वेळची म्हणून सांगितली आहे. पण तसा प्रकार गोतम बुद्धानंतरच घडला असला पाहिजे. कधीं ब्राह्मण भिक्षूंना शिव्या देत, तर कधीं भिक्षूंचा आदर-

सत्कार करीत. तेव्हां अशा प्रसंगीं निंदेनें घाबरून न जातां किंवा स्तुतीनें वाहून न जातां स्थिर मार्गावर रहाण्याची युक्ति या कथेंत दर्शविली आहे.

२३१. "एकदां बुद्ध भगवान् राजगृहाहून नालंदा गांवाला मोठ्या भिक्षुसंघासह जात होता. त्याच्या मागोमाग सुप्रिय परिव्राजक व त्याचा शिष्य ब्रह्मदत्त हे दोघे होते. सुप्रिय अनेक रीतीनें बुद्धाची, धर्माची व संघाची निंदा करीत होता. पण त्याचा शिष्य ब्रह्मदत्त अनेक प्रकारें बुद्धाची, धर्माची व संघाची स्तुति करीत होता. हें पाहून भिक्षूंना मोठें आश्चर्य वाटलें, व ही गोष्ट त्यांनी बुद्धाला सांगितली. तेव्हां भगवान् म्हणाला, 'भिक्षुहो' माझी, धर्माची किंवा भिक्षुसंघाची कोणी निंदा केली, तर तुम्ही त्याबद्दल वाईट वाटूं देतां कामां नये. जर त्यामुळें तुमच्या मनावर आघात झाला, तर तो तुम्हालाच अंतराय-कारक होईल. जर माझी, धर्माची किंवा भिक्षुसंघाची इतरांनी स्तुति केली, तर तुम्ही वाहून जातां कामां नये. तुम्ही वाहून गेलांत, तर त्यामुळें तुम्हालाच अंतराय होईल."

२३२. हा बुद्धाचा उपदेश भिक्षूंच्या स्मरणांतून पार नष्ट झाला असावा. निंदेला किंवा स्तुतीला गंभीरपणें तोंड देऊन सामान्य जनतेच्या कल्याणाचा मार्ग त्यांनी पतकरला असता, तर त्यांना ब्राह्मणांचें आणि शैव संन्याशांचें भय बाळगण्याचें मुळींच कारण नव्हतें. पण तसें कांहीं न करतां त्यांनी पुराणां-च्या हल्ल्यापासून आपला बचाव करण्यासाठीं जणूं काय महा-पंकांतच उडी टाकली! एकामागून एक तंत्रें रचून ते आपल्या संप्रदायाचें रक्षण करण्यास पाहूं लागले. पण दिवसा बुद्धाची पूजा करावयाची आणि रात्रीं वाममार्गाचा अंगीकार करून नग्न स्त्रीची पूजा करावयाची, याचा मेळ बसावा कसा? त्या-

त्याहिपेक्षां शैव संन्याशांनी उघडपणें केलेली लिंगपूजा काय वाईट होती ? ब्राह्मणांना तोंड देण्यासाठीं त्यांनी ह्याच काळीं मञ्जुश्रीमूलकल्पासारखीं पुराणें रचण्यास सुरुवात केली. पण त्यांतहि तीव्रतर हिंसेचें आणि बीभत्सादिक रसांचें प्रदर्शन न करतां आल्या कारणानें ब्राह्मणी पुराणांसमोर हीं पुराणें फिक्कीं पडलीं व टिकाव धरून राहिलीं नाहींत.

## कापालिकांचा पराक्रम

( प्रबोधचन्द्रोदय नाटकावरून )

२३३. होतां होतां शैवांनी—विशेषतः त्यांतील अघोरी पंथानें—जैनांचा आणि बौद्धांचा विध्वंस कसा चालवला याचें वर्णन प्रबोधचन्द्रोदय नाटकाच्या तिसऱ्या अंकांत सांपडतें. तें जरी काव्यमय आहे, तरी त्यांत थोडाबहुत इतिहासाचा अंश असावा, असें वाटल्यावरून त्याचें रूपांतर येथें देतों.

२३४. शान्ति आणि करुणा प्रवेश करतात. श्रद्धेचा थांग न लागल्यामुळें शान्ति अग्निकाष्ठें भक्षण करण्याच्या विचारांत आहे. करुणा तिचें सांत्वन करते, व त्या दोघी जणी श्रद्धेच्या शोधासाठीं पाखंडी लोकांच्या मठाकडे वळतात. इतक्यांत क्षपणक पुढें येतो. त्याला पाहून सत्रास करुणा म्हणते–सखि ! राक्षस, राक्षस !

शान्ति—हा कोण राक्षस बरें ?

करुणा—पहा, पहा ! अंगावर मळ चढल्यामुळें बीभत्स दिसणारा, डोक्यावरचे केस उपटून काढल्यामुळें व नागवेपणामुळें ओंगळवाणा, मोराचीं पिसें हातांत घेऊन याच बाजूला येत आहे !

शान्ति—सखि ! हा राक्षस नाहीं. हा बिलकूल निर्वीर्य दिसतो.
करुणा—तर मग हा कोण असूं शकेल ?
शान्ति—सखि ! हा पिशाच्च असावा अशी शंका येते.
करुणा—पण सखि ! येवढ्या भर दिवसा सूर्य उत्तम रीतीनें प्रकाशत असतां पिशाच्चांना अवकाश कुठला ?
शान्ति—तर मग नुकताच नरकांतून वर निघालेला नरकवासी प्राणी असावा. ( त्याच्याकडे पाहून व विचार करून ) हां, समजलें. महामोहानें पाठविलेला हा दिगंबरसिद्धांत आहे. यासाठीं याचें दर्शन दूरूनच त्यजावें. ( असें म्हणून तोंड फिरवते. )
करुणा—सखि ! जरा थांब. इथें मी जरा श्रद्धेचा शोध करतें.

२३५. ( त्या बाजूला उभ्या रहातात. त्यानंतर वर वर्णिल्या प्रमाणें दिगंबरसिद्धांत प्रवेश करतो. )

दिगंबर—ॐ णमो अलिहन्ताणं. ( आकाशाकडे पाहून ) अरेरे श्रावका, ऐका. ह्या आमच्या मलमय पुद्गलपिंडाची सगळ्यातऱ्हेच्या पाण्यांनीहि शुद्धि कशी होईल ? पण आत्मा विमल स्वभाव आहे; आणि त्याचें ज्ञान ऋषिपरिचर्येनें होतें. काय म्हणतां ? ही ऋषिपरिचर्या कोणती ? तर मग ऐका. दूरून पायां पडावें, आणि त्यांना सत्कारपूर्वक मिष्टान्न भोजन द्यावें. जर त्यांनी तुमच्या बायकांशीं अतिप्रसंग केला, तर तुमच्या मनांत ईर्ष्यामल उत्पन्न होऊं देऊं नये. ( पडद्याकडे पाहून ) श्रद्धे, जरा इकडे ये.

२३६. ( शांति आणि करुणा भयभीत होऊन तिकडे पहातात. त्यानंतर दिगंबरवेषाला साजेसा पोशाख धारण करणारी श्रद्धा प्रवेश करते. )

श्रद्धा—महाराजांची काय आज्ञा आहे ? ( हें ऐकून शांति मूर्च्छित होऊन पडते. )
दिगंबर—( श्रद्धेला ) श्रावकांच्या कुलाला एक मुहूर्तभरहि सोडूं नकोस.
श्रद्धा—जशी महाराजांची आज्ञा. ( असें म्हणून निघून जाते. )
करुणा—प्रिय सखि, जरा शान्त हो. नाममात्रानें भिण्याचें कारण नाहीं. मी हिंसेकडून ऐकलें आहे कीं, तमाची कन्या श्रद्धा पाषंडांपाशींहि रहाते. तेव्हां ही तामसी श्रद्धा असली पाहिजे.......

२३७. ( त्यानंतर भिक्षुरूप धारण करणारा, हातांत पुस्तक घेऊन बुद्धागम प्रवेश करतो. )
भिक्षु—( विचार करून ) भो भो उपासका ! सर्व पदार्थ क्षणस्थायीच व अनात्मक आहेत. ते बाह्य आहेतसे वाटतात. परंतु जेव्हां चित्तसंततीमधून सर्व वासना निघून जातात, तेव्हां ती विषयांपासून विरक्त होते. ( जरा इकडे तिकडे फिरून मोठ्या डौलानें ) अहो, हा सौगत धर्म खरोखरच चांगला आहे. ज्यांत सौख्य आहे व मोक्षहि आहे. निजण्याला उत्तम आवास, आवडीप्रमाणें वाण्याच्या बायका, नियमित वेळीं मिष्ट भोजन, बिछाना उत्तम, श्रद्धेनें स्त्रिया पूजा करतात, व अशा रीतीनें मोठ्या चैनींत चांदण्याच्या रात्री निघून जातात.
करुणा—सखि ! तरुण ताडवृक्षाप्रमाणें लांब, काषाय धारण केलेला, मुंडितशिर असा हा कोण इकडे येत आहे बरें ?
शांति—सखि, हा बुद्धागम आहे.
भिक्षु—( आकाशाकडे पाहून ) भो भो उपासका, आणि भिक्षुहो, भगवान् सुगताचें वाक्यामृत ऐका ! ( पुस्तक वाचतो ) मी दिव्य चक्षूनें लोकांची सुगति आणि दुर्गति पहातों.

सर्व संस्कार क्षणिक आहेत. आत्मा स्थायी नाहीं. म्हणून भिक्षूंनी बायकांशीं अतिप्रसंग केला तरी ईर्ष्या करूं नये. कारण ईर्ष्या म्हटली म्हणजे चित्ताचें मालिन्य आहे. ( पडद्याकडे पाहून ) श्रद्धे जरा इकडे ये. ( श्रद्धा प्रवेश करते. )

श्रद्धा—महाराजांची काय आज्ञा आहे ?

भिक्षु—उपासकांना आणि भिक्षूंना चिरकाल आलिंगून रहा.

श्रद्धा—जशी महाराजांची आज्ञा. ( असें म्हणून निघून जाते. )

शांति—सखि, ही देखील तामसी श्रद्धा काय ?

करुणा—होय.

२३८. क्षपणक—( भिक्षूला पाहून मोठ्यानें ) रे भिक्षुक, इकडे ये जरा. तुला कांहीं विचारूं इच्छितों.

भिक्षु—( रागानें ) रे पाप्या पिशाचाकृते ! हें काय बडबडतोस ?

क्षपणक—अरे रागावूं नकोस. कांहीं शास्त्रार्थ विचारतों.

भिक्षु—रे क्षपणक, शास्त्रार्थ देखील जणतोस ? असूं द्या. ( त्याच्या जवळ जाऊन ) काय विचारावयाचें आहे ?

क्षपणक—हें सांग, क्षणविनाशी असा जो तूं हें व्रत कां धारण करतोस ?

भिक्षु—अरे ऐक. माझ्या चित्तसंततींतून उत्पन्न होणारा विज्ञानवान् असा कोणी तरी वासनाक्षय करून मोक्ष मिळवील.

क्षपणक—अरे मूर्खा, कोणत्या तरी मन्वंतरांत कोणी तरी मुक्त होणार. त्यामुळें सध्या नाश पावणाऱ्या तुला त्याचा काय उपयोग ? आणखी विचारतों कीं, असला हा धर्म तुला कोणी उपदेशिला ?

भिक्षु—खात्रीनें हा धर्म सर्वज्ञ भगवान् बुद्धानें उपदेशिला आहे.

२३९. क्षपणक—अरे, बुद्ध सर्वज्ञ हें तुला कसें समजलें ?
भिक्षु—अरे, त्यानेंच उपदेशिलेल्या आगमांनी बुद्ध सर्वज्ञ ठरत नाहीं काय ?
क्षपणक—अरे त्यक्तबुद्धे ! जर त्याच्याच वचनानें तो सर्वज्ञ असें तुला वाटतें, तर मी देखील सर्व जाणतों कीं, तूं तुझ्या बापजाद्यांसह सात पिढ्यांपर्यंत आमचा दास आहेस.
भिक्षु—(रागानें) रे चांडाळा, चिखलानें माखलेल्या पिशाचा ! तुझा मी दास ?
क्षपणक—अरे विहारदासीभुजंगा, दुष्टपरिव्राजका ! हा मी एक दृष्टांत दिला. तेव्हां तुझ्या कल्याणाची गोष्ट निर्भयपणें सांगतों. बुद्धाचा धर्म सोडून अर्हंतांच्या शासनाचा स्वीकार कर, व दिगंबरव्रत धारण कर.
भिक्षु—अरे पाप्या ! स्वतः नष्ट होऊन दुसऱ्यांचाहि नाश करूं इच्छितोस काय ? हें आमचें उत्कृष्ट स्वाराज्य सोडून असा कोण अनिंदित मनुष्य असूं शकेल जो तुझें हें निंद्य पिशाचव्रत धारण करील ?

२४०. ( त्यानंतर त्या दोघांचा थोडा वाद होतो. शांति व करुणा दुसरीकडे जाऊं इच्छितात. इतक्यांत कापालिकरूपधारी सोमसिद्धान्त प्रवेश करतो. तेव्हां क्षपणक त्याच्या जवळ जाऊन त्याला म्हणतो. )
क्षपणक—अरे कापालिका ! मनुष्यांच्या हाडांच्या माळा धारण करणाऱ्या तुझा धर्म कोणता व मोक्ष कोणता ?
कापालिक—अरे क्षपणका, आमचा धर्म कोणता तें ऐक. आम्ही मनुष्याचा मेंदू, आंतडीं, वसा आणि मांस यांनी भरलेल्या आहुती देतों; व मनुष्याच्या डोक्याच्या कवटींतून सुरापान करून पारणें फेडतों. नुकत्याच कापलेल्या मनुष्याच्या

गळ्यांतून निघालेल्या रक्ताच्या धारांच्या बलिदानानें आम्ही महाभैरवाची पूजा करतों.

भिक्षु—( कानावर हात ठेऊन ) बुद्ध, बुद्ध! अहो काय ही दारुण धर्मचर्या ?

क्षपणक—अर्हंत, अर्हंत ! अरेरे, घोर पाप करणाऱ्या कोणी तरी मनुष्यानें याला ठकविलें असावें !

२४१. कापालिक—( रागानें ) हा पाप्या, नीच पाखंड्या, मुंडका, केशलुंचका ! आम्हाला जर कोणी ठकवणारा असेल, तर तो चतुर्दश भुवनांची उत्पत्ति, स्थिति आणि प्रलय करणारा, वेदान्तप्रसिद्ध ज्याचें सिद्धान्तवैभव आहे, असा भगवान् पार्वतीपति होय. तर मग त्याच्या धर्माचा महिमा तुला दाखवतों......

क्षपणक—अरे कापालिका, याचसाठीं मी म्हणतों कीं, कोणी इंद्रजालविद्या जाणणाऱ्यानें माया दाखवून तुला ठकविलें आहे.

कापालिक—हा पाप्या ! परमेश्वराला इंद्रजालविद्या दाखवणारा म्हणतोस काय ? हा याचा दुष्टपणा क्षम्य नाहीं. ( तलवार बाहेर काढतो. ) दणदण डमरु वाजवून व भूतगणाला एकत्र करून, ह्या तलवारीनें याचें डोकें कापल्यावर कंठनाळांतून उसळणाऱ्या फेनिल रक्ताच्या धारांनी त्या भूतगणासह पार्वतीची पूजा करतों ! ( असें म्हणून तलवार उगारतो. )

क्षपणक—( भयानें ) महाभागा, अहिंसा परमधर्म आहे ! ( भिक्षूच्या कुशींत शिरतो. )

भिक्षु—( कापालिकाला निवारून ) भो भो महाभाग ! केवळ थट्टेच्या भाषणानें रागावून या गरीबावर प्रहार करणें योग्य नाहीं. ( कापालिक तलवार म्यानांत घालतो. )

२४२. क्षपणक—( जरा ताळ्यावर येऊन ) जर महाभागाचा भयंकर राग आवरला गेला असेल, तर मी कांहीं विचारूं इच्छितों.

कापालिक—विचार.

क्षपणक—तुमचा परमधर्म आम्ही ऐकला. आतां सोक्षमोक्ष कोणता तें सांगा.

कापालिक—तर मग ऐक. मृडानीपति म्हणतो कीं, 'विषयांवांचून जगांत कोठेंहि सुख नाहीं. विषयानन्दविरहित जी जिवाची स्थिति तीच जर मुक्ति, तर तिला पाषाणावस्था म्हटलें पाहिजे ! तिची इच्छा कां करावी ? चन्द्रचूडशरीरी मुक्त जीव पार्वतीसमान दयितेला आलिंगून सानन्द क्रीडा करतो.'

भिक्षु—महाभागा, अवीतरागाला मुक्ति मिळते, याच्यावर श्रद्धा ठेवतां येत नाहीं.

क्षपणक—अरे कापालिका, जर रागवणार नाहींस तर सांगतो. सशरीरी आणि सरागी अशी मुक्ति शक्यच नाहीं.

कापालिक—( आपणाशींच ) हां, अश्रद्धेमुळें यांचीं मनें अस्थिर झालीं आहेत. असूं द्या. ( उघड ) श्रद्धे जरा इकडे ये.

२४३. ( त्यानंतर कापालिकवेष धारण करणारी श्रद्धा प्रवेश करते. )

करुणा—सखि, पहा पहा ! रजोगुणाची कन्या श्रद्धा आली. प्रफुल्लनीलोत्पलाप्रमाणें तिचे डोळे आहेत. माणसांच्या हाडांची केलेली तिच्या गळ्यांतील माळा किती, सुन्दर दिसते ! स्थूल कटीनें आणि स्तनभारानें मंदगामिनी झालेली ही पूर्णेन्दुमुखी विलासिनी शोभत आहे !

श्रद्धा—(जवळ येऊन) ही मी आहें. मालक, आपली काय आज्ञा?

कापालिक—प्रिये, या दुरभिमानी भिक्षूला पहिल्यानें पकड पाहूं.

२४४. ( श्रद्धा भिक्षूला आलिंगन देते. तिला आलिंगन देऊन भिक्षु रोमांचित होतो व आपणाशींच म्हणतो. )

भिक्षु—अहाहा ! या कापालिनीचा स्पर्श किती तरी सुखकारक आहे ! मी किती तरी रांडांना आलिंगन दिलें असेल. परंतु शंभरदां बुद्धांची शपथ घेऊन सांगतों कीं, असा आनन्द मला कधींच मिळाला नाहीं ! खरोखरच कापालिकांचें चरित्र मोठें पुण्यप्रद आहे, व हा सोमसिद्धान्त वर्णनीय आहे ! हा धर्म आश्चर्यकारक आहे ! हे महाभागा, मी सर्वथैव बुद्धधर्म सोडला. आतां मी पारमेश्वर सिद्धांतांत प्रवेश करतों. म्हणून तूं माझा आचार्य, व मी तुझा शिष्य. मला पारमेश्वरी दीक्षा दे.

क्षपणक—रे भिक्षु, तूं कापालिनीच्या स्पर्शानें दूषित झाला आहेस. तेव्हां येथून दूर हो.

भिक्षु—हा पाप्या ! कापालिनीच्या आलिंगनमहोत्सवाला तूं वंचित झाला आहेस !

कापालिक—प्रिये, क्षपणकाला पकड. ( कापालिनी क्षपणकाला मिठी मारते. )

क्षपणक—( रोमांचित होऊन ) अहो अरिहंत ! अहो अरिहंत ! काय हें कापालिनीचें स्पर्श सुख ! सुन्दरी, दे, दे, मला पुन्हा हें आलिंगन दे !...अहो कापालिकांचें दर्शन तेवढें सुखाचें आणि मोक्षाचें साधन होय ! भो कापालिक, आतां मी तुझा दास झालों आहें. मलाहि महाभैरवाच्या अनुशासनाची दीक्षा दे.

कापालिक—तर मग बसा.

२४५. ( दोघेहि बसतात. आणि कापालिक पात्र हातांत घेऊन ध्यानस्थ बसतो. )

श्रद्धा—भगवन्, पात्र दारूनें भरलें. ( कापालिक त्यांतली थोडी दारू पितो. आणि तें पात्र भिक्षूला आणि क्षपणकाला देतो. )

कापालिक—हें पवित्र अमृत संसाराचें औषध आहे; त्याचें पान करा. तें पशु आणि पाश यांच्या उच्छेदाचें कारण, असें भैरवानें सांगितलें आहे. ( ते दोघे विचारांत पडतात. )

क्षपणक—आमच्या अरिहंतांच्या धर्मात सुरापान नाहीं.

भिक्षु—कापालिकाच्या उष्ट्याची दारू मी कशी घ्यावी ?

कापालिक—( विचार करून एका बाजूला ) श्रद्धे, कसला विचार करतेस ? यांचें अद्यापि तूं पशुत्व दूर करीत नाहींस काय? त्यामुळें हे माझ्या उष्ट्याच्या दारूला अपवित्र समजतात. तेव्हां ही दारू तोंडाला लावून पवित्र कर व यांना दे. तैर्थिकांचें म्हणणें आहेच कीं, 'स्त्रीमुखं तु सदा शुचि.'

श्रद्धा—जशी आपली आज्ञा. ( असें म्हणून सुरापात्र तोंडाला लावते व थोडी दारू पिऊन भिक्षूला देते. )

भिक्षु—हा महाप्रसादच म्हटला पाहिजे. ( असें म्हणून पात्र घेऊन दारू पितो. ) काय या दारूचें सौंदर्य ! वेश्यांबरोबर पुष्कळदां मी दारू प्यालों आहें. परंतु मला असें वाटतें कीं, या कापालिनीच्या उष्ट्याची दारू न मिळाल्यामुळेंच देवगण अमृताची लालसा धरतात !

क्षपणक—रे भिक्षु, सगळी दारू पिऊं नकोस. कापालिनीच्या उष्ट्याची मलाहि थोडी ठेवून दे.

२४६. ( भिक्षु तें पात्र क्षपणकाला देतो. व क्षपणक दारू पितो. )

क्षपणक—अहाहा ! काय हा दारूचा मधुरपणा ! काय हा स्वाद ! काय हा सुगंध ! आणि काय ही रुचि ! अरिहंतांच्यां

शासनांत पडून अशा तऱ्हेच्या दारूला मी चिरकाळ मुकलों. रे भिक्षु, मला भोंवळ येते, म्हणून मी निजतों.

भिक्षु—आतां हेंच करूंया. (असें म्हणून दोघेहि निजतात.)

कापालिक—प्रिये पैशांवांचून हे दोन दास आम्हाला मिळाले; तेव्हां आतां नाचूंया. ( असें म्हणून कापालिक व कापालिनी नृत्य करतात. )

क्षपणक—अरे भिक्षु, हा कापालिक किंवा आमचा आचार्य कापालिनीबरोबर सुंदर नृत्य करतो; तर त्यांच्याबरोबर आम्ही पण नाचूंया. (ते दोघेहि दारूच्या धुंदीत वेडेवांकडे नाचतात.)

२४७. हें नाटक कृष्णमिश्र नांवाच्या दंडी परिव्राजकानें चंडेल राजा कीर्तिवर्मा याच्या कारकीर्दीत लिहिलें. इ० स० १०६५ सालीं त्याचा प्रयोग ह्या राजासमोर करून दाखविण्यांत आला होता असें म्हणतात. वर दिलेलें बौद्ध, जैन व कापालिक यांचें वर्णन जरा विशेष खुलवून लिहिलें असावें. तथापि त्यांत बराच ऐतिहासिक तथ्यांश असला पाहिजे. आणि म्हणूनच आम्ही त्याचें रूपांतर येथें दिलें आहे. शैव कापालिकांनी तलवार, स्त्री आणि दारू या तीन साधनांचा उपयोग करून बौद्ध व जैन श्रमणांना आपल्या पंथांत येणें भाग पाडलें; आणि जेथें हें शक्य नव्हतें तेथें त्यांचा उच्छेद केला असावा.

## श्रमणसंस्कृतीची इतिश्री

२४८. इ० स० ७१२ सालीं महंमद इब्न कासीम यानें सिंध देश काबीज केला व तेथें मुसलमानांचें ठाणें कायम केलें. त्यानंतर महमूद गझनी याच्या इ० स० १०३० सालापर्यंत या देशावर एकंदर सतरा स्वाऱ्या झाल्या. त्यानें हिन्दु देवळांचा

एकसारखा संहार मांडला. असें असतां ह्या मुसलमानांच्या स्वाऱ्यांचा कांहीं एक विचार न करतां आमच्या ह्या कृष्णमिश्रा-सारखे शहाणे संन्यासी लोक असलीं नाटकें लिहिण्यांतच मोठें भूषण मानीत होते ! यावरून हिन्दु लोकांचा अधःपात कसा चालू होता, हें स्पष्ट होत आहे. असा एक कोणी माणूस हिन्दु-स्थानांत राहिला नाहीं कीं, जो हिन्दु संस्कृतीला चलन देऊन व तिच्यांतील सर्व दोष काढून टाकून पुन्हा तिला कार्यक्षम करील. यासंबंधीं अल्बेरूनीचें म्हणणें विचारणीय आहे.

२४९. "नास्तिक ग्रीक खिस्तापूर्वी हिंदूंसारखेच मूर्तिपूजक होते....परंतु त्यांच्यामध्यें पुष्कळ शास्त्रज्ञ असे निघाले कीं, ते सामान्य जनतेच्या धर्मभोळेपणाला बळी पडत नसत. साक्रे-टिसाचेंच उदाहरण घ्याना. तो नक्षत्रांना देव म्हणण्यास तयार नव्हता. ताबडतोब आथेन्समधील बारांपैकीं अकरा न्याया-धीशांनी त्याला मरणाची शिक्षा फरमाविली. पण साक्रेटीस सत्यावर अचल श्रद्धा ठेवून मरण पावला. हिंदूंत अशीं माणसें झालीं नाहींत....हिन्दूंतील शास्त्रज्ञ देखील आपले शास्त्रीय सिद्धान्त सामान्य जनतेच्या धर्मभोळेपणांत मिसळून टाकतात. म्हणजे मोत्यांच्या शिंप्या आणि आंबट खजूर, मोत्यें आणि शेण, अथवा स्फटिकमणि व सामान्य गोटे, यांची भेसळ कर-ण्यासारखेंच त्यांचें वर्तन आहे. शास्त्रीय पद्धतीच्या पायऱ्या चढण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत नसल्याकारणानें त्यांच्या दृष्टीनें दोन्ही प्रकारच्या वस्तु त्यांना सारख्याच दिसतात."[1]

२५०. अल्बेरूनीनें आमच्या पंडितांना दिलेलें हें सर्टिफिकेट वावगें कोण म्हणेल ? आणखी एका ठिकाणीं तो म्हणतो, "हिंदु

---

१. हा सारांश आहे. Alberuni's India, i, 24-25.

लोकांना वाटतें कीं, त्यांच्या देशासारखा दुसरा देश नाहीं, त्यांच्या राजांसारखे दुसरे राजे नाहींत, त्यांच्या धर्मासारखा दुसरा धर्म नाहीं, आणि त्यांच्या शास्त्रांसारखें दुसरें शास्त्र नाहीं....जर तुम्ही खुरासानमधील किंवा पर्शियामधील शास्त्रांविषयीं आणि विद्वानांविषयीं त्याच्यांशीं बोलाल, तर तुम्हाला ते मूर्खच नव्हे, तर लबाडहि समजतील. ते जर प्रवास करतील, व परकयांत मिसळतील, तर त्यांची ही वृत्ति रहाणार नाहीं. कारण त्यांचे पूर्वज अशा तऱ्हेच्या संकुचित विचाराचे नव्हते. त्यांच्या विद्वानांपैकीं वराहमिहिर म्हणतो कीं, 'यवन जरी म्लेंच्छ आहेत, तरी त्या लोकांना हें ( ज्योतिष ) शास्त्र उत्तम माहीत आहे, यासाठीं त्यांचीहि पूजा केली जाते; मग दैवज्ञ ब्राह्मणाविषयीं काय सांगावें ?'...[१] ह्यांत देखील इतरांना न्याय देऊं पहाणारा वराहमिहिर आपली प्रौढी कशी मारतो पहा !"[२]

२५१. परंतु परदेशांत प्रवास करण्याचें सामर्थ्य ब्राह्मणांमध्यें किंवा श्रमणांमध्येंहि मुळींच राहिलें नव्हतें. ज्या श्रमणांनी हिमालयावरून खोटानसारख्या निर्जल आणि निर्जन प्रदेशांतून प्रवास करून चिनी लोकांना बौद्ध धर्म शिकविला, तेच श्रमण आपल्या संघारामाच्या तटाच्या आंतच सर्व विश्व आहे असें समजूं लागले होते ! किंबहुना हे संघाराम म्हटले म्हणजे त्यांच्यासाठीं जणूंकाय सापळेच होऊन बसले होते ! मुसलमानांच्या स्वाऱ्या जेव्हां या देशावर होऊं लागल्या, तेव्हां त्यांना

१. म्लेच्छा हि यवना तेषु सम्यक् शास्त्रमिदं स्थितम् ।
ऋषिवत्तेऽपि पूज्यन्ते किं पुनर्दैवविद्द्विजः ॥ १५ ॥ अ० २ ॥

२. Alberuni's India, i, 22-23

संघारामांच्या सापळ्यांत सांपडलेल्या भिक्षूंचा संहार करणें अति सोपें झालें. अशा एका संघारामाचा उच्छेद महंमद बख्त्यार यानें केल्याचा उल्लेख वर आलाच आहे.[१]

२५२. मुसलमानांनी बौद्धांच्या मठांबरोबरच जैनांच्या आणि शैवांच्याहि मठांचा उच्छेद केला असला पाहिजे. बौद्ध श्रमणांना नेपाळ व तिबेट या ठिकाणी आश्रयस्थान असल्यामुळें मुसलमानांच्या कत्तलींतून जे कोणी भिक्षु बचावले, त्यांनी त्या देशांचा आश्रय धरला. त्याचा परिणाम एवढाच झाला कीं, हिंदी आणि तिबेटियन भिक्षूंच्या सहकारानें तिबेटियन वाङ्मयांत पुष्कळ भर पडली. आजला जे बौद्ध ग्रंथ संस्कृतांत सांपडत नाहींत, त्या सर्वांचीं भाषांतरें तिबेटियन भाषेंत सांपडतात.

२५३. परंतु जैन आणि शैव संन्याशांना आपला वेष पालटून ह्याच देशांत कोठेंतरी दडून बसण्याची पाळी आली असावी. ह्या दोन्ही पंथांचें पुनरुज्जीवन झालें खरें, परंतु त्यांत मुळींच दम राहिला नाहीं. बौद्ध आणि जैन श्रमणांच्या अनाचारामुळें लिंगपूजा व मनुष्याचें बलिदान करणारा कापालिकांसारखा शैव पंथ निघाला. लोखंडाचा गंज जसा लोखंडाला खाऊन टाकतो व शेवटीं स्वतः हि धुळींत मिळून जातो, त्याप्रमाणें मुसलमानांच्या कारकीर्दीत हा पंथ देखील बौद्ध आणि जैन श्रमणांबरोबरच जमीनदोस्त होऊन गेला.

२५४. सोन्याच्या, रुप्याच्या व तांब्याच्या मूर्ति मुसलमानी कारकीर्दीत गडप झाल्या. एक तेवढें महादेवाचें लिंग, व आजुबाजूला कोठें तरी इतर देवतांच्या कांहीं मूर्ति शिलक राहिल्या असाव्यात. पण ब्राह्मण जिकडे तिकडे थोड्याबहुत

---

१. वि० ३।१३७.

प्रमाणांत राहिलेच होते. तेव्हां त्यांचा पुजारीपणाचा धंदा चालू ठेवण्यासाठीं गयेच्या विष्णुपदासारखीं पूजाचिह्नें व शक्य असेल तेथें देवतांच्या नवीन मूर्ति उत्पन्न करून त्यांनी आपला व्यवसाय चालू ठेवला. मात्र श्रमणसंस्कृति ह्या देशांतून पार नष्ट झाली. आजला हिंदुस्थानांत असलेले जैन साधु, आणि सर्व हिंदुस्थानभर पसरलेले शैव व वैष्णव महंत, यांना श्रमणसंस्कृतीचे पुरस्कर्ते म्हणणें बरोबर होणार नाहीं. कां कीं, आपली संस्कृति फैलावण्याचा त्यांचा प्रयत्न दिसून येत नाहीं. कोणा तरी गरिबांच्या मुलांना आपले चेले करून आपली परंपरा काशी बशी चालू ठेवावी, एवढाच कायतो त्यांचा प्रयत्न दिसतो.

## मुसलमानी कारकीर्द

२५५. महंमद इब्न कासीम या अरब सरदारानें इ० स० ७१२ सालीं सिंधवर स्वारी केली, व तो सर्व देश आपल्या ताब्यांत घेतला. तेव्हांपासून सिंध देशावर मुसलमानांचें स्वामित्व अबाधित होतें. शंकराचार्यांचा जन्म इ० स० ७८८ सालीं झाला; आणि त्यांच्या दिग्विजयाला आरंभ त्यानंतर कमींत कमी पंचवीस तीस वर्षांनी झाला असला पाहिजे. म्हणजे त्या काळापर्यंत जवळ जवळ शंभर वर्षें मुसलमान हिंदुस्थानांत येऊन स्थायी झाले होते. असें असतां ह्या नवीन उपस्थित झालेल्या परिस्थितीचा विचार न करतां शैव संन्यासी, पुराणकार ब्राह्मण व वेदांती शंकराचार्य या सर्वांचा बौद्ध आणि जैन यांना उखडून काढण्याचा तेवढा प्रयत्न दिसतो !

२५६. एकीकडे अत्यंत भिन्न संस्कृतीचे मुसलमान येऊन आपलें वर्चस्व स्थापन करतात, व दुसरीकडे ब्राह्मण पुराणकार

व ब्राह्मण वेदांती बुद्धासंबंधानें लोकांत गैरसमज व द्वेष फैलावून बौद्धांची व जैनांची शिकार करण्याला शैव राजांना व कापालिकांसारख्या शैव संन्याशांना उत्तेजन देतात, हें आश्चर्य नव्हे काय ? खरें म्हटलें असतां अशा प्रसंगीं पार्श्वानें व बुद्धानें घालून दिलेल्या अहिंसेच्या पायावर हिंदी संस्कृतीची पुनर्घटना करून मुसलमानांच्या अत्याचारांना तोंड देणें वाजवी होतें. पण तसें केलें असतां शिवाची किंवा शिवलिंगाची पूजा करून ब्राह्मणांना दक्षिणा कशी मिळाली असती ? सिंध जाईना कां, सोरटी सोमनाथ होताच कीं नाहीं ? तेथल्या लिंगपूजेवर ब्राह्मणांची चंगळ चाललीच होती ! पण तेवढ्यानें तृप्त न होतां बौद्धांच्या व जैनांच्या मठांना परंपरेनें मिळालेल्या इनामांवरहि ब्राह्मणांची दृष्टि होतीच ! आणि एवढ्याचसाठीं त्यांनी ह्या श्रमणांसंबंधानें गैरसमज फैलावण्याचें काम चालू ठेवलें होतें.

२५७. तर मग मुसलमानांचें पारिपत्य ब्राह्मणांना नको होतें काय ? असें नव्हे. पण तें जैनांचे व बौद्धांचे मठ मोडण्याइतकें सोपें नव्हतें. तेव्हां तें काम त्यांनी परस्पर कल्कि अवतारावर सोपविलें. कल्कि अवतारासंबंधानें जी माहिती आमच्या पहाण्यांत आली, त्यांत पहिली विष्णुपुराणांत सांपडते; व ती मुसलमानांनी सिंध देश काबीज केल्यावर लिहिली गेली असें दिसतें. 'सिंधुतटदाविकोर्वीचन्द्रभागाकाश्मीरविषयांश्च व्रात्य-म्लेच्छशूद्रादयो भोक्ष्यन्ति ।...अल्पप्रसादा बृहत्कोपास्सार्वकाल-मनृताधर्मरुचयः स्त्रीबालगोवधकर्तारः।...' ॥ अंश ४, अ० २४। ६९–७१ ॥ ( सिंधुतट, दाविकोर्वी, चंद्रभागा व काश्मीर प्रांत व्रात्य, म्लेच्छ, शूद्र इत्यादिक उपभोगतील. हे लोक थोडी मेहेरबानी करणारे पण पुष्कळ रागवणारे, सदोदित खोट्या धर्माची रुची बाळगणारे, व स्त्री, बालक आणि गाई यांचा वध

करणारे असतील.) मुसलमान लोक गोवध तर रोजच करीत, व लढाईमध्यें प्रसंगवशात् बायकांना व मुलांनाहि मारीत. तेव्हां त्यांचें राज्य स्थापन झाल्यावर हें विष्णुपुराणांतील भविष्य वर्तविलें गेलें, यांत शंकाच रहात नाहीं. हें सगळें झाल्यावर पुराणकाराचें गोड स्वप्न म्हटलें म्हणजे, 'शंबल गांवच्या विष्णुयश नांवाच्या प्रधान ब्राह्मणाच्या' घरीं वासुदेवाचा कल्किरूपी अवतार होईल; व तो सर्व म्लेच्छांचा उच्छेद करील, आणि ब्राह्मणधर्माची पुन्हा स्थापना करील',[1] हें होय!

२५८. ह्या वेळीं श्रमणांची स्थिति तर अत्यंत अनुकंपनीय होत चालली होती. अहिंसेचा आणि सत्याचा प्रसार करण्याचें सोडून आपल्या मठांची इस्टेट संभाळण्यासाठीं त्यांनी मंत्रतंत्रांचा पूर्णपणें अंगीकार केला होता. आणि असें असतांहि बंगालच्या पाल राजांचा ह्या बौद्ध श्रमणांना पूर्ण पाठिंबा होता!

२५९. अशा परिस्थितींत महमूद गझनीच्या या देशावर एका मागून एक सतरा स्वाऱ्या झाल्या. त्यानें देवळें व मठ मोडण्याचा सारखा क्रम चालविला, आणि हिंदुस्थानांतून अतोनात लूट नेली, हें सर्वप्रसिद्धच आहे. असें असतांहि श्रमण व ब्राह्मण यांच्यापैकीं असा एकहि 'त्यागी' पुरुष निघाला नाहीं कीं, जो हिंदी संस्कृतीचे दोष दूर करून व तिचें योग्य संघटन करून मुसलमानांच्या अत्याचाराला आळा घालील. पुराणांनी उत्पन्न केलेल्या महापंकांत सर्व जनता जणूं काय बुडूनच गेली होती, व ह्या चिखलांतून वर डोकें काढण्याचें कोणाच्याहि अंगीं सामर्थ्य राहिलें नव्हतें!

---

१ विष्णुपु० अंश ४, अ० २४।९८ पहा.

२६०. भगवद्गीतेच्या तत्त्वज्ञानापुढें एकीचें तत्त्वज्ञान कोण प्रतिपादन करूं शकला असता? कौरवपांडवांसारखें किंवा यादवांसारखें आपआपसांत भांडणें हें अधिक धार्मिक नव्हतें काय? खुद्द परमेश्वरानेंच जर तें केलें, तर हिंदी राजेरजवाड्यांचें तेंच कर्तव्य ठरत नव्हतें काय? आणि तें कर्तव्य खरोखरच ते उत्तम रीतीनें बजावीत होते. मुसलमान येऊन सर्वांची सारखी कत्तल करतात, तरी पण आमचे राजे आपसांत भांडतच होते! यदाकदाचित् अल्पकालापुरते लढाईच्या मैदानावर मुसलमानांना विरोध करण्याला ते एकत्र जमले, तरी शिस्तीच्या अभावामुळें अशा जमावाचा धुव्वा उडवून देणें मुसलमानांना फार सोपें जात असे. आनन्दपालानें एकत्र केलेल्या लहानमोठ्या राजांची महमूद गझनीसमोर कशी दाणादाण उडून गेली, हें वर्णन वाचण्याजोगें आहे;[१] व तें वाचतांना पानिपतच्या लढाईंत झालेल्या मराठ्यांच्या पराभवाची आठवण झाल्यावांचून रहात नाहीं.

२६१. महमूद गझनी आला, देवळें मोडलीं, लूटफाट केली व निघून गेला. पंजाब व सिंध येथें काय ती त्याची थोडीबहुत सत्ता राहिली. त्याच्या नंतर महंमद घोरी उदयाला आला. प्रथमतः त्यानें पंजाब व सिंध प्रांतांत आपल्याच धर्मबांधवांचा उच्छेद मांडला, व त्यानंतर तो दिल्लीकडे वळला. पण ११९१ सालीं कर्नाळच्या उत्तरेला तराईन येथें पृथ्वीराज चव्हाणानें त्याचा असा पराजय केला कीं, त्याला आपल्या लोकांना घेऊन पळतां वाट पुरे झाली. त्यानें आपला जीव कसा बसा नेऊन अफगाणीस्थानांत टाकला. परंतु या पराजयामुळें

१ Mediaeval India, pp. 19-20.

त्याला झोंप कशी ती येईना. एका वर्षांत पुन्हा फौजेची तयारी करून त्यानें हिंदुस्थानावर हल्ला केला, व त्याच तराईन गांवीं पृथ्वीराजाचा पराजय करून त्याला ठार केलें, आणि बहुतेक सर्व उत्तर हिंदुस्थान आपल्या ताब्यांत घेतला. पांच सहा वर्षांच्या अवधींत महंमद घोरीचें राज्य बंगालपर्यंत पसरलें.[1]

२६२. महंमद घोरीच्या व महमूद गझनीच्या स्वाऱ्यांत एवढाच फरक कीं, घोरीनें आपलें ठाणें दिल्लीला कायमचें बसविलें, आणि जिकडे तिकडे देवळांचे दगड काढून त्याच देवळांवर मशीदी आणि इद्गे बांधण्यास सुरुवात केली. या वेळीं ब्राह्मणांचा कसा छळ झाला याचें वर्णन वर निर्देशलेल्या[2] महाभारतांतील वनपर्वाच्या एकशें नव्वदाव्या अध्यायांत सांपडतें. तेव्हां कोठें ब्राह्मणांना चैत्यांची थोडीबहुत आठवण झाली. चैत्यांच्या जागीं काय किंवा मंदिरांच्या जागीं काय इद्गे किंवा मशीदी होतील, हें भविष्य त्यांनी ह्या अध्यायांत दडपून देऊन विष्णुपुराणांतील भविष्याची नवी आवृत्ति काढली. बाकी मुसलमानांचें पारिपत्य करण्याचें काम त्यांनी विष्णुपुराणाप्रमाणेंच कल्कि अवतारावर सोंपविलें ! मात्र त्यांत फरक एवढाच कीं, महाभारतांतील भविष्यांत विष्णुयश स्वतःच कल्कीचा अवतार बनतो.

# रामानुजी व माध्व पंथ

२६३. वैष्णव संप्रदायांचे बहुतेक पुढारी महमूद गझनीच्या स्वाऱ्यांनंतर उदयाला आले. त्यांपैकीं पहिले रामानुज होत.

---

१ Early History of India, pp. 403-4. २ वि० ३।१२९ वगैरे.

वासुदेवाची पूजा गुप्त राजांच्या कारकीर्दीतच उत्तर हिंदुस्थानांत फैलावली होती. त्यानंतर सहाव्या किंवा सातव्या शतकांत दक्षिणेकडे विष्णुपूजा विशेष प्रचारांत आली असावी. विष्णुभक्तांच्या पुढाऱ्यांना तामीळ देशांत आळवार म्हणत. ह्या आळवारांचें तेज शैवधर्मासमोर पडणें शक्य नव्हतें. कां कीं, शैव धर्माला राजांचा तर पाठिंबा होताच, आणि लवकरच त्याला शंकराचार्यांसारख्या वेदांती पुढाऱ्याचाहि पाठिंबा मिळाला. अर्थात् वैष्णव संप्रदायाला अशा एकाद्या वेदांती पुढाऱ्याची उणीव भासूं लागली; व ती रामानुजाचार्यांनी भरून काढली.

२६४. रामानुजाचार्य श्रीरंगम्‌च्या पुजारी घराण्यांत इ० स० १०१७ सालीं जन्मले. त्यांनी संस्कृत भाषेचा अभ्यास करून वैष्णव संप्रदायाला अनुकूल असें ब्रह्मसूत्रभाष्य लिहिलें. त्यांच्या ह्या नवीन संप्रदायाला विशिष्टाद्वैत म्हणतात. त्या काळीं कुलोत्तुंग नांवाचा चोळ राजा राज्य करीत होता. त्याला रामानुजाचा हा नवीन प्रयत्न अर्थातच आवडला नाहीं; व रामानुजाला १०८० आणि ९० यांच्या दरम्यान श्रीरंगम् सोडून पळ काढावा लागला. कुलोत्तुंग राजानें रामानुजाचा मित्र कुरत्ताळवार याचे डोळे फोडले, व याप्रमाणें ह्या नवीन पंथाचा सूड उगवण्यास सुरुवात केली. बौद्धांना आणि जैनांना जाळणाऱ्या ह्या शैवपंथरूपी अग्नीची थोडीशी झळ रामानुजालाहि लागली म्हणावयाची! तथापि त्यामुळें हे नवीन संप्रदायाचे संस्थापक अहिंसक बनले नाहींत. म्हैसूर संस्थानामध्यें दहा बारा वर्षें राहून तेथील बिट्टिदेव (विष्णुवर्धन) राजाला आपला अनुयायी करून जैनांचा संहार करण्याचें काम त्यांनी मोठ्या शिताफीनें चालविलेंच होतें! पुष्कळ जैनांची डोकीं तेलाच्या घाण्यांत घालवून त्यांनी फोडविलीं, असें त्यांचे अनुयायी मोठ्या

प्रौढीनें सांगत आले आहेत. परंतु एस्. कृष्णस्वामी आय्यंगार यांचें म्हणणें कीं, या गोष्टी काल्पनिक असाव्यात.[1] कांहीं असो, पण प्रसंग आला असतां रामानुजाचार्यांनी अशा गोष्टी करण्यास मागें पाहिलें नसतें खास. कां कीं, रामानुज त्यांच्या पूर्वीच्या शैव सांप्रदायिकांसारखेच एक सांप्रदायिक होते. त्यांच्या आणि शैवांच्या क्रूरतेंत व हिंसेंत फरक अंशांचा असेल, पण जातीचा नव्हता.

२६५. हा फरक खुद्द महादेव व विष्णु यांच्यांतच दिसून येतो. दोघे देव प्रसंगवशात् दैत्यांचा संहार करणारेच आहेत. तथापि विष्णु महादेवाइतका तीव्र नाहीं. महादेव म्हटला म्हणजे भूतपिशाचांचा राजाच तो ! त्याच्या संप्रदायांत पाशुपत आणि कापालिक यांच्यासारखे अघोरी पंथ उत्पन्न होणें साहजिकच होतें. पण वासुदेवाच्या भक्तांत इतका अघोरीपणा येणें शक्य नव्हतें. त्यामुळें जेथें जेथें बौद्ध आणि जैन संप्रदायांचें वर्चस्व नुकतेंच नष्ट होत चाललें होतें, तेथें तेथें वासुदेवाची किंवा विष्णूची पूजा लोकप्रिय होत गेली. असाच प्रकार दक्षिणेंत घडला. तिकडे शैवांनी बौद्ध व जैन पंथांना संपुष्टांत आणल्यावर वासुदेवाची पूजा फैलावयास लागली. पण त्या पूजेला वैदिक संप्रदायाचा आधार नसल्यामुळें ती वरिष्ठ लोकांत तितकी आदरणीय झाली नाहीं. यासाठीं रामानुजानें श्रीभाष्य व इतर संस्कृत ग्रंथ लिहून विष्णुपूजेला महत्त्व देण्याचा प्रयत्न केला; व तो थोड्याबहुत प्रमाणानें सफलहि झाला.

२६६. रामानुजानंतर दक्षिणेंत दुसरा एक वैष्णव संप्रदाय निघाला. त्याचा पुरस्कर्ता मध्वाचार्य ११९७ सालीं जन्मला व

१ Ancient India, pp. 258-60 पहा.

१२७६ किंवा ७७ सालीं निवर्तला. ह्या कालांत उत्तरेकडे मुसलमानाचें आधिपत्य सुदृढ होत चाललें होतें. मशीदी आणि इदगे जिकडे तिकडे होत होते, व जबरदस्तीनें लोकांना मुसलमान बनवण्यांत येत असे. असें असतां दक्षिणेकडे हे ब्राह्मण पुढारी नवीन पंथ स्थापण्यांतच भूषण मानीत होते! जशी राजकीय बाबतींत अंदाधुंदी होती, तशी ती धार्मिक बाबतींतहि होती असें म्हटलें पाहिजे. एकाद्या लहानशा जमीनदारानें उठावें, कांही सैन्य गोळा करावें व आजूबाजूचा प्रदेश काबीज करून आपणच एक राजा होऊन बसावें; त्याचप्रमाणें एकाद्या विद्वान् ब्राह्मणानें पुढें यावें, ब्रह्मसूत्राचें आपणास अनुकूल असें भाष्य लिहावें, आणि एक संप्रदाय व परंपरा स्थापन करावी; आणि राजे लोकांना जसें सामान्य जनतेच्या दुःखाबद्दल कांहींच वाटत नव्हतें, तसेंच यानांहि सामान्य जनतेचें दुःख काय आहे हें मुळींच ठाऊक नव्हतें. राजे लोक ऐषआरामांत व हे आपल्या संप्रदायांत गर्क होऊन राहत.

२६७. रामानुज व मध्व या दोघांनी गोपींना मुळींच महत्त्व दिलें नाहीं. त्यामुळें हे दोन संप्रदाय कर्मठ राहिले. परंतु निंबार्क, वल्लभ व चैतन्य ह्या तीन वैष्णव पुढाऱ्यांनी राधेला व गोपींना पुढें आणल्यामुळें त्यांच्या संप्रदायांत शिथिलता शिरली.

## राधाकृष्ण पंथ

२६८. राधेला आणि गोपींना पुढें आणणारा पहिला वैष्णव पुढारी म्हटला म्हणजे निंबार्क होय. तो ११६२ सालीं निवर्तला असें सर भांडारकर म्हणतात.[१] परंतु जसा रामानुजाचार्यांच्या

---

१ Vaishnavism etc. p. 88 note.

तसाच याच्याहि मृत्युतिथीसंबंधानें वाद आहे. तरी पण बाराव्या शतकाच्या उत्तरार्धांत त्यानें आपली कामगिरी केली, असें म्हणण्यास हरकत नाहीं. हा जातीचा तेलगू ब्राह्मण होता. त्यानें वासुदेवाच्या पूजेला एक दुसरीच दिशा लावली. विष्णु आणि लक्ष्मी किंवा कृष्ण आणि रुक्मिणी बाजूला ठेवून निंबार्कानें राधाकृष्णाच्या पूजेला विशेष महत्त्व आणलें.

२६९. त्याच्यानंतर पंधराव्या शतकाच्या अखेरीस व सोळाव्या शतकाच्या आरंभीं वल्लभाचार्य व चैतन्य यांनी ह्या राधाकृष्णाच्या पूजेचा आणखीहि विकास केला. होतां होतां कृष्णापेक्षां राधेचीच पूजा जास्त होऊं लागली. आणि ती साहजिक होती. बौद्ध आणि जैन श्रमणपंथ एवढे त्यागी असतां सुखवस्तु झाल्याबरोबर तंत्रयानांत शिरले, मग कृष्णभक्त सोवळे कसे राहतील? कृष्णाच्या आणि गोपींच्या क्रीडा गुप्तांच्या वेळींच वरिष्ठ वर्गांत प्रिय होत चालल्या होत्या, व सामान्य वर्गांतहि त्यांचा ध्वनि उठूं लागला होता; मग त्या वासुदेवाच्या भक्तीवर उभारलेले हे पंथ स्त्रियांच्या बाबतींत नीतिमान् रहाणें शक्यच नव्हतें. त्यांनी उघड रीतीनें राधेला पुढें आणलें, व त्या पायावर आपलें तत्त्वज्ञान स्थापित केलें. त्याचा जो परिणाम व्हावयाचा तो झालाच. तरी त्यांच्यांत आणि श्रमण-पंथांत हा फरक होता कीं, श्रमणांच्या तत्त्वज्ञानाचा आणि तांत्रिक आचरणाचा मेळ नसे. पण ह्या राधाकृष्ण वैष्णव संप्रदायांतील लोकांच्या आचरणाचा आणि तत्त्वज्ञानाचा फारसा विरोध नव्हता.

## रामानंदी व वारकरी पंथ

२७०. सर्व वैष्णव पुढाऱ्यांत सामान्य जनतेविषयीं कळकळ

बाळगणारा असा पहिला पुढारी म्हटला म्हणजे रामानंद होय. रामानंद १२९९ किंवा १३०० सालीं प्रयाग येथें जन्मला. तो एकशें अकरा वर्षें जगला होता असें म्हणतात. म्हणजे तो १४११ सालीं मरण पावला असें समजण्यांत येतें. रामानंदाचा विशेष हा कीं, त्यानें आपल्या शिष्यवर्गात सर्व जातींचा समावेश केला. त्याच्या शिष्यशाखेंत सर्वांत पुढें आलेला सुप्रसिद्ध संत कबीर हा जातीनें मुसलमान कोष्टी होता. दुसरी रामानंदाची मोठी कामगिरी म्हटली म्हणजे त्यानें वासुदेव कृष्णाला आणि गोपींना बाजूला गुंडाळून ठेवून एकपत्नीव्रती रामाला पुढें आणलें.

२७१. रामानंदाच्या ह्या प्रयत्नांचा सुपरिणाम महाराष्ट्रापर्यंत पोंचला असावा. पंढरपूरचा विठोबा वासुदेव कृष्ण खरा, तरी पण त्याच्या मागें गोपींचें लफडें न रहातां तो नुसता रुक्मिणीचा पति बनला. ह्या महाराष्ट्रीय वैष्णव संप्रदायांतहि नामदेव-तुकारामासारखे संत पुढें आले; आणि त्यांनीहि आपली सर्व ग्रंथरचना सामान्य जनतेच्या भाषेंत केली.

२७२. उत्तरेकडील रामानंदी संप्रदाय व दक्षिणेकडील वारकरी संप्रदाय अशा या दोन वैष्णव संप्रदायांच्या उपदेशाचा आणि बुद्धाच्या उपदेशाचा पुष्कळच मेळ दिसतो. बुद्धाचा उपदेश सामान्य जनतेसाठीं असल्यामुळें तो त्यानें चालू भाषेंत केला; तसाच या संप्रदायांतील साधुसंतांनीहि आपला उपदेश चालू भाषेंत केला. बुद्धाची जी प्राणिमात्राविषयींची कळकळ, तशीच ती या संतांचीहि दिसून येते. बुद्धानें जसे ब्राह्मणांच्या आढ्यतेवर हल्ले चढवले, तसेच ते यांनीहि चढवले. इतकेंच नव्हे, साधनांच्या बाबतींतहि बुद्धानें जसें सत्संगाला महत्त्व दिलें, तसें तें यांनीहि दिलें. उदाहरणादाखल साधूंच्या संगतीविषयीं बौद्ध वाङ्मयांत सांपडणारा थोडासा काव्यात्मक उपदेश येथें देतों.

२७३. "एके समयीं भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथ पिंडिकाच्या आरामांत रहात असतां संतांचें गुणगान करणाऱ्या वर्गापैकीं ( सतुल्लपकायिका ) कांहीं देवता त्याजपाशीं आल्या, व त्यांतील एका देवतेनें ही गाथा म्हटली—

> सब्भिरेव समासेथ सब्भि कुब्बेथ संथवं ।
> सतं सद्धम्ममञ्ञाय सेय्यो होति न पापियो ॥

( संतांबरोबरच रहावें आणि संतांचीच संगति धरावी. संतांचा सद्धर्म जाणून कल्याण होतें, नुकसान होत नाहीं. )

२७४. "दुसऱ्या देवतेनें हीच गाथा म्हटली; मात्र तिचा चौथा चरण असा—"पञ्ञं लभति नाञ्ञतो. त्याचा अर्थ असा— संतांचा सद्धर्म जाणून प्रज्ञा मिळते; ती दुसऱ्या मार्गानें मिळत नाहीं. तिसऱ्याहि देवतेनें हीच गाथा म्हटली; मात्र चौथा चरण असा–सोकमज्झे न सोचति. त्याचा अर्थ–संतांचा सद्धर्म जाणून शोक करणाऱ्या दुनियेंत मनुष्य शोकाकुल होत नाहीं. चौथ्या देवतेनें पण हीच गाथा म्हटली; मात्र तिचा चौथा चरण असा— ञातिमज्झे विरोचति. त्याचा अर्थ—संतांचा सद्धर्म जाणून मनुष्य आपल्या ज्ञातिवर्गांत प्रकाशतो. पांचव्या देवतेनेंहि हीच गाथा म्हटली; मात्र तिचा चौथा चरण असा—सत्ता गच्छन्ति सुगतिं. याचा अर्थ—संतांचा सद्धर्म जाणून प्राणी स्वर्गाला जातात. सहाव्या देवतेनें हीच गाथा म्हटली; पण तिचा चौथा चरण असा—सत्ता तिट्ठन्ति साततं. त्याचा अर्थ—प्राणी चिरकाल सुखी होतात.

२७५. "त्यानंतर त्या देवतांनी भगवंताला विचारलें कीं, त्यांच्यापैकीं सुभाषित कोणाचें ? भगवान् म्हणाला, 'पर्यायानें सर्वांचेंच सुभाषित आहे. परंतु माझें म्हणणेंहि ऐका—

सब्भिरेव समासेथ सब्भि कुब्बेथ संथवं ।
सतं सद्धम्ममञ्ञाय सब्बदुक्खा पमुच्चति ॥'

येथें चौथ्या चरणाचा अर्थ—प्राणी सर्व दुःखापासून मुक्त होतो.[1]"

२७६. 'संगति कीजै साधुकी हरै और की व्याधि ।'
इत्यादिक कबीराच्या वचनांशीं, आणि—

'धन्य आजि दिन । झालें संतांचें दर्शन ॥ १ ॥
जाली पापा तापा तुटी । दैन्य गेलें उठाउठी ॥ २ ॥
झालें समाधान । पायीं विसावलें मन ॥ ३ ॥
तुका म्हणे आले घरा । तोचि दिवाळी दसरा ॥ ४ ॥'

इत्यादिक तुकारामाच्या अभंगांशीं, व त्या काळच्या इतर साधुसंतांच्या अशा प्रकारच्या वचनांशीं वरील उताऱ्याची तुलना केली असतां असें वाटूं लागतें कीं, या संतमंडळीनें सत्संगतीची कल्पना बौद्ध वाङ्मयांतूनच घेतली असावी.

२७७. परंतु बिचाऱ्या संतांना बुद्धाची कल्पना बेताबाताचीच होती.

वे कर्ता नहिं बौद्ध कहावे नहीं असुर को मारा ।
ज्ञानहीन कर्ता भरमे माया जग संहारा ॥

या वचनावरून कबीराला विष्णुपुराणांतील बौद्ध अवतार माहीत होता असें दिसतें. कबीर काशीमध्यें रहात असल्याकारणानें त्याला एवढें तरी माहीत होतें. परंतु तुकोबाला हेंहि माहित नव्हतें. बौद्ध अवतार म्हटला म्हणजे नुसता मुका, ही त्याची कल्पना! बौध्य अवतार माझिया अदृष्टा। मौन्य मुखें निष्ठा धरियेली ॥

---

१ देवतासंयुत्त, सतुल्लपकायिक वग्ग, सुत्त १ पहा.

२७८. बुद्धानें पंचेचाळीस वर्षेपर्यंत बहुजनहितासाठीं उपदेश केला, हें आमच्या तुकोबाला किंवा कबीराला समजावें कसें? पुराणांच्या गहन अरण्यापलीकडे त्यांची दृष्टि कशी पोंचणार ? तर मग ह्या साधुसंतांच्या वचनांत भूतदयेचे, सर्व लोकांना समतेनें वागवण्याचे, संतसंगतीच्या गुणवर्णनाचे बौद्ध वाङ्मयांत सांपडणारे जे उद्गार सांपडतात, ते आले कोठून ? याला उत्तर हेंच कीं, सामान्य जनतेंतून बुद्धोपदेशाचें बीज समूळ नष्ट झालें नव्हतें; कोणत्याना कोणत्या रूपानें तें अस्तित्वांत होतें; आणि त्याचीच वाढ अनेक रीतींनी या साधुसंतांनी केली. मात्र त्यांना आपला उपदेश राम आणि कृष्ण या दोन अवतारांच्या आधारें करावा लागला. त्यामुळें त्यांच्या उपदेशांत व दैवतांत मेळ राहिला नाहीं.

२७९. सिरजनहार न ब्याही सीता जल पाषाण नहिं बंधा।
वे रघुनाथ एकके सुमिरे जो सुमिरै सो अंधा ॥

ह्यांत रामानें सीतेशीं लग्न केलें, सेतु बांधला इत्यादि सर्व गोष्टी खोट्या आहेत असें कबीर म्हणतो. तथापि रामायण कायमच राहिलें; व तुलसीदासानें हिन्दी अनुवाद करून त्याचा आणखीहि प्रसार केला. महाराष्ट्र संतमंडळानें विठोबाला जरी एकच रखमाई बायको ठेवली, तरी भागवत कायम राहिलेंच; आणि राधा व इतर गोपी तशाच राहून गेल्या. तात्पर्य काय कीं, कोणत्याहि संताच्या अंगीं पुराणाचें समूळ उच्चाटन करण्याचें सामर्थ्य नव्हतें. त्यांनी दुधाची तहान कशी बशी ताकावर भागवून घेतली म्हणावयाची !

२८०. या संतमंडळाचा काळ म्हटला म्हणजे मानवी संकटांचा होता. मुसलमान राजांना हिंदुस्थानाविषयीं मुळींच आदर

नव्हता. कारण हिंदु लोक म्हटले म्हणजे काफिर, हरामखोर, त्यांच्यावर दया ती काय करावयाची? तेव्हां त्यांच्या कारकीर्दीत जाळपोळ, लुटालूट आणि बायकांपोरांसकट सर्वांची कत्तल, या गोष्टी सर्वसाधारण होत्या; आणि त्यामुळें वारंवार देशांत दुष्काळ पडत असत. मुसलमानांच्या संसर्गानें हा रोग रजपुतांनाहि जडला. मुसलमानांचे हल्ले आले असतां आजूबाजूचीं गांवें जाळून ते जंगलाचा किंवा डोंगराचा आश्रय धरीत असत, व तेथून मुसलमानांवर हल्ले करीत. मराठ्यांच्या कारकीर्दीत तर या रोगाची सांथ फारच फैलावली; हिंदुस्थानामध्यें लोकांच्या आपत्तीला पारावर नाहींसा झाला. तुकाराम स्वतः अशा एका दुष्काळांत सांपडला. त्यामुळें त्याची थोरली बायको व मुलगा मरण पावला. त्याच्या साधुत्वाला कारण हाच दुष्काळ झाला हें सुप्रसिद्ध आहे.

२८१. अशा समयीं या साधुसंतांचा उपदेश लोकांच्या अल्पस्वल्प शांतीला कारणीभूत झाला असला पाहिजे. 'आलिया भोगासी असावें सादर। देवावरी भार घालूनियां॥' लूटफाट करीत आहेत, गांवें जाळीत आहेत, अशा प्रसंगीं करावें काय? तर सादर रहावें; देवावर भार घालून पोरांबाळांना घेऊन कुठें तरी दडून बसावें. दुष्काळच आला तर जेथें अन्न मिळेल त्या प्रदेशांत जाऊन रहावें. देवावर भार घातल्याशिवाय गरीब जनता दुसरें काय करूं शकली असती? अर्थात् हाच उपदेश कायतो त्या काळांत योग्य होता. काबाड कष्ट करणाऱ्या गरीब बायका शेजाऱ्यांना त्रास होऊं नये म्हणून आपल्या मुलांना बेताची अफूची गोळी देऊन काम करायला जातात. मग तीं पोरें सारा दिवस त्या गुंगीत चुपचाप पडून रहातात; त्यांना आईच्या दुधाची आठवण होत नाहीं. त्याप्रमाणें त्या काळीं

साधुसंतांच्या ह्या उपदेशानें हिंदी जनता चुपचाप सगळीं बंडाळीचीं दुःखें सहन करण्यास समर्थ झाली असावी.

२८२. पुराणें म्हणजे लढायांनी व रक्तपातांनी ओथंबलेलीं. त्यांतील कृष्णासारख्या मोठ्या दैवताला सोळा सहस्र बायका. त्याच्या कांहीं भक्तांनी तर त्याच्या बायकांना बाजूला ठेवून राधेसारख्या परस्त्रीलाच पुढें आणलें ! अशीं हीं पुराणें जोरावत चाललीं असतां मुसलमानांच्या स्वाऱ्या या देशावर येऊन थडकल्या. जणूं काय पुराणें ही त्या स्वाऱ्यांची पूर्वचिह्नेंच होतीं ! मुसलमानांनी पुराणांत लिहिलेल्या गोष्टी शक्य तितक्या अमलांत आणून दाखविल्या. लढाया, रक्तपात, जनानखाने इत्यादिक गोष्टी मूर्तिमंत दिसूं लागल्या. या संकटांत शेंकडों वर्षें हिंदी जनता सांपडली असतांहि तिच्या अंगचे कांहीं सुसंस्कार अद्यापि नष्ट झाले नाहींत. चीनशिवाय इतर देशांशी तुलना केली असतां सौम्यपणांत हिंदी जनतेचा नंबर पहिला येईल. कृष्णाला जरी हजारों बायका होत्या, तरी अद्यापि हिंदुस्थानांत एकपत्नीव्रताची किंमत जास्त आहे. मद्यपानविरतीबद्दल तर आम्ही प्रसिद्धच आहोंत. तेव्हां पार्श्वानें आणि बुद्धानें पेरलेलें सत्कर्माचें बीज आमच्यांतून अद्यापिहि नष्ट झालें नाहीं असें म्हणावें लागतें. मुसलमानांच्या कारकीर्दींत त्या बीजाची अल्पस्वल्प जोपासना करण्याचें श्रेय बहुतांशीं रामानंदी व वारकरी पंथांना देणें योग्य आहे.

## अकबराचा प्रयत्न

२८३. रामानंदी व वारकरी पंथांनी सौजन्य आणि बंधुभाव यांच्या प्रचारासाठीं पुष्कळ प्रयत्न केला खरा, तरी

आमच्यांतील संप्रदाय व जातिभेद कमी झाले नाहींत. त्यांना आळा घालण्यासाठीं अकबर बादशाहानें थोडासा प्रयत्न केला. आपल्या कारकीर्दीच्या उत्तरार्धांत ( इ० स० १५८० नंतर ) त्यानें एक दीन-इ-इलाही ( ईश्वरीय संप्रदाय ) नांवाचा पंथ स्थापन केला. ईश्वराच्या अस्तित्वाचें साक्षात् चिह्न म्हणून सूर्योपासना करावी, परंतु कोणत्याहि रीतीनें सांप्रदायिकता राहूं देऊं नये, असें या नवीन पंथाचें धोरण होतें. अकबराच्या दरबारांतील हाताच्या बोटांवर मोजण्याइतक्या अधिकाऱ्यांशिवाय इतर लोकांचें या पंथाला पाठबळ मिळालें नाहीं. कारण उघडच आहे. ह्या पंथांत पूजाअर्चेचा भाग नसल्यामुळें ब्राह्मणांची वरणी लागणें शक्य नव्हतें, व कुराणाला महत्त्व दिलें गेलें नसल्यामुळें मौलवी-मौलानांनाहि त्यापासून फायदा नव्हता.

२८४. ह्याच काळीं ब्राह्मणांचे पूर्वसंस्कार अल्लोपनिषदाच्या रूपानें पुढें आले. ह्या उपनिषदाचा कर्ता कोण व त्याला संस्कृत भाषा कितपत अवगत होती, हें सांगतां येत नाहीं. तथापि त्याच्या ह्या उपनिषदाचें ऐतिहासिक महत्त्व बरेंच असल्या-कारणानें तें समग्र येथें देत आहों.

अथाऽल्लोपनिषदं व्याख्यास्यामः । अस्माल्लां इल्ले मित्रा-वरुणा दिव्यानि धत्ते ॥ इल्लल्लेवरुणो राजा पुनर्ददुः । हया मित्रो इल्लां इल्लल्लेति ॥ इल्लाल्लां वरुणो मित्रस्तेजस्कामः ॥१॥ होतारमिन्द्रो होतारमिन्द्रो महासुरिन्द्राः । अल्लो ज्येष्ठं श्रेष्ठं परमं पूर्णं ब्रह्माणं अल्लाम् ॥ २ ॥ अल्लो रसूलमहामदरकबरस्य अल्लो अल्लाम् ॥ ३ ॥ आदल्लाबूकमेककम् । अल्लाबूकंनिखातकम् ॥ ४ ॥ अल्लो यज्ञेन हुतहुत्वः । अल्ला सूर्यचन्द्रसर्वनक्षत्राः ॥ ५ ॥ अल्ला ऋषीणां सर्वदिव्याँ इन्द्राय पूर्वं माया परममन्तरिक्षाः ॥ ६ ॥ अल्लः पृथिव्या अन्तरिक्षं विश्वरूपम् ॥ ७ ॥ इल्लाँ कबर इल्लाँ कबर

इल्लाँ इल्लल्लेति इल्लल्लाः ॥ ८ ॥ ओम् अल्ला इल्लल्ला अनादिस्वरूपाय अथर्वणीशाखां हुं ह्रीं जनान् पशून् सिद्धान् जलचरान् अदृष्टं कुरु कुरु फट् ॥ ९ ॥ असुरसंहारिणीं हुं ह्रीं अल्लो रसूलमहमदरकबरस्य अल्लो अल्लाम इल्लल्लेति इल्लल्लः ॥ १० ॥ इत्यल्लोपनिषत् समाप्ता ॥[१]

२८५. हें उपनिषद् अथर्व वेदाच्या उपनिषदांपैकीं आहे असें म्हणतात. ह्यांत बरेचसे अरबी शब्द मिसळले असल्यामुळें त्याचा अर्थ काय हें बरोबर सांगतां येत नाहीं. हा मजकूर जसा थोडा आहे, तसा त्याचा जीवनकालहि थोडाच होता असें वाटतें. अकबराच्या काळीं किंवा त्यानंतर ह्या उपनिषदावर भाष्य करावें असें कोणत्याहि पंडिताच्या मनांत आलें नाहीं. म्हणजे हें उपनिषद् उत्पन्न झाल्याबरोबरच थोडक्याच काळांत विलयाला गेलें असावें. तरी त्याचें शरीर अद्यापिहि अस्तित्वांत आहे, व त्यावरून ब्राह्मणी संस्कारांची दिशा चांगली ओळखतां येते.

२८६. इंद्रानें सिंध देश काबीज केल्याबरोबर ब्राह्मणांनी इतर देवांच्याहि वर त्याला चढवून आपलें अस्तित्व कायम ठेवलें. त्यानंतर शक आले. त्यांच्या महादेवाला वेदाचा आधार देऊन व श्वेताश्वतर उपनिषद् रचून त्यांनी आपला पुजारीपणाचा धंदा कायम ठेवला. गुप्त राजांच्या वेळीं महाभारताची वृद्धि करून व भगवद्गीता रचून त्यांनी आणखी एक नवीन दैवत आपलेंसें करून घेतलें. परंतु मुसलमानांच्या कारकीर्दीत त्यांना कोठेंच ठाव मिळेना. इतक्यांत अकबरासारखा उदार-

१ सत्यार्थप्रकाशांतून घेतलें. यांत हिंदी विश्वकोषांत दिलेल्या अल्लोपनिषदांतील कांहीं पाठ घेतले आहेत.

मनस्क राजा त्यांना सांपडला. त्या वेळीं त्यांचे पूर्वसंस्कार पुन्हा उभे राहिले; व अल्लाला मिसळून हें नवीन उपनिषद् त्यांनी तयार केलें. पण या लहानशा उपनिषदाला सगळें कुराण व अठरा पुराणें आपल्या ताब्यांत आणतां येणें शक्यच नव्हतें. अर्थात् तें जशाच्या तसें पडून राहिलें.

२८७. अकबराच्या मुसलमानी धर्मामागें कुराण मुळींच नव्हतें, व तो शकांच्या महादेवाप्रमाणें केवळ एका अल्लाला घेऊन हिंदुस्थानांत आला, अशी जरी कल्पना केली, तरी महादेव व वासुदेव यांना हटवून सर्वत्र अल्लाची स्थापना करतां आली नसती. कां कीं, वैष्णवांच्या आणि शैवांच्या मंदिरांपासून होणारी प्राप्ति सोडण्यास ब्राह्मण तयार झाले नसते. बुद्धाच्या काळीं जसा ब्रह्मा जगाचा आदिकर्ता झाला, शकांच्या राजवटींत जसा महादेव आदिकर्ता झाला, व गुप्तांच्या कारकीर्दींत जसा वासुदेव आदिकर्ता झाला, तसा मुसलमानी राजवटींत अल्ला जगाचा आदिकर्ता झाला असता; जगाचे तीन आदिकर्ते होते, त्यांत ह्या चौथ्याची भर पडली असती, एवढेंच कायतें. तात्पर्य मुसलमानी कारकीर्दींत पुराणांच्या पाशांतून मुक्त होणें हिंदी जनतेला मुळींच शक्य नव्हतें.

---

# विभाग चौथा

# पाश्चात्य संस्कृति

## ग्रीक व रोमन लोक

१. पाश्चात्य संस्कृतीचा पाया ग्रीक लोकांनी घातला. इजिप्त आणि बाबिलोनिया येथील हजारो वर्षें चालत आलेल्या साम्राज्यशाह्या संपुष्टांत आल्यावर ग्रीक लोकांचा उदयकाळ सुरू झाला. त्यांत विशेष हा होता कीं, ग्रीक लोकांमध्यें सार्वभौम राजाची पूजा राहिली नाहीं/ सामान्य जनतेला राजाच्या मदतीवांचून राज्य करतां येतें, हें इतिहासांत प्रथमतः ग्रीक लोकांनीच सिद्ध करून दाखविलें असें म्हणतां येईल. त्यांच्यामध्यें दास पुष्कळ होते; आणि ह्या दासांना आपल्या मालकांप्रीत्यर्थ काबाडकष्ट करावे लागत. हा जरी ग्रीक लोकांच्या संस्कृतींत मोठाच दोष होता, तरी मध्यमवर्गीय सामान्य माणसाला देखील आपले पुढारी निवडण्याचा हक्क त्यांनीच प्रथमतः शाबीत केला.

२. आमच्या इकडे वज्जी, मल्ल, इत्यादिकांचीं गणसत्ताक राज्यें बुद्धाच्या वेळीं अस्तित्वांत होतीं. तरी त्यांची बरोबरी ग्रीक प्रजासत्ताक राज्यांशीं करतां येत नाहीं. ह्या गणसत्ताक राज्यांत दास तर होतेच, पण त्याशिवाय मध्यमवर्गांतील

लोकांनाहि राज्यशासनाचे हक्क मुळींच नव्हते. एका किंवा अनेक गांवचे सर्वाधिकारी जमीनदार—ज्यांना राजे म्हणत—एकत्र होऊन आपणांपैकीं एक महाराजा निवडीत, व त्याच्या अनुरोधानें आपलें राज्य चालवीत. विशेष प्रसंगीं महाराजाला सर्व राजांची अनुमति घ्यावी लागत असे. शाक्यांचें राज्यहि अशाच प्रकारचें होतें. परंतु त्यांना वज्जींप्रमाणें किंवा मल्लांप्रमाणें सर्वाधिकार नव्हते. कोसलराजानें शाक्यांचा पराजय करून हे अधिकार आपल्या हातांत घेतले होते. कोणाला फांशी द्यावयाचें किंवा हद्दपार करावयाचें असेल, तर त्यासाठीं कोसलराजाची परवानगी घ्यावी लागत असे. बाकीच्या बाबतींत शाक्यांना होमरूलचे अधिकार होते.

३. ग्रीसमधील प्रजासत्ताक राज्यें याहून फारच भिन्न तऱ्हेचीं होतीं. एक शहर व त्याच्या आजूबाजूचा प्रदेश यांतील मध्यमवर्गीय सर्व लोकांना आपले पुढारी निवडण्याचा पूर्ण अधिकार होता. याशिवाय दुसरा एक मोठा भेद हा कीं, आमच्या गणसत्ताक राज्यांच्या संघटनेचा इतिहास विस्तृतपणें ठेवण्यांत आला नाहीं. गणसत्ताक राजे होते, व वर सांगितल्याप्रमाणें त्यांची संघटना असावी, असें बौद्ध आणि जैन वाङ्मयांत सांपडणाऱ्या त्यांच्या उल्लेखांवरून दिसून येतें. पण हे राजे कोणत्या वेळीं एकत्र होत, मतदान कशा रीतीनें करीत, महाराजाला कसें व किती वर्षांसाठीं निवडीत, यासंबंधी माहिती कोठेंच सांपडत नाहीं. पण ग्रीक लोकांचें वाङ्मय त्यांच्या प्रजासत्ताक राज्यांच्या वर्णनानें भरलें आहे. हीं राज्यें आपला कारभार कसा चालवीत, हें तर त्यांत आहेच; पण आणखी एक विशेष हा कीं, त्या काळच्या परिस्थितींत नमुनेदार प्रजासत्ताक राज्याची कशी स्थापना करावी, ही देखील कल्पना त्यांत सांप-

डते. यासंबंधीं प्लेटोचें रिपब्लिक प्रसिद्धच आहे; आणि ज्यांना पाश्चात्य संस्कृतीचें ज्ञान करून घ्यावयाचें असेल, त्यांना ह्या ग्रंथाचें वाचन अत्यावश्यक आहे.

४. ग्रीक लोकांनी केवळ प्रजासत्ताक राज्यें स्थापण्यांतच नव्हे, तर कलाकौशल्याच्या, तत्त्वज्ञानाच्या व शास्त्रीय शोधांच्या बाबतींतहि फार आघाडी मारली होती. पण कालान्तरानें ग्रीक लोकांचा अस्त व रोमन लोकांचा उदय होत गेला. रोमन लोक ग्रीक लोकांइतके बुद्धिमान् खात्रीनें नव्हते. ग्रीक लोकांना त्यांनी पकडून आणून आपले दास केलें. पण हे दासच त्यांचे गुरु बनले ! कलाकौशल्य, तत्त्वज्ञान इत्यादि जें काहीं रोमन लोक शिकले, तें ह्या दासांपासूनच. ह्या रोमन लोकांचे हाडवैरी म्हटले म्हणजे कार्थेजमधील लोक. भूमध्य समुद्राच्या स्वामित्वा-साठीं त्यांच्यांत व ह्यांच्यांत पुष्कळ लढाया झाल्या; आणि अखेरीस त्यांत रोमचा विजय झाला. हळू हळू रोमन बाद-शाहीचा मोठा विस्तार होत गेला, तरी रोममध्यें प्रजासत्ताक पद्धतीच अमलांत होती. आजला इंग्लंडांत किंवा फ्रान्सांत एक प्रकारची प्रजासत्ताक पद्धति सुरू असतां हिंदुस्थानांत आणि इंडोचायनांत जशी ह्या लोकांची सत्ता अरेरावीची आहे, त्याच-प्रमाणें रोमन लोक रोममध्यें प्रजासत्ताक पद्धतीनें चालत असतां बाहेरच्या प्रदेशांवर अरेरावीच करीत असत.

५. परंतु ही अरेरावी त्यांना बाधल्याशिवाय राहिली नाहीं. तिचा परिणाम खुद्द रोममध्येंच साम्राज्यशाही स्थापण्यांत झाला. तरी पण रोमन प्रजासत्ताकपद्धतीच्या कारकीर्दींत विकास पावलेला रोमन कायदा बाकी राहिला. ह्या रोमन कायद्याची अद्यापि चहा होत आहे; आणि त्यापासूनच पाश्चात्य राष्ट्रांतील बहुतेक आधुनिक कायद्यांचा विकास झाला आहे.

## युरोपची सुधारणा

६. रोमन बादशाही मोडकळीस आल्यावर ख्रिस्ती धर्माचा उदयकाळ सुरू झाला. तरी रोमन बादशाहीचें वजन लोकांवर कायम होतें. या रोमन बादशाहीचा पुरस्कर्ता पोप होऊन बसला. तो ह्या राजाला किंवा त्या राजाला बादशाही वस्त्रें देऊन ह्या रोमन साम्राज्याचें सोंग कायम ठेवीत असे. पण ह्या मध्ययुगांत युरोपमध्यें अंदाधुंदीच माजून राहिली होती. त्यांत विशेष एवढाच होता कीं, ख्रिस्ती पाद्र्यांकडून धर्मोपदेशाच्या द्वारें लोकांना थोडेंबहुत ज्ञान मिळत होतें.

७. अशा तमोयुगांत युरोप सांपडलें असतां मोंगल लोकांच्या स्वाऱ्या त्याच्यावर होऊं लागल्या; व त्यानंतर तुर्कांनी तर पूर्वेकडील युरोप आणि खुद्द ख्रिश्चन ग्रीक बादशाही व्यापून टाकली. सोळाव्या शतकाच्या आरंभीं वर वर पहाणाऱ्याला असें वाटणें साहजिक होतें कीं, लवकरच सर्व जग मंगोलियन किंवा मुसलमान बनणार आहे.[१]

८. परंतु युरोपमध्यें आंतरिक सुधारणेला तेराव्या शतकांतच आरंभ झाला होता. त्याला मुख्य कारण म्हटलें म्हणजे पुन्हा जिकडे तिकडे नवीन शहरांचा उदय हें होय. इटलीमध्यें व्हेनीस, जिनोवा, पीसा, फ्लॉरेन्स इत्यादि शहरें उदयाला आलीं. आणि ही पद्धति वाढत जाऊन सर्व युरोपभर फैलावली. हीं शहरें म्हटलीं म्हणजे व्यापारावर पोसावयाचीं. त्यांचा सगळा व्यापार कांस्टांटिनोपलच्या मार्गानें चालत असे; व त्यांतील रहिवाशांना हिंदुस्थान आणि चीन या देशांची मुळींच माहिती नव्हती.

---

१ The Outline of History, p. 491 पहा.

९. निकोलो पोलो आपला भाऊ माफियो व मुलगा मार्को यांना बरोबर घेऊन व्हेनीसहून निघाला व दोन तीन वर्षें प्रवास करून इ० स० १२६० च्या सुमारास चीनमध्यें कुबलाई खानाच्या दरबारांत पोंचला. ह्या पोलोंनी चिनांत तीस बत्तीस वर्षें घालविलीं. येतांना एका राजकन्येबरोबर पर्शियाला येऊन ते इ० स० १२९५ सालीं व्हेनीसला पोंचले. त्यांचीं चीनच्या दरबारचीं वर्णनें ऐकून लोकांनी त्यांची गणना विलक्षण गप्पीदासांत केली. पण आपल्या कोटांत छपवून आणलेलें जड-जवाहीर जेव्हां त्यांनी आपल्या आप्तांसमोर मांडलें, तेव्हां कोठें लोकांना त्यांच्या गोष्टींत अल्पस्वल्प तथ्य असावें, असें वाटूं लागलें. तरी पण मार्कोला लोकांनी 'लक्षकार' ( लक्षांनीच बोलणारा ) हें नांव थट्टेनें ठेवलेंच होतें !

१०. इ० स० १२९८ मध्यें व्हेनीसच्या व जिनोवाच्या लोकांत एक मोठी आरमारी लढाई झाली, व तींत व्हेनीसच्या लोकांचा पाडाव झाला. जिनोवाला जे व्हेनीसचे कैदी नेण्यांत आले, त्यांत मार्को पोलोहि होता. तेथें त्यानें आपलें प्रवासवृत्त रुस्तिसियानो (Rusticiano) यास निवेदन केलें. रुस्तिसियानोनें त्याचा संग्रह करून जो ग्रंथ लिहिला तो 'मार्को पोलोच्या सफरी' या नांवानें प्रसिद्धीला आला, व त्या काळीं तो बुद्धिमान् लोकांना फारच प्रिय झाला.

११. पोलोंच्या या प्रवासामासून युरोपला तात्कालिक फायदा म्हटला म्हणजे लाकडी ठशांनी छापण्याची कला, बंदुकीची दारू व होकायंत्र या तीन गोष्टींचा होय. या तीन वस्तु मार्को पोलोनेंच चीनमधून आणल्या अशी समजूत आहे. पण तिजविषयीं बराच मतभेद दिसतो. कांहीं असो, युरोपला या वस्तु पोलोच्या प्रवासानंतर माहीत झाल्या हें खास.

१२. होकायंत्रामुळें समुद्रकांठच्या शहरांतून व्यापारी दळणवळणाला फारच मदत झाली. परंतु दुसरा ओटोमन सुलतान महंमद यानें १४५३ सालीं कांस्टांटिनोपल शहर काबीज केल्यामुळें दार्दनेल सामुद्रधुनींतून चालणारा व्यापार बंद पडत चालला, आणि भूमध्यसमुद्रावरील शहरांना आपला व्यापार ॲटलांटिक महासागराकडे वाढविणें भाग पडलें. मार्को पोलोच्या प्रवासवर्णनाचा तर एकसारखा प्रसार होतच चालला होता; आणि त्यामुळें भूमध्यसमुद्रावर व ॲटलांटिक महासागरावर व्यापार करणाऱ्या व्यापाऱ्यांच्या तोंडाला पाणी सुटणें साहजिक होतें. तरी पण हिंदुस्थानाकडे जाणारा मार्ग समुद्रांतून सांपडेल असें कोणालाहि वाटलें नव्हतें.

१३. परंतु पोर्तुगीज नावाडी दीयाज् (Diaz) ह्यानें १४८६ सालीं केप ऑफ गुडहोपला वळसा घातला. त्यानंतर सहा वर्षांनी म्हणजे १४९२ सालीं कोलंबस आपलीं लहानशीं तीन जहाजें घेऊन अमेरिकेला जाण्यास निघाला. पश्चिमेच्या बाजूला हिंदुस्थान असावें, अशी त्याची ठाम समजूत होती. बिचाऱ्यानें आपल्या प्रवासाच्या कामीं मदत मिळविण्यासाठीं पोर्तुगीज, स्पॅनिश आणि इंग्लिश दरबारांत खटपट केली. परंतु त्यापासून कांहींच फायदा झाला नाहीं. १४९२ सालीं स्पेननें ग्रानादा येथें मूर लोकांचा पराजय करून मुसलमानांना पश्चिम यूरोपमधून कायमचें हद्दपार केलें. त्यानंतर कोलंबसला पालोस नांवाच्या शहरांतील कांहीं व्यापाऱ्यांनी तीन जहाजें देऊन पश्चिमेच्या सफरीस पाठविलें. त्या सगळ्यांत सांता मारिया हें मोठें जहाज शंभर टनांचें होतें, आणि दुसरीं दोन नुसत्या पन्नास टनांच्या फतेमाऱ्या होत्या. असल्या या जहाजांतून प्रवास करून १४९३ सालीं कोलंबस सुखरूपपणें परत आला;

व त्यानें आपण हिंदुस्थानचा शोध लावला असें जाहीर केलें. त्यानें ज्या बेटांचा शोध लावला, त्यांना अद्यापिहि पश्चिम हिंदुस्थान (West Indies) म्हणतात.

१४. इकडे १४९८ सालीं वास्को-दा-गामा यानें केप ऑफ गुडहोपवरून कालिकोटपर्यंत प्रवास करून खऱ्या हिंदुस्थानचा शोध लावला, व जिकडे तिकडे पोर्तुगीज लोकांचीं व्यापारी ठाणीं स्थापण्यास आरंभ केला. जवळ जवळ एक शतकभर हिंदुस्थानाचाच नव्हे, तर मलाया वगैरे पूर्वेकडील देशांचा व्यापार पोर्तुगीज लोकांच्याच हातीं होता.

१५. तिकडे स्पेनमधील धाडशी लोकांनी दक्षिण अमेरिकेंत एकसारखी धुमाकूळ सुरू केली होती. त्यांत स्पेनच्या राजाला हात घालणें भाग पडलें. तेणेंकरून दक्षिण अमेरिकेंत थोडीबहुत शांतता स्थापित झाली; आणि तेथील संपत्ति-लाभानें स्पेनचे राजे, सरदार व इतर व्यापारी एकदम अतिशय धनाढ्य बनले. सर्व पश्चिम यूरोपच्या डोळयांत त्यांची संपत्ति सलूं लागली; व व्यापारी चढाओढीला सुरुवात झाली.

१६. पोर्तुगीजांनंतर डच लोकांनी पूर्वेकडील व्यापार हस्तगत करण्याचा प्रयत्न चालविला; आणि सतराव्या शतकाच्या आरंभीं त्यांनी जवळ जवळ पोर्तुगालचा व्यापार संपुष्टांत आणला म्हणण्यास हरकत नाहीं. त्याच काळीं, म्हणजे १६०० सालीं डिसेंबरच्या ३१ तारखेला इंग्लंडांत ईस्ट इंडिया कंपनी स्थापन झाली; व इंग्रजांनी अतिशय चिकाटीनें आपला व्यापार वाढविण्यास आरंभ केला. प्रथमतः राजकारणांत पडण्याचा त्यांचा मुळींच विचार नव्हता. परंतु आपल्या व्यापाराच्या संरक्षणासाठीं जागजागीं किल्ले बांधून व्यापारी ठाणीं बसवणें त्यांना भाग पडलें. इतक्यांत फ्रेंचांनी सन १६६४ सालीं अशीच

एक ईस्ट इंडिया कंपनी स्थापन करून हिंदुस्थानांत आपलें घोडें पुढें दामटण्याचा घाट घातला. अर्थात् त्यांच्यामध्यें व इंग्रजांमध्यें एक प्रकारची चुरस लागली आणि मत्सर वाढत गेला.

## इंग्रजांचा विजय

१७. इतिहासकारांचें म्हणणें असें कीं, डुप्लेला जर फ्रेंच सरकारचा पाठिंबा मिळाला असता, तर इंग्रजांना हिंदुस्थान सोडून जावें लागलें असतें, व येथें फ्रेंचांचेंच राज्य स्थापन झालें असतें. तुपांत तळलें किंवा तेलांत तळलें, तरी तें माशाला सारखेंच. त्याप्रमाणें फ्रेंचांचें राज्य झालें काय, कीं इंग्रजाचें राज्य झालें काय, हिंदुस्थानाला तें सारखेंच होतें. अर्थात् हिंदी जनता त्याबद्दल बेफिकीर राहिली. उत्तरोत्तर फ्रेंच व इंग्लिश यांमधील चुरस वाढत जाऊन प्लासीच्या लढाईनंतर (१७५७) हिंदुस्थानांत इंग्रजी राज्याचा पाया सुदृढ झाला. कधीं या राजाची तर कधीं त्या राजाची तरफदारी करतां करतां सर्व हिंदुस्थान इंग्रजांना लाभला. तरी त्यांची राज्यतृष्णा तृप्त होईना. त्यांचें सार्वभौमत्व कबूल करणारीं संस्थानें खालसा करण्याचाहि त्यांनी सपाटा चालविला; व त्यांच्या ह्या लोभाचें पर्यवसान १८५७ सालच्या बंडांत झालें.

१८. इंग्रजांना हीं सगळीं संस्थानें ताब्यांत घेतां आलीं असतीं, तर हिंदुस्थानचा फार फायदा झाला असता. अर्धमेले संस्थानिक जाऊन त्या ठिकाणीं इंग्रजांची सत्ता स्थापित झाल्यानें व्यापारउद्योगाची वाढ होऊन पाश्चात्य संस्कृतीची माहिती हिंदुस्थानांतील सर्व नागरिकांना एकसारखी होण्यास फार मदत झाली असती. आजला हिंदुस्थानच्या प्रगतीच्या मार्गांत

हीं संस्थानें म्हणजे मोठे धोंडे आहेत, असें सर्व सुशिक्षितांना वाटत आहे; आणि सोशॅलिस्ट तर त्यांच्या निर्मूलनासाठीं उत्सुक दिसत आहेत. परंतु लॉर्ड डलहौसीच्या वेळीं 'संस्थानें म्हणजे हिंदी संस्कृति आहे' असें लोकांस वाटत होतें; व त्यामुळें हिंदी शिपाई मोडकळीस येत चाललेल्या या संस्थे-साठीं लढण्यास तयार झाले. त्याचा परिणाम असा झाला कीं, इंग्रज घाबरून गेले; व ह्या मरत चाललेल्या संस्थेला तशाच अर्धवट मृतावस्थेंत ठेवणें त्यांना इष्ट वाटलें! ईस्ट इंडिया कंपनीचा कारभार आटोपला, आणि सत्ता व्हिक्टोरिया महा-राणीच्या हातीं गेली ( म्हणजे तिच्या नांवानें पार्लमेंट कारभार पाहूं लागलें. ) व सरते शेवटीं तिला १८७७ सालीं हिंदुस्थानची सम्राज्ञी बनवून शिल्लक राहिलेल्या संस्थानिकांना इंग्रजांनी कायमचें आपल्या राज्ययंत्राला जखडून टाकलें. संस्थानिक नामधारी महाराजे, त्यांनी आपल्या प्रजेला पाहिजे तर वाटेल तसें वागवावें; पण जरा वर डोकें काढण्यास आरंभ केला, तर तें ठेंचण्यास रेसिडेंट टपलेलाच असावयाचा!

१९. क्लाइव्ह आणि हेस्टिंग्स यांनी चालविलेली लुटालूट व ठकबाजी तशीच चालू राहिली असती, तर हिंदुस्थानांत इंग्रजांचा कारभार अत्यंत दुःसह झाला असता. परंतु इंग्रजांच्या सुदैवानें त्याच वेळीं अमेरिकन संस्थानें स्वतंत्र होण्याच्या खट-पटीस लागलीं. त्यामुळें पार्लमेंटांतील प्रागतिक पक्षानें क्लाइव्ह-वर कडक टीका करून त्याला दोषी ठरविलें. क्लाइव्हनें १७७४ सालीं आत्महत्या केली. दुसऱ्याच वर्षी अमेरिकन संस्थानांनी बंडाचा झेंडा उभारला; व त्यानंतर १७७६ सालच्या जुलै महि-न्याच्या चौथ्या तारखेस स्वातंत्र्याचा प्रसिद्ध जाहीरनामा (Declaration of Independence) काढला. हें युद्ध सात

वर्षें चाललें; व सरते शेवटीं अमेरिकन संस्थानांचें स्वातंत्र्य इंग्रजांना कबूल करावें लागलें. हा धडा जर त्यांना मिळाला नसता, तर हिंदुस्थानांत त्यांनी खात्रीनें कहर करून सोडला असता. तरी पण अमेरिकेंतील गोरे लोक व हिंदुस्थानांतील काळे लोक ह्यांत इंग्रजांना फरक दिसतच होता; व त्यामुळें वारन हेस्टिंग्सचे पुष्कळसे गुन्हे पुढें आले असतांहि इंग्लिश पार्लमेंटानें चार वर्षें चौकशी चालवून १७९२ सालीं त्याला दोषमुक्त ठरविलें.

२०. पोर्तुगीज, डच, फ्रेंच आणि इंग्लिश अशा चार युरोपियन लोकांनी हिंदुस्थानावर ताबा मिळवण्यासाठीं खटपट केली. त्यांत इंग्रज विजयी झाले, याचें कारण केवळ नशीब नसून इंग्रजांनी आपल्या देशांत घडवून आणलेली औद्योगिक क्रान्ति होय. कमजास्त प्रमाणानें पश्चिम युरोपांतील सर्व देशांत पंधराव्या शतकापासूनच औद्योगिक क्रान्तीला आरंभ झाला होता. पण तिच्यांत इंग्लंडानें आघाडी मारली. इंग्लंडांतील सरदार व मध्यमवर्गांतील श्रीमंत लोकांनी १२१५ सालीं आपल्या राजाकडून असा एक हक्क मिळवला कीं, प्रजेवर नवीन कर बसवायचे असले तर कॉमन्स आणि लॉर्ड्स या दोन सभांचीं संमति मिळवली पाहिजे. ह्याला 'माग्ना कार्ता' (Magna Charta = बडा फरमाना) म्हणतात. ह्याचा उपयोग इंग्लिश लोकांनी वारंवार केला असें नाहीं. तथापि व्यापारी क्रांतीला त्याची फार मदत झाली. त्यानंतर सोळाव्या शतकाच्या पूर्वार्धांत इंग्लडनें मार्टिन लूथरच्या पंथाचा स्वीकारकरून पोपची धार्मिक सत्ता उडवून दिली.

२१. सतराव्या शतकांत इंग्लंडांतील मध्यमवर्गीय लोकांची फार जागृति झाली. पोर्तुगाल, स्पेन व त्यांच्या मागोमाग हालंड

या देशांनी आघाडी मारल्याचें त्यांना दिसून आलें; व ह्या नवीन शर्यतींत तेहि शिरले. ह्याच वेळीं चार्ल्स राजानें युरोपांतील राजकारणांत ढवळाढवळ करून इंग्लंडची आर्थिक परिस्थिति बिकट केली. वृद्धिंगत होणाऱ्या मध्यमवर्गाला हें त्याचें कृत्य आवडलें नाहीं; व त्यामुळें पार्लमेंटाचा व त्याचा झगडा सुरू झाला. सरते शेवटीं पार्लमेंटानें चार्ल्स राजाची चौकशी करून १६४९ सालीं त्याचा उघडपणें शिरच्छेद केला. हें कृत्य अर्थातच युरोपांतील अन्य राजांना आवडलें नाहीं. परंतु त्यांच्यामध्यें फुटाफूट असल्यामुळें व पार्लमेंटाला आपला पक्षपाती क्रॉमवेल-सारखा शूर योद्धा मिळाल्यामुळें युरोपांतील राजांना इंग्लंडला शह देणें शक्य झालें नाहीं.

२२. ह्या वेळेपासून इंग्लंडांत जेव्हां जेव्हां राजा आणि मध्यमवर्ग यांच्यामध्यें विरोध उत्पन्न झाला, तेव्हां तेव्हां मध्यम-वर्गाचा जय होऊन क्रमशः राजाचे अधिकार एकसारखे कमी होत गेले. तथापि इंग्लंडला प्रजासत्ताक राज्य स्थापणें इष्ट वाटलें नाही. वसाहती व काबीजादी यांच्यासाठीं एक नाम-धारी राजा पाहिजे होता. इतर राष्ट्रांशीं पत्रव्यवहार करण्यांत आणि वसाहतींतील व जिंकलेल्या मुलुखांतील लोकांवर पूर्ण ताबा मिळविण्यांत त्याचा उपयोग होत असे. अमेरिकेंतील संस्थानांनी जेव्हां स्वातंत्र्याचा झेंडा उभारला, तेव्हां पार्लमेंटानें तिसऱ्या जॉर्ज राजाला इरेस घातलें. त्याचा परिणाम पार्ल-मेंटाला चांगलाच भोंवला; व तेव्हांपासून अशा रीतीनेंहि राजाचा उपयोग करण्यास मध्यमवर्गीय लोक जरा कचरूं लागले. तरी हिंदुस्थान आणि इतर जिंकलेले मुलुख यांच्यासाठीं एक राजा असणें फार सोयीवार वाटल्यामुळें त्यांनी आपली राजसंस्था आजपर्यंत तशीच कायम ठेवली आहे.

२३. इ० स० १८५७ सालच्या बंडांत या राजसंस्थेचा इंग्रजांना चांगला उपयोग झाला. महाराणी व्हिक्टोरिया हिच्या नांवानें गोड गोड अभिवचनें देऊन हिन्दी लोकांचें त्यांना समाधान करतां आलें. पार्लमेंटानें कांहीं चुका करून घोटाळा उत्पन्न केला असतां अशा रीतीनें त्यांतून पळ काढण्याला इंग्रजी मुत्सुद्द्यांना ही राजसंस्था फार उपयोगी पडते. अमेरिकेमध्यें घराला आग लागली असतां बाहेर निघून जाण्याला मागल्या बाजूला लोखंडी शिड्या लावून ठेवलेल्या असतात. ज्या घरांना अशा शिड्या नाहींत, त्या घरांतील बहुतेक खोल्यांतून एक एक दोरखंड ठेवलेलें असतें. घराला आग लागली असतां खोलींतील एका लोखंडी कोयंड्याला तें टांगून त्याच्या आधारें खिडकीवाटे खालीं उतरतां येतें. इंग्लंडांतील राजसत्तेचा इंग्लिश धनिक लोकांना असाच उपयोग होतो. त्यांच्या चुकांनी जेव्हां कांहीं तरी विलक्षण प्रसंग गुदरतो, तेव्हां ह्या राजसत्तेच्या शिडीच्या किंवा दोरीच्या द्वारें ते पळ काढतात !

२४. इंग्रजांवर अलीकडच्या काळांत आलेला अशा तऱ्हेचा प्रसंग म्हटला म्हणजे वंगभंगाचा होय. लॉर्ड कर्झन यांनी राजकारणांत हिंदूंचें महत्त्व कमी करण्यासाठीं वंगभंगाची युक्ति काढली. पण त्यामुळें बंगाल्यांतच नव्हे, तर हिंदुस्थानांतील इतर प्रांतांतहि भयंकर चळवळ माजून राहिली. ही चळवळ इंग्रजांना दाबतां आली नसती असें नाहीं. परंतु युरोपच्या क्षितिजावर लढाईचीं चिह्नें स्पष्ट दिसूं लागलीं होतीं; व तिचा उदय होण्यापूर्वी वंगभंगानें उत्पन्न केलेल्या घोटाळ्यांतून पार पडणें अत्यावश्यक होतें. अशा वेळीं पंचम जॉर्ज राजाचा किती चांगला उपयोगा झाला ! त्याला दिल्लीला आणवून इंग्रजांनी वंगभंग रद्द केला, व हिंदुस्थानांत शांतता स्थापन केली.

२५. तात्पर्य, धर्मसत्ता काय कीं राजसत्ता काय, आपल्या हिताची नसेल तर मध्यमवर्गीय इंग्रजांनी तिला झुगारून देण्यास, व जेव्हां ती फायदेशीर असेल तेव्हां तिचा यथास्थित उपयोग करण्यास कधींहि कमी केलें नाहीं. युरोपियन देशांतील इतर मध्यमवर्गांवर विजय मिळवण्यास इंग्रजांना हा आपला गुण फार उपयोगी पडला.

२६. पोर्तुगाल व स्पेन या देशांतील लोक पोपच्या नादीं लागले आणि धर्मवेडे बनले; व त्यामुळें पूर्वेकडील व पश्चिमेकडील देशांतील आपलें वर्चस्व गमावून बसले. हालंड देश लहान असल्यामुळें इंग्लंडशीं स्पर्धा करतां येणें त्याला शक्य नव्हतें. फ्रान्सांत राजसत्ता बोकाळत गेली; व तिला कह्यांत आणण्यासाठीं मध्यमवर्गाला मोठीच क्रान्ति करावी लागली. एवंच युरोपांतील सर्व देश मागें पडून एक इंग्लंड देश तेवढा पुढें आला.

२७. पाश्चात्य संस्कृतीशीं आमचा संबंध इंग्रजांच्या द्वारें घडून आला, ह्यांत भवितव्यतेचा भाग फार कमी आहे. इंग्रजांनी जेव्हां हिंदुस्थानांत जिकडे तिकडे आपल्या वखारी उभारल्या, जेव्हां त्यांना उत्तरोत्तर पार्लमेंटाचें पाठबळ मिळत गेलें, आपल्या व्यापाराच्या संरक्षणासाठीं जेव्हां त्यांनी नाक्याचीं ठाणीं काबीज करून आपलें आरमार बळकट केलें, तेव्हांच एतद्देशीय राजेरजवाड्यांचा इतिहास माहित असलेल्या कोणी कार्ल मार्क्ससारख्या इतिहासज्ञानें भाकित केलें असतें कीं, शेंसव्वाशें वर्षांच्या आंत या सर्व राजेरजवाड्यांना जिंकून इंग्रज त्यांचे मालक होऊन बसतील !

२८. त्या वेळीं तसा कोणी इतिहासकार नव्हता. पण कार्ल मार्क्सनें व्यापारी क्रान्तीच्या पुढें सरदारी राजसत्ता टिकाव

धरून राहूं शकत नाहीं, हें पूर्णपणें सिद्ध करून दाखविलें आहे. सरदारी सत्तेचा नाश मध्यमवर्गाकडून होणें, ही एक इतिहासांतली अपरिहार्य गोष्ट आहे. मध्यमवर्ग जेव्हां व्यापाराच्या साधनांवर आपला ताबा मिळवतो, तेव्हां तो सरदारांवर आपलें स्वामित्व स्थापन करण्यास समर्थ होतो. याचें उत्कृष्ट उदाहरण आमच्याच इतिहासांत सांपडतें. इंग्रज लोक सहा सात हजार मैलांवरून केवळ व्यापारासाठीं इकडे येतात, व कधीं या राजाचा तर कधीं त्या राजाचा पक्ष धरून आपणच मालक होऊन बसतात. आमचे राजे लोक ऐषआरामांत लोळत पडलेले ! त्यांना स्वतःची घमेंड म्हणजे कांहीं विचारूं नका. यत्किंचित् कारणासाठीं शेजाऱ्यांशीं लढण्याला ते तयार असावयाचे ! त्यांच्या सैन्याला वेळेवर पगार क्वचितच मिळावयाचा. याच्या उलट इंग्रजांचें धोरण. त्यांना लढाई नको, पण व्यापार पाहिजे. लढाई करावयाचीच तर ती व्यापार संभाळण्यासाठीं. त्यांना अभिमान तर मुळींच नव्हता. मोंगलांच्या दरबारांत काय, कीं पेशव्यांच्या दरबारांत काय, त्यांची जी टवाळी व्हायची ती कांहीं पुसूं नका. टवाळी, अपमान, एवढेंच नव्हे तर चाबकाचा मार देखील त्यांनी आपला व्यापार वाढवण्यासाठीं सहन केला आहे ![१] व्यापारामुळें पैसा हातीं घोळत असल्यानें त्यांच्या सैन्याचा पगार कधींच तुंबून राहिला नाहीं; आणि सैन्यांतहि व्यापारांतल्याप्रमाणेंच उत्तम शिस्त असल्याकारणानें आमच्या राजांचा पराभव करणें त्यांना मुळींच कठिण गेलें नाहीं.

---

१ 'Englishmen were flouted, robbed, arrested, even whipped in the streets.' [mediaeval India, p. 306]

# ब्राह्मसमाजाचा उदय

२९. पाश्चात्य संस्कृतीची मोठी लाट इंग्रजी व्यापाराच्या द्वारें आमच्या देशावर येऊन आदळली. तिनें फ्रेंच, डच व पोर्तुगीज व्यापाऱ्यांना आपल्या पोटांत गडप करून टाकलें; व ती फैलावत जाऊन काबूलपर्यंत पोंचली. तिचा आमच्या राजकीय परिस्थितीवर तर परिणाम झालाच, आणि धार्मिक व सामाजिक परिस्थितीवरहि परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. इंग्रजांबरोबर त्यांचें बायबल व मिशनरीहि इकडे येऊं लागले. इंग्रजांच्या जयाला कारणीभूत हें बायबल असावें, असें आमच्या साध्याभोळ्या लोकांना वाटूं लागल्यास नवल नाहीं. परंतु अनेक वर्षांच्या रूढीनें अंगवळणीं पडलेल्या पौराणिक धार्मिक वृत्तींतून बाहेर निघणें त्या काळच्या लोकांना अशक्य होतें. तरी पण जे कोणी तसेच धाडसी होते त्यांनी धर्मांतर केलें; आणि बहुजनसमाज नुसता आश्चर्यचकित होऊन तटस्थ राहिला. इंग्रजांची राज्यपद्धति उत्तम, याच्याबद्दल धर्मवेड्या पंडितांनाहि शंका राहिली नाहीं. 'कायहो, इंग्रजांच्या राज्यांत काठीला सोनें बांधून वाटेल तिकडे जावें !' हें वाक्य त्या काळीं आबालवृद्धांच्या तोंडीं झालें. पण बायबलासंबंधानें पंडित-वर्गाची खात्री पटेना.

३०. अशा परिस्थितींत राजा राममोहन राय उदयास आले. बायबल जरी सर्वथैव पवित्र ग्रंथ म्हणतां आला नाहीं, तरी त्यांतील एकेश्वराची कल्पना आत्मसात् केल्यावांचून हिंदु समाजाची उन्नति होणार नाहीं, असें त्यांचें ठाम मत झालें. एकेश्वरी मताचा प्रचार बायबलच्या द्वारें केला असतां पंडित-मंडळाकडून भयंकर विरोध झाला असता. म्हणून एकेश्वराला

साधक अशीं उपनिषदांतील वाक्यें गोळा करून त्यांनी आपल्या ब्राह्मसमाजाच्या इमारतीची उभारणी केली. हिंदुस्थानांत हा प्रयत्न पहिलाच होता असें नाहीं. इंद्रानें हा देश काबीज केल्या-वर त्यालाच देवांचा राजा बनवून सिंध प्रदेशांतील ब्राह्मणांनी नवीन धर्माची उभारणी कशी केली ह्याचें वर्णन पहिल्या विभागांत आलेंच आहे. शकांचें कुलदैवत महादेव. त्याला ब्राह्मणांनी जगाचा कर्ता बनवून पुजारीपणा कसा संपादन केला, व पुनः वासुदेवालाहि महादेवाच्या पदवीला कसें चढवलें, याचीं वर्णनें तिसऱ्या विभागांत आलींच आहेत. इतकेंच नव्हे, अकबराच्या वेळीं अल्लोपनिषद् रचून अल्लालाहि फायदेशीर करून घेण्याच्या त्यांच्या प्रयत्नाचा उल्लेख आम्ही केलाच आहे. तेव्हां राममोहन रायांनी जें कांहीं केलें, तें ब्राह्मणांच्या पूर्वपरंपरेच्या फारसें विरुद्ध नव्हतें.

३१. परंतु पूर्वीच्या परंपरेंत राममोहन रायांनी मोठा फरक केला, तो हा कीं, या नवीन परमेश्वराच्या भक्तीच्या द्वारें सामाजिक परंपरा निखालस बदलून टाकण्याचा घाट घातला. इंद्र, महादेव, कीं वासुदेव जगाचा कर्ता झाला तरी ब्राह्मण त्याचे पुजारी, अतएव जातिभेदाचे मुकुटमणि होऊन राहिलेच. पण इंग्रजी समाजाप्रमाणें आमचा समाज व्हावा अशी इच्छा असल्याकारणानें राममोहन रायांनी आपल्या ब्राह्म धर्मांत जाति-भेदाला जागा ठेवली नाहीं. अर्थात् पंडितमंडळीकडून या धर्माला कडाक्याचा विरोध होणें साहजिक होतें. तरी पण सुशिक्षित लोकांत त्याचा अल्पप्रमाणानें प्रसार झालाच.

## आर्यसमाजाचा उगम

३२. ब्राह्मसमाजाच्या प्रसाराला आळा बसण्याचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे इंग्रजी भाषेच्या द्वारें इंग्लिश इतिहासाचा

अभ्यास हें होय. येथील इंग्रजी मुत्सद्द्यांत भवति न भवति होऊन शेवटीं मेकॉले साहेबाच्या आग्रहास्तव इंग्रजी शिक्षण सर्वत्र सुरू करावें असा त्या काळच्या अधिकाऱ्यांनी ठराव केला. त्याचा परिणाम हिंदुस्थानांतील वरिष्ठ वर्गावर असा झाला कीं, जो तो नोकरीच्या आशेनें इंग्रजी शिकूं लागला. ख्रिस्ती झाल्याशिवाय नोकरी द्यावयाची नाहीं, असा इंग्रजी राज्यांत निर्बंध नव्हता. किंबहुना वरिष्ठ जातींत इंग्रजी शिक्षणानें भांबावून गेलेले लोक इंग्रजी राज्याचा पाया सुदृढ करण्याला फार उपयोगी होते. पोर्तुगीजांनी लोकांना बाटवून ख्रिस्ती केल्याचा परिणाम कसा झाला, हें इंग्रजांना चांगलें अवगत होतें. तो धडा ते कधींहि विसरले नाहींत. ख्रिस्ती करून मग नोकऱ्या दिल्या असत्या, तर त्या नोकरांचा त्यांना मुळींच उपयोग झाला नसता. हिंदु समाजाच्या आंत काय चाललें आहे, हें ह्या बाटवलेल्या ख्रिस्ती लोकांकडून त्यांना समजून घेतां आलें नसतें. कां कीं, ह्या बाट्या लोकांना हिंदु समाजानें फार दूर ठेवलें असतें. त्यांच्यापेक्षां हिंदूंतील सुशिक्षित वर्ग किती तरी चांगला ! केवळ नोकरीसाठीं कां असेना, कोठें काय चाललें आहे हें जाऊन साहेबाला सांगणें जणूं काय त्याचें कर्तव्यच होतें !

३३. हिंदुसमाज जसा ख्रिस्ती लोकांना वागवी, तसाच ब्राह्मोंनाहि वागवूं लागला. कारण ब्राह्मो होण्यापासून कशाचाहि फायदा नव्हता. या नव्या परमेश्वराचें नवें मन्दिर काढून त्यांत ब्राह्मण पुजाऱ्यांची सोय झाली असती, तर महादेव, काली इत्यादि देवतांप्रमाणें त्याचीहि पूजा झाली असती. तसा कांहीं प्रकार नसल्यामुळें ब्राह्मणांना हा नवा देव सर्वथैव त्याज्य वाटला. नोकऱ्या जशा ब्राह्मोंना मिळत तशा जुन्या चालींच्या

हिंदूंनाहि मिळत. तेव्हां त्यांच्यासाठींहि या नवीन देवाचा कांहीं विशेष उपयोग नव्हता. जे लोक त्या काळीं विलायतेला जाऊन येत, व ज्यांना उघडपणें ख्रिस्ती धर्म स्वीकारण्याचें धैर्य नव्हतें, त्यांना मात्र हा ब्राह्म धर्म उपयोगी पडला. ते विलायतेहून परत आल्यावर बहिष्कृत होत, व ब्राह्म धर्माचा आश्रय धरीत. परंतु असे लोक फारच थोडे असावयाचे. तेव्हां ब्राह्म धर्माचा विशेष प्रसार होण्याला सबळ कारणें नव्हतीं हें उघड आहे.

३४. नोकरीसाठीं हिंदु लोकांना इंग्रजी विद्या शिकावी लागली. त्यावरून त्यांना असें दिसून आलें कीं, इंग्रजांचा उत्कर्ष बायबलवर अवलंबून नसून स्वदेशाभिमानावर अवलंबून आहे. इंग्रज आपल्या देशासाठीं वाटेल ती झीज सोशील. पण हिंदूंचें तसें नाहीं. फार झालें तर आपल्या धर्मासाठीं म्हणजे आपल्या जातीच्या रक्षणासाठीं हिंदु लोक स्वार्थत्याग करतील. पण देशाची कल्पना त्यांना मुळींच नाहीं. जर हिंदु लोकांत देशाभिमान जागृत केला, तर आम्हालाहि इंग्रजांप्रमाणेंच राज्य करतां येणें शक्य आहे, ही समजूत सुशिक्षित वर्गांत बळावत चालली. देशाची एकी घडवून आणण्याला एक धर्म व एक भाषा यांचीहि आवश्यकता वाटूं लागली. तेव्हां अशा परिस्थितींतून आर्यसमाज निघाला. एक देव पाहिजे आहे ना? त्याची स्थापना वेदांतूनच कां करूं नये? जातिभेद नको? त्यालाहि आधार वेदांत सांपडेलच. जें काय एक राष्ट्र बनवण्याला तुम्हाला पाहिजे आहे, तेवढेंच नव्हे तर तारायंत्र, वीज, वाफ, या सर्वांची व्युत्पत्ति वेदांतून काढतां येणें शक्य आहे. जें बायबलांत नाहीं तें सर्व वेदांत आहे. आणि वेद आमचा आहे. बायबलचा इतिहास तो काय, अवघा सहा हजार वर्षांचा!

पण आमच्या वेदाला आजला १९७२९४९०११ इतकीं वर्षें झालीं ! त्याच्यावर जर तुम्हाला देशाभिमानाची इमारत उभारतां आली नाहीं, तर तुमच्यासारखे निरुपयोगी प्राणी कोण ?

## शिवाजी आणि गणपति-उत्सव

३५. जेथें संस्कृत भाषेचा फारसा प्रसार नव्हता अशा प्रांतांत आर्यसमाजाचा विशेष प्रसार झाला. पण दक्षिणेकडील प्रांतांत त्याचा प्रसार होणें शक्य नव्हतें. देशाभिमान पाहिजे आहे खरा; परंतु तो वेदाच्याच पायावर उभारला पाहिजे, हें दक्षिणेकडील सुशिक्षित लोकांना पसंत नव्हतें. कोणत्याहि लोकप्रिय दैवताला आणि ऐतिहासिक व्यक्तीला पुढें करून देशाभिमान जागृत करतां येणें शक्य आहे, हें प्रथमतः लो० टिळकांनी सिद्ध करून दाखविलें. शिवाजी-उत्सव व गणपति-उत्सव हीं दोन साधनें त्यांनी ह्या कामीं उपयोगांत आणलीं. शिवाजी महाराष्ट्रीयांचें राज्य स्थापन करणारा, आणि गणपति पेशव्यांचें दैवत असल्यामुळें महाराष्ट्रांत बराच प्रिय झालेला. तेव्हां या दोघांनाहि पुढें आणून हिंदूंचा राष्ट्राभिमान जागृत करण्याची युक्ति लोकमान्यांनी काढली; व तिला ब्राह्मसमाज किंवा आर्यसमाज यांच्याहिपेक्षां जास्त यश आलें.

३६. या यशाचें श्रेय थोडेंबहुत इंग्रजी अधिकाऱ्यांना देणें योग्य आहे. शिवाजी-उत्सवाला आरंभापासूनच मदत केली असती, तर तो तेव्हांच थंडावला असता; व गणपतीच्या मेळ्यांची जशी हे अधिकारी आजला उपेक्षा करतात, तशी त्यांनी आरंभीं केली असती, तर ते मेळे तेव्हांच निष्फळ ठरले असते. पण इंग्रज अधिकारी सत्तावन सालच्या बंडापासून

फार संशयखोर झाल्यामुळें त्यांना 'रज्जुसर्पाकारभास' होत असतो; व जोंपर्यंत दोरी ही दोरी आहे असें वाटलें नाहीं तोंपर्यंत तिला ते बडवीत सुटतात. तसा प्रकार या दोन उत्सवांच्या बाबतींतहि झाला.

३७. कांहीं काळ गेल्यावर अधिकाऱ्यांना आपली चूक दिसून आली. त्यांनी आपण होऊन शिवाजीचा पुतळा उभारण्यास व शिवाजी मिलीटरी स्कूल स्थापन करण्यास मदत केली. त्याचा इंग्रजांना चांगलाच फायदा मिळतो आहे. गणपतीच्या उत्सवांत पांच पंधरा दिवस नाचत बागडत राहिल्यानें सामान्य जनतेचें लक्ष्य आपल्या भुकेच्या पीडेपासून आणि सध्याच्या राजकारणापासून निवृत्त होतें, हा अनुभवहि इंग्रजांना आला आहे. अर्थात् ह्या उत्सवालाहि त्यांचा मुळींच विरोध राहिला नाहीं.

३८. सामाजिक किंवा राजकीय सुधारणा करण्यांत धार्मिक गोष्टींचें मिश्रण केल्यानें फायद्यापेक्षां हानिच जास्त होते. बंगाल्यांत व दुसऱ्या प्रांतांत जातीजातींत मिश्रविवाह घडून येण्याला आणि पंक्तिभेद मोडण्याला ब्राह्मसमाजाची मुळींच आवश्यकता राहिली नाहीं; असें असतांहि ब्राह्मसमाज चालूच आहे. पंजाबांत सामाजिक आणि राजकीय सुधारणेसाठीं आर्यसमाजाची जरूरी आतां मुळींच भासत नाहीं; तरी आर्यसमाज चालूच आहे. महाराष्ट्रांत गणपति-उत्सवाचा व स्वदेशाभिमानाचा कांहींच संबंध राहिला नाहीं; तरी गणपति-उत्सव चालूच आहे, आणि त्यापायीं दरवर्षी गरीब महाराष्ट्राचे लाखो रुपये खर्चीं पडत आहेत. एका मुंबई शहरांत या उत्सवाप्रीत्यर्थ महाराष्ट्रीय दरवर्षीं जवळ जवळ तीन लाख रुपये खर्च करतात, असें एक गुजराथी तरुण म्हणाला. सहकारी पतपेढ्या काढून त्यांत

हे पैसे सांठविण्यांत आले असते, तर पठाणांपासून व इतर सावकारांपासून मुंबई शहरांतील गांजलेले महाराष्ट्रीय मजूर कधींच मुक्त झाले असते.

## महात्मा गांधींचें राजकारण

३९. दक्षिण आफ्रिकेंत निग्रो लोक पुष्कळ आहेत. परंतु त्यांना फारशी बुद्धि नसल्यामुळें त्यांच्याकडून काम उत्तम रीतीनें पार पडत नव्हतें. यासाठीं तेथील इंग्रजी वसाहत-वाल्यांनी मुदतीच्या करारानें इकडून पुष्कळ मजूर नेण्याचा सपाटा चालविला. त्या वेळीं राष्ट्रीय सभेची स्थापना झाली नसल्याकारणानें या वसाहतवाल्यांविरुद्ध नुसती तक्रार देखील करण्याला कोणी हिंदी गृहस्थ पुढें आला नाहीं. त्याचा परिणाम असा झाला कीं, आफ्रिकेंत बरेच हिंदी मजूर गोळा झाले. पांच दहा वर्षांचा करार संपल्यावर त्यांपैकीं कांहीं जण लहान सहान व्यापार आणि शेती करून तिकडेच स्थायी झाले.

४०. एका मुसलमान व्यापाऱ्याचा खटला चालवण्यासाठीं प्रथमतः गांधीजी दक्षिण आफ्रिकेला गेले; व पुढें तेथेंच त्यांनी आपला वकीलीचा धंदा चालू ठेवला. 'जे कां रंजले गांजले। त्यांसि म्हणे जो आपुले। तोचि साधु ओळखावा। देव तेथेंची जाणावा ॥' ह्या उक्तींत गोवलेला उदारपणा गांधीजींच्या अंगीं स्वाभाविकपणें असल्याकारणानें आपल्या निकृष्ट देशबांधवांचीं दुःखें त्यांना असह्य वाटूं लागलीं; व त्यांचा प्रतिकार करण्याला सत्याग्रहाच्या मार्गानें ते पुढें सरसावले.

४१. गांधीजींच्या दक्षिण आफ्रिकेंतील सत्याग्रहाला यश आलें कीं नाहीं, या वादांत शिरण्याचें मुळींच कारण नाहीं.

सर्वांना एवढें कबूल करावं लागेल कीं, राजकीय लढ्यांत सत्याग्रहाचा प्रवेश प्रथमतः गांधीजींनीच केला. त्यांच्या पूर्वी कौंट टॉलस्टॉय यांनी सत्याग्रहाची कल्पना विशद रीतीनें आपल्या ग्रंथांतून लोकांसमोर मांडलीच होती. परंतु ती गांधीजींशिवाय दुसऱ्या कोणालाहि व्यवहार्य वाटली नाहीं. गांधीजींनी टॉलस्टॉय यांच्या कल्पनेला मूर्त स्वरूप देऊन, ती व्यवहार्य आहे, असें सिद्ध करून दाखवलें आहे.

४२. महायुद्धाला सुरुवात झाल्यावर गांधीजी स्वदेशीं परत आले. 'सत्याग्रहाचा प्रयोग दक्षिण आफ्रिकेपुरता करून हिंदी लोकांचें दास्यविमोचन होणार नाहीं; हिंदुस्थानभर सत्याग्रह सुरू केला तरच हिंदुस्थानला स्वराज्य मिळेल व तेणेंकरून हिंदुस्थानची वसाहतींत आणि इतर राष्ट्रांत इभ्रत वाढेल,' अशी त्यांची समजूत होणें साहजिक होतें. पण येथें आल्यावर सत्याग्रह सुरू करण्यास त्यांना बऱ्याच अडचणी दिसून आल्या, व कांहीं काळपर्यंत सर्व राजकीय वातावरणाचें नीट निरीक्षण करून मग प्रसंगानुसार सत्याग्रह सुरू करणें योग्य वाटलें.

४३. सत्याग्रहाच्या कामीं मुख्य अडचण म्हटली म्हणजे हिंदुमुसलमानांची बेकी. १९१६ सालीं लखनौ येथें हिंदुमुसलमानांमध्यें कौन्सिलमधील जागांसंबंधानें तडजोड झाली. त्यामुळें हिंदुमुसलमानांच्या सख्याची आशा वाटूं लागली. महायुद्ध संपल्यानंतर तिकडे ग्रीक लोकांनी स्मर्नामध्यें शिरून तुर्क लोकांशीं युद्धाला सुरुवात केली. त्यांना इंग्रजांचें पाठबळ असल्यामुळें हिंदी मुसलमान इंग्रजांवर नाराज झाले, व त्यांनी खिलाफतची चळवळ सुरू केली. त्याच वेळीं इंग्रजांनी रौलॅट ॲक्ट पास करून येथल्या प्रागतिक पुढाऱ्यांनाहि नाखुष केलें.

अर्थात् ही संधि साधून गांधीजींनी सत्याग्रहाचा ओनामा घातला.

४४. इ० स० १९२० सालीं एप्रिलच्या सहा तारखेला रौलॅट ॲक्टाविरुद्ध जिकडे तिकडे सभा झाल्या. त्यांत हिंदु-मुसलमानांनी मोठ्या सलोख्यानें भाग घेतला. त्याच वेळीं पंजाबांत कांहीं असंतुष्ट माणसांनी चार पांच इंग्रजांचे खून केले. हिंदु-मुसलमानांची एकी व इंग्रजांचे खून पाहिल्याबरोबर, १८५७ सालच्या बंडाची पुनरावृत्ति होते कीं काय, असें इंग्रज अधिकाऱ्यांना भय वाटणें अगदीं साहजिक होतें. मनुष्य भयानें गांगरून गेला म्हणजे कोणते अपराध करील याचा नेम नाहीं, या सिद्धान्तानुसार पंजाबांत इंग्रज अधिकाऱ्यांनी कहर मांडला. अमृतसर येथें जालियनवाला बागेंत निःशस्त्र लोकांची जनरल डायर यानें केलेली कत्तल क्रूरतेचा आधुनिक नमुना म्हणून सर्व जगभर प्रसिद्ध झाली आहे. असेंच कांहीं क्रूर कृत्य अधिकाऱ्यांकडून कोठें घडून आलें, तर त्याला दुसरें अमृतसर (The Second Amritsar) म्हणण्याचा प्रघात पडला आहे.

४५. पंजाबांतील लष्करी कायदा, मुसलमानांची खिलाफत, व रौलॅट ॲक्टाला मध्यमवर्गीयांचा विरोध, या सर्व गोष्टी एकवटल्यामुळें गांधीजींनी सुरू केलेल्या सत्याग्रहाला एकाएकीं अतिशय तीव्र स्वरूप प्राप्त झालें. जगाचे डोळे त्याच्याकडे लागले; व इंग्रज अधिकारी तर एकदम भांबावून गेले. अशा स्थितींत चौरिचौरा येथें कॉंग्रेसच्या स्वयंसेवकांकडून पोलिसांना जिवंत जाळण्याचा अत्याचार घडला; व गांधीजींनी सत्याग्रह तहकुब केला. इंग्रजांवर आलेलें संकट महत्प्रयास न करतां आपोआपच टाळलें गेलें! गांधीजींची लोकप्रियता बरीच कमी झाली आहे, असें पाहून बावीस सालच्या मार्च महिन्यांत

त्यांच्यावर खटला भरून त्यांना सहा वर्षांची शिक्षा देण्यांत आली.

४६. गांधीजी दोन वर्षांनी सुटले. त्या वेळीं सत्याग्रहाला फारसा जोर राहिला नव्हता. तरी चार पांच वर्षें सत्याग्रहाचें पुनरुज्जीवन करण्याचा त्यांनी प्रयत्न केला नाहीं; आणि खादी, राष्ट्रीय शिक्षण, हिंदुमुसलमानांचें ऐक्य व अस्पृश्यता-निवारण ह्या चार विधायक कार्यांवर विशेष भर दिला.

४७. इ० स० १९२९ सालची राष्ट्रीय सभा मोठी संस्मरणीय झाली. तरुण सोशॅलिस्ट पं० जवाहीरलाल यांना या सभेचे अध्यक्ष निवडण्यांत आलें; व कॉंग्रेसनें स्वराज्याचा अर्थ पूर्ण स्वातंत्र्य असा केला. कॉंग्रेस संपल्यावर गांधीजींनी आपले अकरा मुद्दे व्हॉइसरायासमोर मांडले; व मार्च महिन्यांत मिठाचा सत्याग्रह सुरू केला. एका महिन्याच्या आंतच त्यांना पकडून यरवड्याला पाठवणें त्या काळच्या ब्रिटिश लेबर गव्हर्नमेंटला योग्य वाटलें. तरी सत्याग्रह जोरांत सुरू राहिला. व्हॉइसरायला एकामागून एक फरमाने काढून जवळ जवळ लष्करी कायदा सुरू करावा लागला; व शेवटीं गांधीजींबरोबर लढाई तहकुबीचा करार करून तहाच्या वाटाघाटीसाठीं त्यांना इंग्लंडला नेण्यांत आलें. तेथें त्यांचा अपूर्व मान झाला. खुद्द पंचम जॉर्ज बादशहानें या फकीराची भेट घेतली ! पण हें सर्व कॅंझर-व्हेटिवांना आवडावें कसें ? त्यांनी म्याक्डोनल्डला काखेंत मारून एकतीस सालच्या निवडणुकींत जय मिळविल्याबरोबर सत्या-ग्रहाचीं पाळें मुळें खणून टाकण्याचा चंग बांधला. पण लॉर्ड अर्विन यांनी व लेबर गव्हर्नमेंटनें दिलेलीं वचनें अस्तित्वांत होतीं, त्यांचें काय करणार ? त्यांची विल्हेवाट सर स्यामुएल होर यांनी तयार केलेल्या बिलांत लावण्यांत आली आहे !

# पाश्चात्यांचें अधिदैवत

४८. वेदकाळीं इंद्र, अशोकाच्या वेळीं बुद्ध, शकांच्या वेळीं महादेव व गुप्तांच्या वेळीं वासुदेव हीं दैवतें जशीं पुढें आलीं, तसें इंग्रजांच्या कारकीर्दीत स्वदेशाभिमान हें दैवत पुढें येऊं पहात आहे. हिंदु समाजांतील मध्यमवर्गांत त्याची उपासना प्रिय होत चालली आहे. मुसलमानांनी लोकांवर अल्लाला लादण्याचे महत्प्रयास केले; हिंदूंवर नानातऱ्हेचे कर बसवले; तथापि राजीखुषीनें हिंदु लोकांनी क्वचितच अल्लाचा स्वीकार केला. मुसलमानांना त्या कामीं बळजबरी करावी लागली. परंतु या पाश्चात्य दैवताचा हिंदु समाज मोठ्या संतोषानें स्वीकार करीत आहे. ब्राह्मसमाज, आर्यसमाज, गणपति, अहिंसा हीं सर्व ह्या आराध्य देवतेच्या पूजेचीं साधनें गणलीं जातात. ह्या सर्व पंथांच्या उपासकांना जर तुम्ही म्हणाल कीं, तुमच्यांत स्वदेशाभिमान नाहीं, तर ते त्याचा तीव्र निषेध करतील; आणि म्हणतील कीं, लोकांत खराखुरा देशाभिमान जागृत करण्यासाठींच आमचा पंथ आहे. म्हणजे देशाभिमान हें खरें दैवत असून हे लहान सहान पंथ त्याच्या पूजेचीं साधनें आहेत असें म्हणावें लागतें.

४९. पाश्चात्य राष्ट्रांत प्रामुख्यानें याच दैवताची पूजा होत आहे हें सांगणें नलगे. जर्मन कॅथलिकांनी महायुद्धांत आपले व फ्रेंच कॅथलिकांचे बलि ह्याच देवतेसाठीं दिले. जर्मन अमेरिकनांनी जर्मन देशांत रहाणाऱ्या आपल्या बांधवांना त्यांचा कांहीं एक अपराध नसतां ह्याच देवतेच्या नादीं लागून ठार केलें. यावरून हें सिद्ध होतें कीं, धर्म किंवा जात या देशाभिमानाच्या आड येत असली, तर त्यांचा उच्छेद करण्याला कोणतेंहि

पाश्चात्य राष्ट्र माघार घेणार नाहीं. बायबलांतील देवाचें महत्त्व तेथवरच, जेथवर तो देव देशाभिमानाच्या आड येत नाहीं !

५०. पाश्चात्यांच्या कारकीर्दींत मध्यमवर्गीय हिंदु लोकांत देशाभिमानाचा प्रसार होणें साहजिक होतें. मुलाला जसें पहिल्यानें मधाचें बोट लाऊन मग ब्रॅंडीसारखें औषध पाजण्यांत येतें, त्याप्रमाणें आमच्या पुढाऱ्यांनी आम्हाला पाश्चात्यांसारखे उत्साही बनविण्याचा उद्देशानें प्रथमतः धार्मिक पंथांच्या व गणपतिउत्सवाच्या मिषानें या देशाभिमानाचें मद्य पाजण्यास सुरुवात केली. पण आतां आमचा समाज वयांत येत चालल्यामुळें त्याला अशा आमिषांची मुळींच गरज राहिली नाहीं. देशाभिमानाचे कितीहि प्याले झोकले, तरी त्याची तृप्ति होत नाहीं. 'एके काळीं आम्ही इतके चांगले होतों, पण ह्या इंग्रजांच्या कारकीर्दींत फारच खालावलों,' असें म्हटलें कीं तावडतोब देशाभिमानाची पिपासा जागृत होते !

५१. परंतु या देशाभिमानाला हिंदुस्थानांत मारक असा दुसरा एक अभिमान आहे; आणि तो आमच्या मुसलमान बांधवांचा. मुसलमान जरी हिंदुस्थानांत बरींच शतकें रहात आहेत, तरी त्यांचें सगळें लक्ष्य मक्केकडे आहे. आपल्या हातून कांहीं चुका घडल्या व आपलें राज्य गेलें, असें हिंदूंप्रमाणें मुसलमानांनाहि वाटतें; व तें पुन्हा मिळवण्याची त्यांना उमेद आहे. हिंदुस्थानांत ते जरी अल्पसंख्यांक आहेत, तरी अफगाणीस्तान, पर्शिया, तुर्क वगैरे सर्व देशांतील मुसलमान एकवटले, तर बंगालपासून कांस्टांटिनोपलपर्यंत एकछत्री मुसलमानी बादशाही स्थापन करतां येणें शक्य आहे असें त्यांस वाटतें; आणि याचसाठीं सिंध प्रांत विभक्त करणें, बंगालांत व पंजाबांत बहुमत मिळवणें इत्यादि सर्व खटपटी चालू आहेत.

५२. हिंदूंना या उद्देशाचा वास आला आहे. आपलें बहुमत करण्यासाठीं अस्पृश्यांना स्पृश्य करून घेण्याचा त्यांचा प्रयत्न तर चालूच आहे. याशिवाय ब्रह्मदेश, सयाम, चीन, जपान इत्यादि देशांतील बौद्धांचें आपणांस साहाय्य मिळावें एतदर्थ बौद्ध संस्कृतीलाहि हिंदु संस्कृतींत दाखल करून घेण्याची त्यांनी खटपट चालवली आहे. भिक्षु उत्तमांना हिंदु सभेनें आपले अध्यक्ष निवडलें, हें त्या खटपटीचें ताजें चिह्न आहे.

५३. मुसलमानांचा प्रयत्न जसा देशाभिमानाला घातक आहे, तसा तो हिंदूंचाहि होऊं लागला आहे. हिंदुस्थानच्या पलीकडे जाऊन तुम्ही चीन, जपानची अपेक्षा करूं लागलां, तर त्यांत देशाभिमान राहिला कोठें ? शुद्ध देशाभिमान म्हटला म्हणजे पाश्चात्यांसारखा असला पाहिजे. स्वदेशाभिमानानें जर्मन कॅथलिक फ्रेंच कॅथलिकनांना मारीत होते. त्याचप्रमाणें इंग्रज फ्रेंचांशीं असलेलें हाडवैर विसरून त्यांच्या साहाय्यानें आपल्या जर्मन धर्मबांधवांना ठार करीत होते. तसा देशाभिमान हिंदुस्थानांत आला, तर हिंदु व मुसलमान एक होऊन एका बाजूला बौद्धांना व दुसऱ्या बाजूला हिंदुस्थानाबाहेरील मुसलमानांना पादाक्रांत करून टाकतील. तेव्हां एका अर्थी तशा देशाभिमानाची दृढ स्थापना या देशांत होत नाहीं, हें आजूबाजूच्या देशांचें एक मोठें भाग्यच समजलें पाहिजे !

# रशियन क्रान्ति

५४. रशियन आणि हिंदी राजकीय चळवळींचा बराच संबंध दिसतो. १९०५ सालापूर्वी रशियांत बॉंबचा प्रसार फार झाला होता. झारवर व बड्या बड्या ऑफिसरांवर बॉंब टाकून

त्यांचे खून करणाऱ्या पुष्कळ गुप्त मंडळ्या त्या काळीं रशियांत अस्तित्वांत आल्या. त्यांचाच प्रतिध्वनि वंगभंगानंतर बंगाल्यांत उमटला; व त्याचे पडसाद आजलाहि ऐकूं येत आहेत. अशा तऱ्हेनें खून करण्यापासून गांजलेल्या जनतेची मुक्तता होणार नाहीं, हें बोल्शेव्हिकांचें ठाम मत. लेनिनसारखे पुढारी त्या मताचा जोरानें प्रसार करीत होते; तरी झारशाहीला कंटाळलेल्या तरुणांना त्यांचें म्हणणें पसंत पडेना. त्यांनी हें खुनाचें सत्र तसेंच चालू ठेवलें.

५५. इ० स० १९०५ सालीं रूसो-जपानी युद्धामुळें रशियांत जवळ जवळ दुष्काळाचीच परिस्थिति निर्माण झाली. अशावेळीं बोल्शेव्हिकांनी उचल करून देशभर सार्वत्रिक संप घडवून आणला. एक पाद्री पीटर्सबर्ग येथील बुभुक्षित लोकांना घेऊन झारकडे अन्नाची याचना करावयास गेला असतां त्या निःशस्त्र लोकांवर गोळ्या घालून झारनें त्यांची कत्तल केली. फ्रेंचांनी झारला मोठी रक्कम कर्जाऊ दिल्यामुळें सैन्याला समाधनांत ठेऊन सार्वत्रिक झालेला संप मोडतां आला. जिकडे तिकडे दडपशाही सुरू झाली, व गरीब लोकांच्या दुःखाला मर्यादा राहिली नाहीं. बोल्शेव्हिकांचें झारशाहीपुढें कांहीं चालत नाहीं, असें पाहून तरुण लोक निराश होऊन गेले. बाँबशाहीवरून त्यांचा विश्वास उडण्याऐवजीं तो अधिकच वाढला.

५६. परंतु आंतबट्ट्याच्या व्यापारानें झारशाही ढिली होत जाऊन १९१७ सालीं ती आपोआपच ढांसळून पडली. रशियाचें धुरीणत्व एकाएकीं मध्यमवर्गाच्या हातीं आलें. केरेंस्की त्याचा पुढारी बनला. झारनें आपण होऊन राजिनामा दिला. पीटर्सबर्ग येथें प्रजासत्ताक राज्याची स्थापना झाली. पण ती प्रजासत्ता टिकावी कशी ? अमेरिकेनें जर कर्ज दिलें नाहीं तर केरेंस्कीचें

राज्य चालावें कसें? अमेरिका त्या वेळीं जर्मनीविरुद्ध दोस्त राष्ट्रांना मिळालेली. तेव्हां रशियाला कर्ज द्यावयाचें म्हणजे रशियानें युद्धक्षेत्र सोडून मागें हटतां कामां नये अशा अटीवर. केरेंस्कीला अर्थातच ही अट मान्य करून कर्ज घ्यावें लागलें. परंतु रशियन शेतकरी लढाईला अत्यंत कंटाळून गेले होते. झार जसा राजिनामा देऊन मोकळा झाला, तसे तेहि आपापल्या बंदुका घेऊन आपल्या घरीं जाऊन लढाईपासून मोकळे झाले. आपल्या वक्तृत्वाच्या जोरावर लढाई चालू ठेवण्याचा केरेंस्कीचा उद्योग हास्यास्पद ठरला.

५७. ह्या संधीचा फायदा घेऊन लेनिन पुढें आला. पीटर्सबर्ग ताब्यांत घेण्यासाठीं लेनिनला मुळींच रक्तपात करावा लागला नाहीं. मास्को येथें तेवढा झारपक्षानें थोडासा विरोध केला. परंतु फारशा रक्तपाताशिवाय सर्व रशिया बोल्शेव्हि-कांच्या हातीं आला. जमीनी शेतकऱ्यांच्या, गिरण्या मजुरांच्या, आणि लढाई बंद, ह्या तीनच्च वाक्यांत लेनिनचें सामर्थ्य सांठवलेलें होतें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. लढाई तर बंद झालीच होती. आणि लढाईच्या वेळीं मिळालेल्या बंदुका व गोळ्या जमीनी आपल्या ताब्यांत घेण्याच्या कामीं शेतकऱ्यांनी उपयोगांत आणल्या. लेनिनचें वाक्य म्हणजे पडत्या फळाचीच आज्ञा असें त्यांस वाटलें असावें. आतां तेवढ्या गिरण्या मजुरांच्या ताब्यांत यावयाच्या,होत्या. पण त्याबद्दल मजुरांना शंका राहिली नाहीं.

५८. दोस्त राष्ट्रांवर हें एक महासंकट गुदरलें. जर्मनीला नुकताच कोठें आळा बसत चालला आहे, तोंच बोल्शेव्हिझमची उत्पत्ति होऊन तें सगळ्या भांडवलशाहीला ग्रासून टाकतें कीं काय, अशी सर्व मुत्सद्द्यांना भीति पडली. त्यांनी ह्या नवीन

उत्पन्न झालेल्या पंथाला हरतऱ्हेनें अडथळा करण्यास सुरवात केली. रशियन क्रांतीचें वारें जर्मनींत शिरल्यामुळें व दोस्त राष्ट्रांचा जोर अमेरिकेच्या मदतीनें उत्तरोत्तर वाढत गेल्यामुळें जर्मनी डबघाईस आला, व त्यानें १९१८ सालीं विल्सनच्या चौदा अटींवर लढाई तहकूब केली. अर्थात् दोस्त राष्ट्रांना आपल्या पूर्वेकडील दोस्ताकडे विशेष लक्ष्य देण्यास सवड सांपडली. त्यांच्याकडे युद्धसामग्री विपुल होती. पण सर्व देशांतील माणसें लढाईला फार कंटाळून गेलीं होतीं. त्यामुळें कोणत्याहि दोस्त राष्ट्राला रशियांत मोठें सैन्य पाठवणें शक्यच नव्हतें. दुसरी एक भीति होती ती ही कीं, बोल्शेव्हिकांच्या प्रचारकार्यानें जर हें सैन्य बिथरून गेलें, तर त्याचा परिणाम आत्मघातांतच व्हावयाचा. दोस्त राष्ट्रांच्या सुदैवानें रशियांतून पळून आलेले धनिक व सरदार घरण्यांतील लोक रशियाबाहेर जिकडे तिकडे फैलावले होते. त्यांच्या शिवाय रशियांत झेको-स्लावाकियामधील हजारों सैनिक कैद होऊन पडले होते. जर्मनी-विरुद्ध लढण्यास तयार केलेल्या युद्धसामग्रीची ह्या लोकांना जर मदत करण्यांत आली, तर ते परस्परच बोल्शेव्हिझम् नष्ट करून टाकतील, असें दोस्त राष्ट्रांतील धुरंधरांना वाटणें अगदीं साहजिक होतें.

५९. त्याप्रमाणें सर्व दोस्त राष्ट्रांनी खलबत करून रशियन गोऱ्यांची[1] व झेकोस्लावाकियन कैदी सैनिकांची नवीन रचना केली, आणि बोल्शेव्हिकांवर चारी बाजूंनी हल्ला चढविला. या संकटांतून पार पडण्याची बोल्शेव्हिक पुढाऱ्यांनाहि फारशी

---

१ बोल्शेव्हिकांविरुद्ध असलेल्या श्रीमंतांना 'गोरे' (White) व बोल्शेव्हिकांना 'तांबडे' (Red) म्हणतात.

आशा नव्हती. कां की, सर्व देश हलाख झालेला; आणि दारूगोळा तर मुळींच नाहीं. लढून मरणें किंवा फांशीं जाणें याशिवाय तिसरा मार्ग नसल्याकारणानें लढून मरण्याचा मार्ग बोल्शेव्हिकांनी पसंत केला, हें सांगावयास नकोच.

६०. परंतु जसजसे हे गोरे रशियन मास्को आणि लेनिनग्राडकडे चाल करून जाऊं लागले तसतसे दुर्बळ होत गेले. नवीन मालक बनलेल्या शेतकऱ्यांची त्यांना मदत करण्याची मुळींच इच्छा नव्हती. अर्थात् गोऱ्या रशियनांना शेतकऱ्यांवर जुलूम करून अन्नसामग्री मिळवावी लागली, व त्यामुळें त्यांच्या पिछाडीला बंडें उपस्थित झालीं. दोस्त राष्ट्रांनी पाठवलेली युद्धसामग्री आपोआपच त्या बंडवाल्यांच्या–बोल्शेव्हिकांच्या–हातीं आली ! व गोरें सैन्य, ग्रीष्म काळच्या सूर्यकिरणांनी वितळणाऱ्या बर्फाप्रमाणें तेथल्या तेथेंच वितळून गेलें ! राहिलेल्या श्रीमंत घराण्यांतील लोकांना बरोबर घेऊन व्रांगल वगैरे सेनापतींना पळ काढतां पुरेवाट झाली. युद्धसामग्री तर गेलीच, आणि हे रशियन गोरे मदतीसाठीं दोस्त राष्ट्रांच्या दारीं येऊन बसले ! पण आतां त्यांची दोस्त राष्ट्रांना काय गरज होती ?

६१. याप्रमाणें अनपेक्षितपणें बोल्शेव्हिकांचा जय झाला. एस्तोनिया, लातविया, लिथुवानिया, पोलंड, फिनलंड व बेसाराबिया येवढे प्रांत खेरीज करून झारच्या ताब्यांत असलेल्या सर्व साम्राज्यावर बोल्शेव्हिकांची सत्ता स्थापित झाली. पण ती घेऊन काय करावयाचें ? आगगाडीचे रस्ते मोडून पडलेले, बहुतेक गिरण्या बंद पडून यंत्रांना गंज चढलेला, व दोस्त राष्ट्रांनी तर चारी बाजूंनी बोल्शेव्हिकांचा कोंडमारा केलेला- इतक्यांत १९२१ सालचा भयंकर दुष्काळ

आला. अन्नावांचून लाखो लोक मरण पावले. गोऱ्या रशियनांचा पराभव करून आपली सत्ता स्थापन करणें जितकें कठिण होतें त्याच्याहून या सर्व संकटपरंपरेंतून पार पडणें बोल्शेव्हिकांना दसपटीनें जड गेलें असलें पाहिजे. पण ते करतात काय? ह्या सर्व संकटांना तोंड दिल्यावांचून दुसरी वाटच नव्हती. या वेळीं भांडवलशाही दोस्त राष्ट्रांनी अन्नसामग्री बरोबर घेऊन रशियावर चाल केली असती, तर फार मोठ्या लढाईशिवाय त्यांना सर्व रशिया जिंकतां आला असता. रशियावर चाल केली असतां आपलेच लोक आपणावर बिथरतील व आपल्याच राज्यांत क्रांति घडून येईल, एवढीच कायती त्यांतील पुढाऱ्यांना भीति होती; आणि तिजमुळें रशियाचा कोंडमारा करण्यांतच त्यांना समाधान मानून घ्यावें लागलें.

६२. त्यानंतर बोल्शेव्हिकांनी पांचवार्षिक योजना सुरू करून तींत कितपत यश संपादन केलें, ग्रामसंघटना कशा सुरू केल्या, इत्यादि गोष्टी अगदीं ताज्या आहेत; आणि त्यांत त्यांनी मिळवलेल्या यशापयशाबद्दल अनेक देशांत चर्चाहि चालू आहे. येथें एवढें कबूल केलें पाहिजे कीं, बोल्शेव्हिकांच्या हातीं राजसत्ता अत्यंत आणीबाणीच्या प्रसंगीं आली असतां ती त्यांनी मजूर आणि शेतकरी यांच्या जोरावर टिकवून धरली, एवढेंच नव्हे, तर असह्य आपत्तींतून आपलें डोकें वर काढून सर्व जगाला एक नवीनच धडा घालून दिला.

## जपानी व रशियन क्रान्तींची तुलना

६३. सरदारी सत्तेंतून वर डोकें काढून मध्यमवर्गीय सत्ता स्थापन करण्याला इंग्लंड, फ्रांस वगैरे देशांना शेंकडो वर्षें

लागलीं. पण तेंच काम जपाननें अवघ्या तीस बत्तीस वर्षांत केलें. १८५३ सालापर्यंत जपानचा आणि इतर राष्ट्रांचा संबंध मुळींच नव्हता म्हटलें तरी चालेल. एका तेवढ्या डच कंपनीला कडक अटींवर जपानशीं व्यापार करण्यास मोकळीक होती. पण त्या सालीं अमेरिकन आरमाराचा अधिकारी कमोडोर पेरी (Commodore Perry) कांहीं लढाऊ जहाजें घेऊन जपानी बंदरांत आला व त्यानें १८५४ सालीं जबरदस्तीनें जपानी शोगन-कडून व्यापारी तह करून घेतला. त्यानंतर त्याचेंच अनुकरण करून ब्रिटिशांनीहि १८६३ सालीं जपानांत प्रवेश केला. सरते शेवटीं ब्रिटिश, फ्रेंच, डच व अमेरिकन राष्ट्रांनी १८६५ सालीं जपानकडून पूर्वी झालेल्या सर्व तहांना मान्यता मिळवली. त्यामुळें जपानच्या मानहानीला पारावार राहिला नाहीं. १८६६ सालापासून आपल्या देशाला वर आणण्यासाठीं जपानी तरुण पिढीनें कंबर बांधली. अत्यंत हालअपेष्टा सोसून चांगल्या चांगल्या घराण्यांतील तरुण अमेरिकेला व युरोपला जाऊन सर्व प्रकारच्या कौशल्यांत—विशेषतः युद्धकलेंत—निपुण झाले. त्याचा परिणाम असा झाला कीं, अवघ्या तीस वर्षांच्या आंत जपाननें एवढ्या मोठ्या चीन देशाचा पराजय करून फोरमोसा बेट काबीज केलें; व कोरियाला चीनपासून मोकळें करून आपल्या कह्यांत आणलें. तेव्हांपासून जपानची सत्ता कशी वाढत चालली आहे, हें सांगणेंच नलगे.

६४. परंतु जपानी क्रान्तींत आणि रशियन क्रान्तींत महदंतर आहे. जपानी संस्थानिकांनी जवळ जवळ राजीखुषीनेंच आपली सत्ता मिक्याडोच्या हवालीं केली; व मिक्याडोनेंहि आपल्या सत्तेला आळा घालून घेऊन मध्यमवर्गाच्या हातांत सत्ता सोंपविली. अमेरिकन व युरोपियन राष्ट्रांनी जपानच्या राज्य-

क्रान्तीला विरोध न करतां तिचें अभिनंदन केलें, व शिक्षणाच्या कामीं जपानला शक्य ती मदत केली. बोल्शेव्हिकांचा प्रकार याच्या अगदीं उलट. रशियांतील सत्ताधिकारी जमीनदार आणि श्रीमंत लोक दोस्त राष्ट्रांच्या मदतीनेंच त्यांच्यावर उठलेले. सर्व जग त्यांच्या विरुद्ध. एवढेंच नव्हे तर बलाढ्य दोस्त राष्ट्रांनी त्यांचा एकसारखा कोंडमारा केलेला. या सर्व आपत्तींतून बोल्शेव्हिक निभावून बाहेर पडले, हा एक इतिहासांतील मोठा अद्भुत चमत्कारच गणला पाहिजे. युरोपियन आणि अमेरिकन मजूरवर्गाची सहानुभूति जर बोल्शेव्हिकांना मिळाली नसती, तर तो चमत्कार घडून आला असता कीं नाहीं याची शंका वाटते.

## रशियन क्रान्तीचा प्रभाव

६५. बोल्शेव्हिकांच्या विजयाचा परिणाम हिंदुस्थानावरच काय तर सर्व जगावर घडून आलेला आहे. त्यांच्याविषयीं मजूर वर्गाचीं मनें कलुषित करण्याचा आटोकाट प्रयत्न भांडवलवाल्यांनी आपल्या ताब्यांतील वर्तमानपत्रांच्या द्वारें एकसारखा चालविला आहे. तेवढ्यानें क्रान्ति थांबणार नाहीं, याच भीतीनें कीं काय भांडवलवाल्यांनी इटलींत मुसोलिनी व जर्मनींत हिटलर यांना पुढें आणलें. चिनांत च्यांग केशेक सारख्या भाडोत्री सेनापतींना पुढें करून तद्द्वारा बोल्शेव्हिक क्रान्ति थोपवून धरण्याचा युरोपियन आणि अमेरिकन भांडवलवाल्यांचा प्रयत्न चालूच आहे. हिंदुस्थानांत बोल्शेव्हिझमचें नांव क्वचितच ऐकूं येतें. तरी पण केवळ त्याच्या छायेला भिऊन सर सॅम्युअल होरसारख्या कॅझरव्हेटिवांनी तयार

केलेल्या नवीन घटनेंत राजेरजवाडे, जमीनदार वगैरे लोकांना गोवून तद्वारा बोल्शेव्हिझमच्या विरुद्ध बळकट कोट उभारण्याचें काम चालू आहे. परंतु त्याचा उपयोग विचारक्रान्तीविरुद्ध होईल कीं नाहीं याची खुद्द विचारी इंग्रजांनाहि शंका वाटते.

६६. हिंदुस्थानांतील हिंदु मध्यमवर्ग स्वतंत्रतेला हपापलेला आहे. अहिंसेच्या द्वारें असो किंवा हिंसेच्या द्वारें असो, स्वतंत्रता मिळत असली, तर ती त्याला हवी आहे. रोगानें पीडलेला मनुष्य औषधांत पवित्र वनस्पति आहेत कीं अपवित्र मांसादिकांचे अर्क आहेत, याचा विचार थोडाच करीत असतो. त्याला पाहिजे असतें आरोग्य; आणि तें जितक्या लवकर मिळवितां येणें शक्य असेल तितकें चांगलें. आर्यसमाजाचें, लोकमान्यांच्या गणपतिउत्सवाचें आणि महात्मा गांधींच्या अहिंसात्मक विधायक कार्यक्रमाचें औषध घेऊन पाहिलें; पण गुण येत नाहीं. मग उत्कंठित झालेल्या तरुणांचीं मनें बोल्शेव्हिकी औषधाकडे वळावींत हें अगदीं साहजिक आहे. सगळ्या जगाविरुद्ध लढून आपल्या सरदारांचा आणि जमीनदारांचा निःपात करून बोल्शेव्हिकांना रशियन साम्राज्यांतील सर्व मजूरवर्गाला स्वतंत्र करतां आलें, तर त्याच मार्गानें आम्हाला ह्या गांजलेल्या हिंद देशाला स्वतंत्र कां करतां येऊं नये ?

६७. शेवटल्या सत्याग्रहांत जवळ जवळ एक लाख लोक तुरुगांत गेले. अर्थातच हे सर्व मध्यमवर्गांतील तरुण होते. तेथें काम जरी करावें लागत असे, तरी ह्या तरुण मंडळीला वाचन आणि विचार करण्याला पुष्कळच सवड सांपडली; व ज्या ग्रंथांमुळें बोल्शेव्हिझमचा उगम झाला, ते कार्ल मार्क्स, फ्रेडरिक एंगल्स इत्यादिकांचे ग्रंथ वाचण्यास त्यांच्यापैकीं पुष्कळ जणांनी सुरुवात केली. त्याचा परिणाम असा झाला कीं, गेल्या (१९३४)

सालच्या मे महिन्यांत पाटना येथें अशा लोकांची एक सभा भरून त्यांनी एक नवीन 'कॉंग्रेस समाजवादी पक्ष' स्थापन केला, व तेव्हांपासून ह्या पक्षाची एकसारखी प्रगति होत चालली आहे. हिंदुस्थानांत कम्युनिस्ट पक्ष बेकायदेशीर ठरवला गेला आहे. त्यामुळें त्या पक्षाला उघड रीतीनें आपल्या मतांचा प्रसार करतां येत नाहीं. गुप्तपणें हे लोक काय करीत असतील, तें गुप्त पोलिसांना तेवढें माहीत. तेव्हां आम्हाला जी काय माहिती आहे ती ह्या नवीन सोशॅलिस्ट पक्षाची. याचा संबंध जरी मास्कोशीं नाहीं, तरी रशियन क्रांतीचा परिणाम त्याच्यावर फारच झाला आहे. किंबहुना रशियन क्रान्ति झाली नसती, तर ह्या पक्षांतील बहुतेक पुढाऱ्यांनी मार्क्सकडे ढुंकूनहि पाहिलें नसतें.

६८. पाश्चात्यांच्या संस्कृतीचा उदय, तिचा हिंदुस्थानांत प्रवेश आणि हिंदु समाजावर परिणाम कसा झाला, याचें त्रोटक विवेचन येथवर करण्यांत आलें आहे. त्याच्यावरून असें दिसून येईल कीं, पाश्चात्यांच्या सहवासानें उत्पन्न झालेल्या देशाभिमानामुळें पौराणिक संस्कृति लोपत चालली आहे. कोणत्याहि देशकार्यासाठीं संप्रदायाची किंवा कोणत्याहि देवतेच्या उत्सवाची आवश्यकता नाहीं, हा विचार सर्वसामान्य होत आहे. पण ह्या देशाभिमानाला सगळ्यांत मोठा शत्रु म्हटला म्हणजे मुसलमानी अभिमान आहे. दुसरें एक याला भय आहे तें हें कीं, यदाकदाचित् हिंदुस्थान स्वतंत्र झाला, तर बंगाली हिंदूंचा, महाराष्ट्रीय हिंदूंचा, गुजराथी हिंदूंचा आणि रजपूत हिंदूंचा अभिमान, असे अनेक अभिमान उभे राहून ते एकमेकांशीं टक्कर देऊं लागतील; व पुन्हा इंग्रजी किंवा अशाच दुसऱ्या बलाढ्य राष्ट्राला शरण जाऊन हिंदुस्थानांत शांतता स्थापन

करावी लागेल. बंगाली आणि बिहारी, मराठी आणि गुजराथी, आंध्र आणि तामीळ इत्यादि लोकांतील सध्या चालू असलेली चुरस पाहिली असतां हें भय अकारण आहे, असें म्हणतां येत नाहीं.

६९. यावर समाजवाद्यांचें म्हणणें कीं, 'ह्या राष्ट्रीयत्वाचा कांटा काढण्यासाठींच आमचा प्रयत्न आहे. आम्हाला बंगाली काय कीं बिहारी काय, किंवा महाराष्ट्रीय काय कीं गुजराथी काय, श्रमजीवी मजूर वर्ग येथून तेथून सारखाच. आम्ही या मजूर वर्गाच्याच बळावर स्वतंत्रतेची इमारत उभारूं पहात आहोंत. रशियन साम्राज्यांत अनेक देश व अनेक भाषा आहेत. त्या सर्वांचें संघटन जर समाजवादाच्या तत्त्वावर करतां आलें, तर तसें तें हिंदुस्थानांत कां करतां येऊं नये ?' समाजवाद्यांची ही विचारसरणी योग्य वाटते. परंतु जातिभेदांनी व वर्गभेदांनी ग्रासलेल्या या देशांत तिचा प्रसार कितपत होईल, अशी विचारी लोकांस शंका येत आहे.

७०. देशाभिमानाचा आणि समाजवादाचा एक सुपरिणाम आम्हास दिसतो तो हा कीं, त्यांच्यायोगें पौराणिक संस्कृतीच्या तमोयुगांतून आम्ही बाहेर पडत आहोंत; सरळ विचार करण्याची आम्हाला सवय लागत चालली आहे; सांप्रदायिक आडरानांत शिरण्याची आवश्यकता वाटत नाहीं. एवढ्यापुरते तरी पाश्चात्यांचे आम्ही आभार मानले पाहिजेत.

---

# विभाग पांचवा

# संस्कृति आणि अहिंसा

## वन्य संस्कृति

१. अहिंसेचा मानवी संस्कृतीशीं निकट संबंध आहे. अहिंसेचा जसजसा विकास होत जातो तसतशी संस्कृतीहि वाढत जाते. आईबापांत आपल्या संततीविषयीं अहिंसक बुद्धि नसती, तर मनुष्यसमाजाची किंवा पशुपक्षादिकांच्या समाजांची वाढच झाली नसती. प्राथमिक वन्यावस्थेंत मुलाच्या संगोपना-साठीं मानवी आईबापांना किती कष्ट सहन करावे लागले असतील, याची नुसती कल्पनाच केली पाहिजे. आपल्या व आपल्या संततीच्या बचावासाठीं जेव्हां मनुष्य प्राणी परस्परांवर विश्वास टाकून एका पुढाऱ्याच्या नेतृत्वाखालीं एकवटून शिकार वगैरे करण्याला प्रवृत्त होतात, तेव्हां कोठें त्यांच्या वन्य संस्कृतीला आरंभ होतो असें म्हणतां येईल.

२. अशा एकाद्या वन्य समूहाविषयीं विचार केला असतां दिसून येईल कीं, आपल्या पुढाऱ्यावर त्यांचा पूर्ण विश्वास असतो; त्यानें दिलेला न्याय सर्वांना पसंत पडतो. आपल्या टोळींतील आजारी किंवा जखमी लोकांना मदत करण्यास ते तत्पर असतात. थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे त्यांची

अहिंसात्मक बुद्धि त्यांच्या टोळीपुरतीच असते. दुसऱ्या टोळीचे लोक हातीं लागले असतां त्यांना ते बायकांपोरांसकट ठार मारून टाकतात. त्यांना जर जिवंत ठेवलें, तर त्यापासून या टोळीचा कांहींएक फायदा नसतो. उलट आपली शिकार त्यांना खायाला देऊन स्वतःचीच उपासमार करण्याची पाळी यावयाची. दुसऱ्या टोळींतील लोकांना मारून त्यांचा निकाल केला म्हणजे त्यांच्या प्रदेशांतील शिकारहि या लोकांच्या ताब्यांत येते, व ह्यांच्या शिकारी साम्राज्याची अभिवृद्धि होते. असा प्रकार वन्यावस्थेंतील बहुतेक सर्व टोळयांत घडून येऊन अनेक टोळया काळाच्या जबड्यांत गेल्या. त्यांच्या इतिहासाची आठवण झाली म्हणजे अंगावर नुसते शहारे उभे रहातात !

## साम्राज्य व त्याचे गुणदोष

३. पण जेव्हां अशा कांहीं टोळयांतील लोकानां धान्यावर रहातां येऊं लागलें, व धान्य उत्पन्न करण्याचीं साधनें मिळालीं, तेव्हां हा इतिहास पार बदलला. दुसऱ्या टोळींतील निदान सशक्त माणसांना मारण्याची जरूरी राहिली नाहीं. त्यांना धरून आणून जर शेतीच्या कामाला लावलें, तर त्यापासून ह्या टोळीचा अतोनात फायदा होई. त्यांनी काबाडकष्ट करावे, व ह्यांनी त्यांच्या संपत्तीचा उपभोग घेऊन राज्यशासनाचा व धर्माचा विचार करावा. बाबिलोनियामध्यें प्रथमतः जीं राज्यें अस्तित्वांत आलीं तीं सुमेरियन लोकांच्या हुशार टोळयांनी स्थापलेलीं होतीं. एका टोळीनें कांहीं मुलुख ताब्यांत घेऊन तेथें एक शहर स्थापन करावयाचें व आपल्यापेक्षां कमी दर्जाच्या लोकांना दास बनवून त्यांच्याकडून सर्व अंगमेहनत

करवून घ्यावयाची, अशी पद्धति सुरू झाली. वरिष्ठ वर्गाची काबाडकष्टांपासून मुक्तता झाल्यामुळें त्यांना शिल्पकला, लेखनकला, युद्धकला, धातुसंशोधनकला इत्यादि कलांचा विकास करण्यास मुबलक सवड सांपडली; व उत्तरोत्तर हीं नगरराज्यें बलाढ्य होत गेलीं.

४. परंतु शेजारच्या नगरांशीं टक्कर देण्यासाठीं त्यांना सतत सज्ज रहावें लागत असे. त्यामुळें क्षत्रियांचा वर्ग उत्पन्न झाला. देवाच्या अनुग्रहानें आपल्या शहराचें रक्षण करतां येतें, अशा समजुतीनें देवाची प्रार्थना करण्यासाठीं एक निराळा पुजारी किंवा ब्राह्मणी वर्ग तयार करावा लागला. क्षत्रियांना युद्धाची कवाईत वगैरे शिकण्यांत वेळ घालवावा लागत असे. परंतु ब्राह्मणांना देवाची पूजा केल्यानंतर बाकीच्या वेळीं कांहींच काम नसल्याकारणानें लेखनकलेचा व ज्योतिषाचा विकास करण्यास मुबलक सवड सांपडली.

५. दोन शहरें जवळ वसलीं; त्यांच्या प्रदेशांच्या सीमा एकामेकाला येऊन भिडल्या. तेव्हां सीमेसाठीं तक्रारी उपस्थित होऊं लागल्या; व कधीं कधीं त्यांचा निकाल लढाईनें करून घेणें भाग पडलें. अशा रीतीनें क्षत्रियांची वाढ होऊं लागली. त्यांना फार दिवस रिकामपणांत घालवतां येईनात. कांही तरी कुरापत काढून दुसऱ्या शहरावर हल्ला करून त्यांतील क्षत्रियांना आपले दास करावे व तो सर्व प्रदेश आपल्या शहराला जोडून घ्यावा हा प्रकार अंमलांत येऊं लागला; व त्यापासून साम्राज्य-संस्था उत्पन्न झाली. लहान सहान शहरांत सतत लढाया चालू रहात, त्या मोडून सम्राटानें सर्वत्र एकसत्ता स्थापन केल्यावर लोकांना किती सुख वाटलें असावें, याची नुसती कल्पनाच केली पाहिजे. बाबिलोनियांत त्या त्या शहराचे निराळे

देव होते; एक शहर सूर्याची तर दुसरें चंद्राची उपासना करीत असे. जेव्हां साम्राज्य स्थापन झालें, तेव्हां त्या देवतांबरोबर सम्राटाचीहि पूजा होऊं लागली.

६. जो प्रकार बाबिलोनियांत, तोच सिंधूच्या प्रदेशांत घडून आला. तेथें लहान लहान शहरें वसलीं होतीं; व त्यांच्यामध्यें भयंकर चुरस होती, असें अनुमान करतां येतें. हीं शहरें इंद्रानें तोडून एकसत्ताक राज्य स्थापन केलें; म्हणून त्याला पुरंदर ( शहरें तोडणारा ) ही संज्ञा मिळाली, व त्याची इतर देवां-प्रमाणेंच पूजा होऊं लागली, हें पहिल्या भागांत दर्शविलेंच आहे.[1] तेव्हां इंद्रानें जरी कितीहि क्रूरपणा केला असला, तरी त्याच्या साम्राज्यामुळें अहिंसेचा विकास जास्त झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. बाराहि महिने निरनिराळ्या शहरांत चालू असलेल्या मारामाऱ्या बंद पडल्या, व लोकांना सुखा-समाधानानें आजूबाजूच्या प्रदेशांत संचार करतां येऊं लागला. अर्थात् अशा सार्वभौम राजांना देव मानून लोक पूजा करूं लागले, यांत नवल नाहीं.

७. सार्वभौम राज्य झालें तरी तें निर्भय असणें शक्य नाहीं. एकादा मांडलिक हळू हळू आपली सत्ता वाढवून आपणच सार्वभौम होऊं शकतो. सार्वभौम राजाच्या मर्यादेबाहेर जे मागसलेले लोक असतात, त्यांच्यांत ह्या सुधारलेल्या लोकांच्या अनुकरणानें एकोपा घडून येतो, व शस्त्रास्त्रांची अभिवृद्धि होते. साम्राज्याच्या छत्राखालीं रहाणारे क्षत्रिय संपत्तिमान् होत जातात; व ऐषआरामुळें निरुपयोगी बनतात. अशा परिस्थितींत सरहद्दीवरील उदयोन्मुख जंगली टोळयांना साम्राज्याचा विध्वंस

---

1 वि० ११४७ व ५८ पहा.

करणें अगदीं सोपें जातें; व नवीन साम्राज्य उपस्थित होतें. त्यामुळें सुधारणा होतेच असें नाहीं; कधीं कधीं पिछेहाटहि होत असते. परंतु बहुदा नवीन साम्राज्य स्थापणारे मागसलेले लोक सुधारलेल्या लोकांपासून बराच धडा शिकतात. हा प्रकार बाबिलोनियांत हजारों वर्षें घडून आला.

८. प्रथमतः दक्षिण बाबिलोनियांत सुमेरियनांचीं राज्यें उदयाला आलीं. ऐषआरामामुळें त्यांची अवनति होत चालली असतां मागसलेल्या अक्केडियन किंवा सेमेटिक लोकांनी त्यांना जिंकून साम्राज्य स्थापन केलें. ह्या सेमेटिकांची भाषा मात्र निराळी राहिली. बाकी सर्व संस्कृति त्यांनी जशीच्या तशी सुमेरियनांपासून घेतली. तोच प्रकार केशी लोकांचा. हे लोक घोड्यावर बसण्यांत तेवढे पटाईत होते; पण बाकी सुधारणेंत बाबिलोनियनांपेक्षां फारच मागसलेले. त्यांनी बाबिलोनियांत साम्राज्य स्थापन केल्यावर कांहीं काळानें तेथली सुधारणाच नव्हे, तर भाषा देखील उचलली. हाच प्रकार रोमन लोकांचा. ग्रीस देश पादाक्रांत करून ग्रीक लोकांना त्यांनी आपले दास केलें. पण हे दासच त्यांचे गुरु होऊन बसले !

९. आमच्या इकडे शकांचा असाच प्रकार घडला. त्यांचा तेवढा महादेव राहिला. बाकी सर्व बाबतींत त्यांनी हिंदूंची संस्कृति घेतली. शकांशिवाय हूण, गुर्जर, मालव इत्यादि जंगली लोकांच्या टोळ्या या देशांत शिरून त्यांनी आपलीं राज्यें स्थापन केलीं. पण त्यांच्या थोड्याशा आचारांशिवाय बाकी सर्व आचार व देवताहि नष्ट होऊन गेल्या. त्यांनी हिंदी संस्कृति सर्वतोपरि आत्मसात् केली. हूणांचा आणि गुप्त राजांचा फार खटका उडाला. हूणांनी उत्तर हिंदुस्थानांत फार अत्याचार केले. पण जेव्हां या लढाया संपून ते येथें स्थायी

झाले, तेव्हां हूण[1] या आडनांवाशिवाय त्यांच्यांत दुसरें कांहीं परकीयत्व राहिलें नाहीं.

१०. पण जेव्हां हे मागसलेले लोक सुधारलेल्या लोकांच्या संस्कृतींत दाखल होऊं इच्छीत नाहींत, किंवा त्यांचा एक नवीनच धर्मपंथ असतो, तेव्हां मात्र जित लोकांवर भयंकर संकट गुदरतें. पहिल्या प्रकारचे लोक म्हटले म्हणजे झेंघिश खान व त्याचे वंशज मोंगल. ह्या लोकांनी मध्य-एशिया व पूर्व-यूरोप काबीज केलें. परंतु मुसलमानांची किंवा ख्रिस्ती लोकांची संस्कृति त्यांनी स्वीकारली नाहीं. त्यामुळें समरकंद, बुखारा वगैरे मध्य-एशियांतील संस्थानें व रशिया यांची अत्यंत अवनति झाली. या प्रदेशांतील संस्कृति जवळ जवळ नष्टप्राय होऊन गेली.

११. दुसऱ्या प्रकारच्या लोकांचें उदाहरण मुसलमानांचें होय. अल्लाप्रणीत धर्म घेऊन जेव्हां ते दुसऱ्या देशांत शिरत, तेव्हां तेथील संस्कृतीविषयीं त्यांना अणुमात्रहि आदर रहात नसे. इजिप्त आणि पर्शिया या देशांतील उत्कृष्ट संस्कृति त्यांनी नष्ट करून टाकली. हिंदुस्थानची संस्कृति त्यांना निखालस नष्ट करतां आली नाहीं, तरी त्यांच्या कारकीर्दीत ती केवळ मृतप्राय होऊन राहिली; हिंदूंच्या हालांना तर सीमाच राहिली नाहीं.

१२. साम्राज्याचा दुसरा दोष हा कीं, त्याच्या छत्राखालीं असलेले लोक बुद्धिमंद होऊन जातात. राजाशिवाय चालावयाचेंच नाहीं अशी त्यांचीं ठाम समजूत होऊन जाते. राजा म्हणजे परमेश्वराचा अवतार; तो जें कांहीं करील तें सहन

---

१ हूण हें आडनांव पंजाबांतील कांहीं लोक अद्यापि लावतात.

करून त्याची मनधरणी करावी लागते. त्याचा देव महादेव असला तर त्याची पूजा, जर वासुदेव असला तर त्याची पूजा करून मोठेपणा मिळवण्याला ब्राह्मण देखील पुढें सरसावतात. अशा तऱ्हेनें बुद्धिमांद्य उत्पन्न झाल्यावर जर मुसलमानांसारखें परचक्र आलें, तर त्याच्याखालीं हे लोक सांपडून बिलकूल किंकर्तव्यतामूढ होऊन बसतात.

१३. साम्राज्याचा सर्वांत मोठा दुष्परिणाम म्हटला म्हणजे बहुसंख्याक जनतेला दास्यांत राबावें लागतें हा होय. राजाच्या मर्जीला येईल तो त्यानें देव करावा, सरदारांनी त्या देवाची पूजा करावी, पुजाऱ्यांनी (ब्राह्मणांनी किंवा मौलवी इत्यादिकांनी) दक्षिणा कमावून रिकामपणांत काळ घालवावा, व बाकीच्या लोकांनी या आयतखाऊ ब्राह्मणांचें आणि क्षत्रियांचें दास्य करतां करतां काबाडकष्टांत दिवस कंठावे, अशी परिस्थिति साम्राज्याच्या योगानें उत्पन्न होते; आणि तिच्यामुळें दाबले गेलेले कष्टाळू लोक स्वदेशाविषयीं आणि आपल्या भवितव्यतेविषयीं अगदींच उदासीन बनतात. स्वराज्य झालें काय किंवा परराज्य झालें काय, एवीं तेवीं आमच्या कपाळांतील दास्य कांहीं जात नाहीं, अशी त्यांची खात्री होते. बाहेरून एकजुटीनें हल्ला करणाऱ्या लोकांना असलें हें साम्राज्य सहज पादाक्रांत करतां येतें.

## व्यापारी क्रान्तीचे गुणदोष

१४. व्यापारी क्रान्ति होऊन जिकडे तिकडे मध्यमवर्गाचें वर्चस्व स्थापन होऊं लागलें, तेव्हां ह्या पिळून निघणाऱ्या कष्टाळू लोकांना एक प्रकारें हायसें वाटलें. व्यापाराला शांतता पाहिजे होती. त्यामुळें वारंवार दंगेधोपे होणें बंद झालें; जाळपोळ

होती ती होईनाशी झाली; आणि शेतकरी व कारागीर वर्गाला आपले धंदे सुखरूपपणें चालवण्याला मोकळीक मिळाली. याशिवाय त्या वर्गांतील हुशार माणसांना स्वतः भांडवलवाले बनतां येऊं लागलें. केवढा हा फरक? ज्या देशांत व्यापारी क्रान्ति झाली तेथल्या लोकांनाच नव्हे, तर हिंदुस्थानसारख्या जित देशांनाहि हा फरक फारच मानवला. 'इंग्रंजांच्या राज्यांत काठीला सोनें बांधून काशीपासून रामेश्वरापर्यंत जावें!' हें जें वाक्य आबालवृद्धांच्या तोंडीं झालें होतें, त्याचें कारण हेंच होय. ब्राह्मसमाजाचे पुढारी तर ह्या फरकाला ईश्वरी व्यवस्था (Divine Dispensation) म्हणूं लागले.

१५. लोकांचा हा भ्रम दूर होण्याला फारसा काळ नको होता. शंभर वर्षांच्या आंतच या नव्यापद्धतीचे दोष सामान्य जनतेच्या निदर्शनास येऊं लागले. इकडे कांहीं लोक चैनींत पडून राहिलेले, तर तिकडे कांहीं लोक जेमतेम पोटाची खळी भरण्यासाठीं सारा दिवस राबणारे, अशी एकाच शहरांतील भिन्न केंद्रांमध्यें परिस्थिति उत्पन्न झाली. पूर्वयुगांत शेतकरी वर्गाला निदान मोकळी हवा तरी मिळत असे, ती पण या नवीन दासांना मिळणें शक्य नव्हतें. सध्या आपण मुंबईसारख्या शहरांत मजुरांच्या वस्तींत जाऊन पाहिलें, तर पन्नास साठ वर्षांमागें इंग्लंड, जर्मनी वगैरे देशांतील मजुरांची, व गेल्या राज्यक्रान्तीपूर्वी रशियन मजुरांची स्थिति काय होती याची बरोबर कल्पना करतां येते.

१६. पूर्वी राजे लोकं जुगार खेळून आपली संपत्ति उधळीत असत. पण त्यांच्याबरोबर जुगार खेळणारे त्यांच्याच वर्गापैकीं सरदार वगैरे थोडेच लोक असावयाचे. परंतु ह्या व्यापारी युगांत सट्ट्याच्या रूपानें आणि घोड्यांच्या शर्यतींच्या रूपानें

वाटेल त्याला जुगार खेळतां येतो. धर्मराजानें जुगारांत द्रौपदीला पणाला लावलें, तसें ह्या जुगारांत स्त्रियांना पणाला लावतां येत नाहीं खरें, परंतु त्यांचे हाल मात्र कधीं कधीं द्रौपदीपेक्षां जास्त होतात. एकाद्या मजुरानें महिन्याची मजुरी शर्यतींत घालवली आणि त्यामुळें पठाण दारांत येऊन बसला म्हणजे त्याच्या स्त्रीवर काय प्रसंग येत असेल, याची कल्पनाच केलेली बरी ! याप्रमाणें भयंकर जुगाराचें व्यसन सार्वजनिक करण्याच्या कामीं व्यापारी युगाचा चांगला उपयोग झाला आहे.

१७. युरोपांतील मजुरांना बेकारीच्या भत्याच्या रूपानें जेमतेम पोटापुरतें तरी वेतन मिळत असतें. पण मागसलेल्या व जिंकलेल्या मुलुखांतील लोकांचे जे या भांडवलशाहीच्या अमलांत हाल होतात, त्यांना सीमाच राहिली नाहीं. लहानसा दुष्काळ पडला, तरी लाखो लोक अन्नान्न करून मरतात; आणि अत्यंत सुभिक्षतेच्या काळींहि मोठा जनसमूह अर्ध्या पोटींच असतो. अशा रीतीनें वर्षांची वर्षें दारिद्र्यांत खिचपत पडण्यापेक्षां हे लोक मरून गेले तर बरें होईल, असें वाटावयास लागतें. आणि जणूं काय त्याचसाठीं इन्फ्लुएंझा, पटकी, प्लेग वगैरे सांथी त्यांच्यावर वारंवार कोसळतात. पण त्यामुळें हा प्रश्न सुटत नाहीं. म्हाताऱ्याकोताऱ्यांपेक्षां चांगले धट्टेकट्टे तरुण या सांथींना बळी पडतात; व बाकी राहिलेले पूर्वीपेक्षांहि बिकट स्थितींत जातात.

१८. भांडवलवाल्यांचीं राष्ट्रें मागसलेल्या राष्ट्रांपेक्षां जरी सुसंपन्न आहेत, तरी त्यांच्यावर एक मोठेंच संकट ओढवलेलें दिसतें. या राष्ट्रांतील इंग्लंड व फ्रान्स हीं दोन राष्ट्रें शक्य होता तेवढा मुलूख लाटून बसलीं आहेत. जर्मनीच्या वांट्याला आफ्रिकेंतील थोडासा मुलूख आला होता; पण जर्मनांची

संख्या तर सारखी वाढत होती. जपानच्या वाढत्या बळामुळें व युरोपियन राष्ट्रांच्या आपसांतील दुहीमुळें जर्मनीला सारा चीन देश काबीज करतां आला नाहीं. अर्थात् जर्मनीचा डोळा फ्रान्सच्या आणि इंग्लंडच्या वसाहतींवर वळला; आणि त्यामुळेंच गेल्या महायुद्धाचा प्रसंग ओढवला. आजला जपान एकामागून एक चीनचे लचके तोडीत चालला आहे; व मुसोलिनी अबिसिनियाला सुधारण्यासाठीं सज्ज झाला आहे. या लाटालाटीमुळें भांडवलवाल्या राष्ट्रांत प्रेम उत्पन्न होणें अशक्य झालें आहे; आणि त्यासाठीं सर्व राष्ट्रांना युद्धाची जय्यत तयारी ठेवावी लागत आहे. कधीं कोठें युद्धाचा वणवा पेटेल याचा नेम नाहीं. इकडे दुसऱ्या राष्ट्रांशीं युद्ध उत्पन्न होण्याचें भय, व तिकडे खालच्या वर्गाचे लोक क्रान्ति करतील हें भय, अशा दोन भयांच्या कात्रींत हीं राष्ट्रें सांपडलीं आहेत. भयभीत राष्ट्राला किंवा माणसाला सुख कोठून मिळणार ?

१९. बोल्शेव्हिकांना क्रान्तीचें भय नाहीं. कारण रशियांतील दलित वर्गाचा बोल्शेव्हिक राज्यव्यवस्थेनें खास फायदा झाला आहे. सध्या जर कोठें बेकारी नसेल, तर ती रशियांत; इतर सर्व देश कमीजास्ती प्रमाणानें बेकारीनें गांजलेले आहेत. आणि हें रशियन मजुरांना माहीत आहे. तरी रशियाहि भयापासून मुक्त नाहीं. पूर्वेच्या बाजूला जपानचा डोळा बोल्शेव्हिकांच्या मुलुखावर आहे; आणि पश्चिमेला तर सर्व भांडवलवाल्यांचें जगच त्यांच्या विरुद्ध आहे. अशा परिस्थितींत सुखसोईचीं साधनें निर्माण करण्याऐवजीं बोल्शेव्हिक युद्धाचीं साधनें—विशेषतः विमानें—झपाट्यानें वाढवीत आहेत. आगगाड्या बरोबर न चालल्यामुळें रशियांतील गिरण्यांना मालाचा पुरवठा वेळेवर होत नाहीं; खाणींत यंत्रसामग्री भरपूर नसल्यामुळें

कोळसा काढणें तहकूब ठेवावें लागतें; परंतु विमानें बांधण्याचें आणि इतर युद्धसामग्री उत्पन्न करण्याचें काम मात्र झपाट्यानें चालू आहे.

२०. ह्या युद्धाच्या भावी संकटांतून पार पडण्याची बहुतेक आशा राहिली नाहीं. मुत्सद्दी लोक आजचा प्रसंग उद्यांवर ढकलतात, एवढेंच कायतें. शांतिपर्वांत एका माणसाची गोष्ट आहे. तो एका भयानक जंगलांत सांपडला. त्यांतून बाहेर निघण्यास त्याला वाट मिळेना. सिंह, व्याघ्रादिक हिंस्त्र प्राण्यांच्या भयानें तो इतस्ततः धांवूं लागला. त्या वनांत लतांनी व गवतानें झांकलेली एक मोठी विहीर होती. धांवतां धांवतां हा गृहस्थ त्या विहीरींत पडला, व लतांमध्यें गुरफटला जाऊन अधांतरीं लोंबकळत राहिला. त्या विहीरीच्या कांठीं असलेल्या वृक्षावर मधाचें पोळें होतें. त्यांतून कांहीं मधाचे थेंब गळूं लागले. तेव्हां जीभ बाहेर काढून हा गृहस्थ ते थेंब चाटूं लागला! ही उपमा[१] कांहीं अंशीं युरोपीय भांडवलवाल्यांना लागू पडेल. भांडवलशाहीनें उत्पन्न केलेल्या लतांच्या जाळ्यांत ते लोंबकळत आहेत. एकीकडे दुसऱ्या महायुद्धानें भांडवलशाहीच्या लता तुटण्याचें भय, व दुसरीकडे गिरण्यांच्या पोळ्यांतील मजूररूपी मधमाशा खाऊन टाकतील हें भय, अशा ह्या दोन भयांत सांपडले असतांहि त्या पोळ्यांतून गळणारे थोडेबहुत फायद्याचे थेंब ते चाटीतच आहेत! ह्या संकटांतून पार पडण्याचा मार्ग त्यांना निखालस दिसत नाहीं!

---

१ कुंभकोण संस्करण, अ० २०५. आम्ही येथें मूळ उपमेंत थोडा फेरफार केला आहे.

# दुःखाचें मूळ तृष्णा

२१. शरीराला लागणाऱ्या अत्यावश्यक पदार्थांचा उपभोग घेणें ह्याला तृष्णा म्हणत नाहींत. जेव्हां ह्या उपभोग्य वस्तूंचा हव्यास सतत वाढत जातो, तेव्हां त्याला तृष्णा म्हणतात. हा दुर्गुण मनुष्येतर प्राण्यांतहि दिसून येतो. एकाद्या कुत्र्याला भरपूर खाऊं घातलें व त्याच्यानें तें खाववलें नाहीं, तर तो तेथें बसून रहातो, आणि जवळपास दुसऱ्या कुत्र्यांना येऊं देत नाहीं. मनुष्यजातीमध्यें ह्या तृष्णेची वाढ जोमानें होत असते. ज्याला रोजीं दोन आणे मिळत नसत, त्याला पांच रुपये मिळूं लागले, तर तेवढ्यानें त्याचें समाधान होईल असें मुळींच नाहीं. आपलें उत्पन्न निदान रोजीं दहा रुपये झालें पाहिजे, अशाबद्दल तो सारखा प्रयत्न करीत राहील; आणि जितका लाभ, त्याच्या दुप्पट त्याचा लोभ वाढत जाईल.

२२. बौद्ध ग्रंथांत ही तृष्णा तीन प्रकारची आहे. कामतृष्णा म्हणजे उपभोग्य वस्तूंची तृष्णा, भवतृष्णा म्हणजे परलोकाविषयीं तृष्णा, व विभवतृष्णा म्हणजे विनाश पावण्याची तृष्णा, हे ते तीन प्रकार होत. मनुष्याला यथास्थित उपभोग्य वस्तु मिळाल्या, तरी त्यांत त्याचें समाधान होत नाहीं. मेल्यानंतर चिरकाल स्वर्गीय संपत्ति उपभोगण्यास मिळावी, यासाठीं तो श्रमणब्राह्मणांना दानधर्म करतो, यज्ञयाग करतो, व्रतउपोषणें करतो, व सर्वसंगपरित्याग करून तपश्चर्येलाहि प्रवृत्त होतो. विभवतृष्णेचा प्रसार वरील दोन तृष्णांएवढा नसला, तरी तिचा प्रभाव कमी आहे असें नाहीं. आपण मेलों म्हणजे जग संपलें, असें समजणारे लोक आहेतच; आणि ह्या तृष्णेमुळें आपला व परक्यांचा घातपात करण्याला त्यांना मुळींच दिक्कत वाटत नाहीं.

२३. कामतृष्णा किंवा विषयवासना हिच्यामुळें किती अनर्थ होतात, याचीं विस्तृत वर्णनें त्रिपिटकवाङ्मयांत बरींच सांपडतात. त्यांतील कांहीं उतारे येथें देणें योग्य वाटतें. मज्झिमनिकायांतील महादुक्खक्खन्ध सुत्तांत भिक्षूंना उद्देशून भगवान् म्हणतो, "भिक्षुहो, विषयोपभोगांमध्यें दोष कोणता ? एकादा तरुण होतकरू कारकुनी करून, व्यापारधंदा करून किंवा सरकारी नोकरी करून आपला निर्वाह करतो. त्या धंद्यामुळें त्याला अत्यंत ताप होतो. तथापि तो उपभोग्य वस्तु मिळवण्यासाठीं रात्रंदिवस खटपटतो; व तेवढ्यानें जर त्या वस्तूंचा लाभ झाला नाहीं, तर शोकाकुल होऊन आपला प्रयत्न व्यर्थ गेला या विवंचनेनें मूढ होतो. जर त्या उद्योगांत त्याला यश आलें, व इच्छिलेल्या वस्तु त्याला मिळाल्या, तर त्या राजांनी आणि चोरांनी लुटूं नयेत, आगीनें जळून जाऊं नयेत, पाण्यांत वाहून जाऊं नयेत, किंवा अप्रिय दायादांच्या ताब्यांत जाऊं नयेत, म्हणून तो त्यांचा सांभाळ करण्यांत गढून जातो; व त्यामुळें त्याच्या मनाला फार त्रास होतो. पण एवढी खबरदारी घेतली असतांहि राजे लोक किंवा दरोडेखोर त्याची संपत्ति लुटतात; आगीनें किंवा पाण्यानें तिचा नाश होतो; किंवा अप्रिय दायाद ती हिरावून घेतात. अशा प्रसंगीं त्याला अत्यंत दुःख होतें.

२४. "आणि, भिक्षुहो, या विषयांसाठींच राजे राजांबरोबर भांडतात; क्षत्रिय क्षत्रियांबरोबर, ब्राह्मण ब्राह्मणांबरोबर व वैश्य वैश्यांबरोबर भांडतात; आई मुलाबरोबर, मुलगा आई-बरोबर, बाप मुलाशीं, मुलगा बापाशीं, भाऊ बहिणीशीं, बहीण भावाशीं आणि मित्र मित्रांशीं भांडतात. त्यांच्या कलहाचा परिणाम कधीं कधीं असा होतो कीं, ते हातांनी, दगडांनी,

दांड्यांनी किंवा शस्त्रांनी एकमेकांवर प्रहार करतात, व त्यामुळें मरण पावतात, किंवा मरणान्तिक दुःख भोगतात....

२५. "भिक्षुहो, कामोपभोगांची आसक्ति सोडून देण्यानेंच मनुष्य त्यांपासून मुक्त होतो. (केवळ बाह्यात्कारी कामोपभोगांचा त्याग केला, तर त्यांपासून मुक्ति मिळते असें नाहीं.)"

२६. त्यानंतर दुसरें एक महत्त्वाचें 'कामसुत्त' नांवाचें सुत्त सुत्तनिपातांत आहे. तें बरेंच प्राचीन असून त्याच्यावर महानिद्देसांत विस्तृत टीका केलेली आढळते. यासाठीं तें समग्र येथें देण्यांत येत आहे.

कामं कामयमानस्स तस्स चे तं समिज्झति ।
अद्धा पीतिमनो होति लद्धा मच्चो यदिच्छति ॥ १ ॥
तस्स चे कामयानस्स छन्दजातस्स जन्तुनो ।
ते कामा परिहायन्ति सल्लविद्धो व रुप्पति ॥ २ ॥
यो कामे परिवज्जेति सप्पस्सेव पदा सिरो ।
सोमं विसत्तिकं लोके सतो समतिवत्तति ॥ ३ ॥
खेत्तं वत्थुं हिरञ्ञं च गवस्सं दासपोरिसं ।
थियो बन्धू पुथू कामे यो नरो अनुगिज्झति ॥ ४ ॥
अबला नं बलीयन्ति मद्दन्ते नं परिस्सया ।
ततो नं दुक्खमन्वेति नावं भिन्नमिवोदकं ॥ ५ ॥
तस्मा जन्तु सदा सतो कामानि परिवज्जये ।
ते पहाय तरे ओघं नावं सित्वा व पारगूति ॥ ६ ॥

(विषयांची इच्छा करणाऱ्याची जर ती इच्छा तृप्त झाली, तर इच्छित वस्तूचा लाभ झाल्यामुळें त्याला खरोखरच आनन्द होतो ॥ १ ॥ पण विषयोपभोगांत त्या प्राण्याची वासना दृढमूल झाली, आणि त्या उपभोग्य वस्तु नष्ट झाल्या, तर तो बाणानें विद्ध झाल्याप्रमाणें दुःख पावतो ॥ २ ॥ सर्पमुखापासून जसा

आपला पाय आपण दूर ठेवतों, तसा जो दूरूनच कामोपभोग वर्ज्य करतो, तो स्मृतिमान् इहलोकीं तृष्णेला जिंकतो ॥ ३ ॥ शेत, बागबगीचे, धन, गाई आणि घोडे, दास आणि नोकर, स्त्रिया आणि बंधु, अशा प्रकारच्या अनेक कामोपभोगांची जो मनुष्य हांव धरतो, त्याचे अबल प्रतिस्पर्धी बलवान् होतात; व त्याला अनेक विघ्नांची बाधा होते. त्यामुळें फुटलेल्या नावेंत जसें पाणी, तसें त्यांच्या अन्तःकरणांत दुःख शिरतें ॥ ४-५ ॥ म्हणून प्राण्यानें सदोदित सावधानपणें कामोपभोग वर्जावे. नावेंत शिरलेलें पाणी काढून जसे पार जातात, त्याप्रमाणें कामोपभोग सोडून त्यानें ओघ तरून जावें ॥ ६ ॥ )

२७. मनुष्याच्या अन्तःकरणांत तृष्णेचे अंकूर फुटूं लागतात, तेव्हां ते अत्यंत सुंदर दिसतात; पण तृष्णेचें जंगल माजून जेव्हां तें त्याच्या अन्तःकरणाला पछाडतें, तेव्हां त्याच्या जीविताचा समूळ विध्वंस होतो. यासंबंधीं एक उत्कृष्ट उपमा मज्झिमनिकायांतील चूळधम्मसमादान सुत्तांत सांपडते, ती अशी :— "ग्रीष्म ऋतूच्या अखेरीस मालुवा[1] लतेला फळें आलीं, व एक फळ फुटून त्याचें बीज एका शालवृक्षाखालीं पडलें. त्या शालवृक्षावर रहाणारी देवता[2] भयभीत झाली. तेव्हां तिच्या आप्तमित्र वनदेवता गोळा होऊन म्हणाल्या कीं, 'तूं भिऊं नकोस. कदाचित् हें बीज मोर किंवा मृग खाऊन टाकील, अग्नि

---

१ ही लता हिमालयाच्या पायथ्याशीं उगवते, व ती ज्या वृक्षावर चढते त्या वृक्षाचा समूळ नाश करते, अशी समजूत होती.

२ देवता हा शब्द जरी स्त्रीलिंगी असला तरी त्याचा अर्थ देव किंवा देवी असा होऊं शकतो. वृक्षाधिष्ठित देवता म्हणजे त्या वृक्षाचा आत्माच म्हणाना. येथें देवता देववाचक आहे.

जाळील, वनरक्षक तें वाढूं देणार नाहींत, वाळवी तें खाईल, किंवा तें फोल निघेल.'

२८. "परंतु त्या बीजाला कोणत्याहि प्रकारें धक्का न लागल्यामुळें पावसाळ्यांत अंकुर फुटले, व त्या तरुण, मृदु आणि लुसलुशीत लतेनें त्या शालवृक्षाला आलिंगन दिलें. तेव्हां त्या शालवृक्षावर रहाणाऱ्या देवतेला वाटलें कीं, 'माझ्या आप्तमित्रांनी मला एवढें भयभीत करून कां सोडलें ? मला तर ह्या तरुण लतेचा स्पर्श सुखकारक होतो !' परंतु हळू हळू मालुवा लता वाढत गेली. तिनें त्या सर्व वृक्षाला वेढलें, व त्याच्या मोठमोठ्या फांद्यांत शिरून त्या खालीं पाडल्या. तेव्हां वृक्षदेवता आपल्याशींच म्हणाली, 'अहाहा ! हेंच तें भय जें माझ्या आप्तमित्रांना वाटत होतें ! ज्याच्यामुळें आज मी अत्यंत दुःखकारक वेदना अनुभवीत आहें !"

२९. तृष्णेपासून उद्भवणाऱ्या कार्यकारणपरंपरेचें पर्यवसान अत्यंत अपायकारक गोष्टींत कसें होतें, हें दीघनिकायांतील महानिदान सुत्तांत वर्णिलें आहे; तें असें—

इति खो पनेतं आनन्द वेदनं पटिच्च तण्हा, तण्हं पटिच्च परियेसना, परियेसनं पटिच्च लाभो, लाभं पटिच्च विनिच्छयो, विनिच्छयं पटिच्च छन्दरागो, छन्दरागं पटिच्च अज्झोसानं, अज्झोसानं पटिच्च परिग्गहो, परिग्गहं पटिच्च मच्छरियं, मच्छरियं पटिच्च आरक्खो, आरक्खं पटिच्च आरक्खाधिकरणं दण्डादान - सत्थादान - कलह - विग्गह - विवाद - तुवंतुवं - पेसुञ्ञ-मुसावादा अनेके पापका अकुसला धम्मा संभवन्तीति ॥

( याप्रमाणें, हे आनन्द, वेदनेमुळें तृष्णा, तृष्णेमुळें पर्येषणा, पर्येषणेमुळें लाभ, लाभामुळें निश्चय, निश्चयामुळें आसक्ति, आसक्तीमुळें अध्यवसान, अध्यवसानामुळें परिग्रह, परिग्रहामुळें

मात्सर्य,[1] मात्सर्यामुळें आरक्षा, आरक्षेमुळें आरक्षा ठेवल्या-कारणानें दण्डादान, शस्त्रादान, कलह, विग्रह, विवाद, तूंमी, पैशुन्य, असत्य भाषण इत्यादि अनेक पापकारक अकुशल गोष्टी उद्भवतात. )

३०. एकादी व्यक्ति जेव्हां विषयवासनांनी बद्ध होते तेव्हां त्या व्यक्तींत वर सांगितलेल्या तीन उताऱ्यांतील विकार स्पष्ट दिसून येतात. पुष्कळ मेहनत करून थोडाबहुत पैसा बँकेंत ठेवला, व जर ती बँक बुडाली, तर त्यामुळें मनुष्य खिन्न होतो, एवढेंच नव्हे, तर कधीं कधीं वेडा देखील होतो. या संपत्तीसाठीं क्षत्रिया-क्षत्रियांत, ब्राह्मणा-ब्राह्मणांत वगैरे मारामाऱ्या कशा होतात हें कोणाला सांगावयाला नकोच. कुटुंबा-कुटुंबांत होणाऱ्या भांडणांचें प्रदर्शन आजकालच्या कोर्टांत वारंवार होत असतें. तेव्हां वैयक्तिक तृष्णेमुळें किती घातपात होतात याच्यावर विशेष टीका करण्याचें कारण दिसत नाहीं. वरच्या उताऱ्यांत थोडाबहुत फेरफार करून तो मजकूर जशाच्या तसा आजकालच्या परिस्थितीलाहि लागू करतां येण्याजोगा आहे. परंतु ही तृष्णा किंवा विषयवासना जेव्हां सामाजिक स्वरूपांत परिणत होते, तेव्हां मात्र तिचें खरें स्वरूप जाणणें विद्वानांनाहि कठिण जातें; व ते देखील पर्यायानें सर्व घातक गोष्टींना कारणीभूत होतात.

३१. उदाहरणार्थ भिक्षुसंघाचीच गोष्ट घ्या. भिक्षूची वैयक्तिक संपत्ति म्हटली म्हणजे तीन चीवरें व एक भिक्षापात्र; तेंहि मातीचें किंवा फारच झालें तर लोखंडाचें असावयाचें.

---

१ मात्सर्य म्हणजे आपल्या संपत्तीचा किंवा ज्ञानाचा फायदा इतरांस मिळूं नये अशी बुद्धि.

ण रहाण्याला निवाऱ्याची जागा घेण्यास मनाई नव्हती;
हणून श्रद्धाळू लोक विहार बांधूं लागले; व भिक्षूंची वासना
ळावत जाऊन तिचें पर्यवसान परिग्रहांत झालें. म्हणजे
वेहाराच्या सेवेसाठीं नोकरचाकर, जमीनजुमला इत्यादिक
र्व कांहीं ठेवावें लागलें; आणि त्याची आरक्षा करण्यासाठीं
ाजांची मदत घ्यावी लागली. तिबेटसारख्या ठिकाणीं राजांना
ाजूला सारून भिक्षुसंघानें हें काम आपल्याच हातीं घेतलें.
केवळ शस्त्रानेंच शत्रूचा प्रतिकार शक्य नसल्यामुळें भिक्षूंना
खोट्यानाट्या गोष्टी रचाव्या लागल्या; व राजकारणाच्या
रूपानें पैशुन्यहि अंगिकारावें लागलें. भिक्षुसंघाचा इतका
अधःपात झाला असतांहि त्यांतील व्यक्तींना आपली अवनति
होत आहे, हें समजणें कठिण झालें. 'मी माझे आचार नीट
ठेवीत आहें, शीलाचे नियम पूर्णपणें पाळीत आहें, ध्यान-
समाधींत दक्ष आहें, व कधीं कधीं जर थोडीशी दंतकथा रचतों,
तर ती केवळ संघाच्या फायद्यासाठीं, त्यांत माझा स्वार्थ नाहीं,'
अशा विचारानें विद्वान् भिक्षुहि खोट्यानाट्या गोष्टी रचण्यास
प्रवृत्त होत असावेत. म्हणजे, सांघिक तृष्णेमुळें आपला हा
अधःपात होत आहे, याची त्यांना जाणीव होणें कठिण पडे.

३२. 'उंट सुईच्या छेदांतून जाऊं शकेल, परंतु श्रीमंत
स्वर्गांत जाऊं शकणार नाहीं', असा उपदेश करणाऱ्या ख्रिस्ताचे
भक्त कसे परिग्रहवान् बनले हेंहि बुद्धाच्या भिक्षुसंघाच्या
उदाहरणावरून स्पष्ट दिसून येणार आहे. पाद्रींच्या संघानें या
बाबतींत भिक्षुसंघावर ताण केली यांत शंका नाहीं. भिक्षु केवळ
आपल्या विहारांच्या रक्षणापुरतेंच पुराण रचीत असत. पण
ह्या पाद्री लोकांनी तर सगळ्या जगाचें साम्राज्य कमावण्याचा
घाट घातला; व क्रुसेडसारखीं भयंकर युद्धें सुरू केलीं ! तात्पर्य

हें कीं, जी तृष्णा व्यक्तीमध्यें परिणत झाली असतां लवकरच कुरूप दिसते व अपायकारक होते, तीच सांघिक स्वरूपानें परिणत झाली, तर तिचें सौंदर्य लवकर नष्ट होत नाहीं; व तिचे भयंकर परिणाम समजण्यास कालावधि लागतो.

३३. पाद्री लोकांचीं दुष्कृत्यें बाहेर येऊं लागलीं. प्रसिद्ध फ्रेंच ग्रंथकार व्हाल्टेर यानें तर त्यांचा एकसारखा पिच्छाच पुरवला. त्यांच्याविषयीं बहुजनसमाजाची श्रद्धा नष्ट होत चालली. तेव्हां तृष्णेला पाद्रींच्या संघाचें आश्रयस्थान सतत वास करण्याला धोक्याचें वाटूं लागलें. तिनें एक नवीन स्थान शोधून काढलें; व उतारवयाची वेश्या जशी शृंगारभूषणांच्या साहाय्यानें तरुण बनते व स्थानांतर करून पुरुषांना मोह पाडते, तसा तिनें आपल्या अभिनव वेशाच्या आश्रयानें लोकांना मोह पाडण्यास सुरुवात केली. तिचें हें नवें स्थळ म्हटलें म्हणजे राष्ट्रीयत्व होतें. येथें तिचा प्रभाव विशेष पडला. पाद्रींचा संघ म्हटला म्हणजे सामान्य जनतेपासून अलिप्त असावयाचा. तेव्हां त्याच्याविषयीं सामान्य जनतेंत अनादर उत्पन्न करणें सोपें होतें. पण ह्या राष्ट्रीयत्वाचा प्रकार तसा नाहीं. राष्ट्र म्हटलें म्हणजे लहानमोठ्या सर्व लोकांचें. तेव्हां तृष्णेला हें स्थान चांगलें मिळालें; व परवांच्या महायुद्धापर्यंत तिची या स्थळीं चांगली चंगळ चालली.

३४. महानिदान सुत्तांतील कार्यपरंपरा सध्याच्या राष्ट्रीयत्वाला कशी लागू पडते, ह्याचें एक उदाहरण देणें योग्य वाटतें; व तें आम्ही आमच्याशीं ज्यांचा निकट संबंध आहे, अशा इंग्रजांच्या राष्ट्रीयत्वाच्या आधारें दाखवूं इच्छितों.

३५. दुष्काळ आणि रोगांच्या साथी वेळोवेळीं जगांतील सर्व राष्ट्रांत फैलावत असतच. परंतु त्यांची जाणीव फार थोड्या

राष्ट्रांना होत असे. सोळाव्या शतकांत प्रथमतः ही जाणीव इंग्लंड देशाला झाली, असें म्हणण्यास हरकत नाहीं. ह्या वेदनेमुळें इंग्लंडच्या वरिष्ठ वर्गांत राष्ट्रीय तृष्णा उत्पन्न झाली. कसें तरी करून आपल्या राष्ट्राची संपत्ति वाढविली पाहिजे, असें त्यांस वाटूं लागलें. ह्या तृष्णेमुळें पर्येषणेला सुरुवात झाली. तिकडे अमेरिकेंत वसाहती करण्यासाठीं धांव घे, इकडे ईस्ट इंडिया कंपनी स्थापन करून पूर्वेकडील व्यापारांत फायदा मिळवण्याची खटपट कर, असे प्रयत्न सुरू झाले. या पर्येषणेंत कधीं लाभ व कधीं अलाभ होऊं लागला. तेव्हां त्यासाठीं निश्चय करणें जरूर पडलें. जेथें लाभ होईल तेथेंच आपलें घोडें पुढें दामटावें, व जेथें अलाभ होईल अशा ठिकाणीं माघार घ्यावी, असा प्रकार सुरू झाला. तेव्हां लाभाच्या जागा दृढ करण्याचें अध्यवसान बळावलें; व त्यामुळें परिग्रह उत्पन्न झाला; ही माझी हद्द, ती इतरांची अशा रीतीनें अधिकारक्षेत्राचें जाळें पसरूं लागलें. त्यायोगें आपल्या संपत्तीबद्दल मात्सर्य उत्पन्न झालें, व आरक्षा ठेवणें भाग पडलें. समुद्रावर स्वामित्व रहाण्यासाठीं इंग्रजांचें आरमार इतर सर्व आरमारापेक्षां बळकट असलें पाहिजे, अशी राष्ट्रीय दृष्टि बनली; व इतरांची अल्पस्वल्प स्पर्धा दिसून आल्याबरोबर त्यांचा प्रतिकार करण्यास ह्या शस्त्र-सामग्रीचा उपयोग होऊं लागला; आणि कलह, विग्रह, विवाद, हमरीतुमरी, पैशुन्य किंवा राजकारण आणि असत्य भाषण अथवा वर्तमानपत्री प्रचार इत्यादिक अनेक पापकारक, अकुशल गोष्टींचा प्रादुर्भाव झाला.

३६. इंग्लंडांत वाढणाऱ्या ह्या राष्ट्रीय तृष्णेच्या बीजाला भिणारे लोक नव्हते असें नाहीं. गोल्डस्मिथ म्हणतो,

'Ill fares the land, to hastening ills a prey,
where wealth accumulates, and men decay.'

( ह्या देशाची दुर्दशा होत आहे. त्वरित येणाऱ्या आपत्तींचा तो शिकार बनला आहे. येथें संपत्ति एकवटत आहे, पण माणसांचा ह्रास होत आहे. ) पुन्हा तो म्हणतो,

'While thus the land, adorn'd for pleasure all
In barren splendour feebly waits the fall.'

( याप्रमाणें सर्व देश ऐषआरामासाठीं निर्जीव भपक्यानें शृंगारलेला आहे खरा, तरी दुर्बलत्वामुळें तो च्युत होण्याच्या बेतांत आहे. ) गोल्डस्मिथचें हें (The Deserted Village) सर्वच काव्य इंग्लंडला भावि संकटांचा इषारा देणाऱ्या विचारांनी भरलेलें आहे. पण त्याला पुसतो कोण ? तरुण मालुवा लतेच्या आलिंगनानें जसा शालवृक्षाचा, तसा इंग्लंडचा अन्तरात्मा तरुण राष्ट्रीयतृष्णेनें नुसता भांबावून गेला होता. मोठमोठाले राजकारणी पुरुष, ज्यांचें खाजगी वर्तन अनिंद्य असे, ते देखील राष्ट्रीय लोभासाठीं वाटेल तीं राजकारणें करण्यास तयार असत; व तीं वाईट नव्हेत, अशी त्यांची ठाम समजूत असे ! देशकार्यासाठीं, म्हणजे देशांत इतर देशांतील संपत्ति आणण्यासाठीं कोणतेंहि कुकर्म सत्कर्म समजलें जात असे !

३७. ह्या राष्ट्रीय तृष्णेचा विकास होतां होतां तिनें प्रथमतः इंग्रजी साम्राज्याची उत्तर-अमेरिकारूपी मोठी शाखा तोडून टाकली. इतक्यांत ह्या वृक्षाला पूर्वेकडे हिंदी साम्राज्याच्या रूपानें फांटे फुटूं लागले. तेव्हां इंग्लंडला ह्या तृष्णेबद्दल तिटकारा न येतां आणखीहि मोह उत्पन्न झाला. परिणामीं गेल्या महायुद्धाचा प्रसंग उद्भवला. तेव्हां ह्या तृष्णेच्या कार्याला स्पष्टपणें सुरुवात झालेली दिसूं लागली. वसाहती जवळ जवळ विभक्त झाल्या, व आयर्लंड विभक्त झाला," एवढेंच नव्हे, तर तो मूळ वृक्षाला जाचक होऊं लागला. तरी ह्या तृष्णेला आफ्रिकेंतील

आणि पूर्वेकडील शाखांचा आश्रय आहेच. आणि त्या शाखांचें पूर्ण निर्दलन केल्यावांचून ही तृष्णा स्वयमेव नष्ट होईल, अशीं चिह्नें दिसत नाहींत.

३८. स्पेनच्या आरमाराचा विध्वंस केल्यावर इंग्रजांच्या या राष्ट्रीय तृष्णेला हवा तेवढा वाव मिळाला. युरोपीय राष्ट्रें आपापसांत भांडण्यांत गुंतलीं असल्यामुळें आरमाराच्या बाबतींत त्यांना इंग्रजांशीं स्पर्धा करणें शक्य नव्हतें. अमेरिका आपलें आरमार वाढवून इंग्रजांवर मात करूं शकली असती. पण तसें करण्याची तिला मुळींच जरूरी नव्हती. कां कीं, खुद्द अमेरिकेंतच वाटेल तेवढी संपत्ति हस्तगत करतां येण्याजोगी होती. अर्थात् इंग्लंडला 'समुद्रराज्ञी' ही पदवी पटकावणें सोपें गेलें. परंतु कामसुत्तांत म्हटल्याप्रमाणें आज त्यांचे अबल प्रतिस्पर्धी बलवान् होत आहेत ( अबला नं बलीयन्ति ). भूमध्यसमुद्रांत इटली आणि फ्रान्स या दोन राष्ट्रांचीं आरमारें एकवटलीं, व त्यांना त्या देशांतील युद्धविमानांची जोड मिळाली, तर इंग्लंडचा ताबा भूमध्यसमुद्रावरून जाण्यास फार दिवस लागावयाचे नाहींत. आणि जर एकदां हा जलमार्ग इंग्लंडच्या हातांतून गेला, तर त्याचें पूर्वेकडील साम्राज्य टिकाव धरूं शकणार नाहीं. म्हणजे इंग्लंडच्या साम्राज्याच्या हांवेमुळें स्वतः इंग्लंड कमकुवत होत असून हीं आजूबाजूचीं दुर्बळ राष्ट्रें बलवान् होत चाललीं आहेत, व त्यायोगें इंग्लंडच्या मार्गांत अनेक विघ्नें उपस्थित होत आहेत (मद्दन्ति नं परिस्सया).

३९. तात्पर्य, वैयक्तिक तृष्णेपेक्षां सांघिक तृष्णा अधिक भयंकर आहे; व सांघिक तृष्णेपेक्षां राष्ट्रीय तृष्णा अधिक हानिकारक आहे. आरंभीं आरंभीं जरी ती मोठी नाजुक आणि सुंदर दिसत असली, तरी कांहीं कालानें तिचे परिणाम अत्यंत

घातुक झाल्यावांचून रहात नाहींत. सांघिक किंवा राष्ट्रीय तृष्णा वरिष्ठ वर्गांत शिरते, व बुद्धिमत्तेंत मागसलेल्या लोकांवर पोसते. पण जेव्हां ह्या मागसलेल्या लोकांकडून प्रतिकाराला सुरुवात होते, तेव्हां ती त्या संघावर आणि त्या राष्ट्रावरच उलटते. या तृष्णेमुळें स्पेन देशानें अनेक मागसलेल्या लोकांवर अनेक प्रकारचे अत्याचार केले. त्यामुळें ते देश स्पेन देशापासून विभक्त झाले, आणि स्पेन देश निर्वीर्य आणि हताश होऊन बसला. असें असतां आजकाल इटली आणि जर्मनी ह्याच तृष्णालतेला मोठ्या आनंदानें आलिंगन देऊन झुलत आहेत. ह्यांतच सगळ्या युरोपीय राष्ट्रांच्या दुःखाचें मूळ आहे.

## अपरिग्रह

४०. तृष्णेवर किंवा कामवासनेवर इलाज म्हटला म्हणजे अपरिग्रह होय, असें पार्श्वाचें आणि बुद्धाचें म्हणणें दिसतें. पार्श्वानें तर आपल्या चार यामांत अपरिग्रहाचा समावेश केला; व वरील चार उताऱ्यांतच नव्हे, तर दुसऱ्या अनेक ठिकाणीं उपभोग्य वस्तूंचा त्याग करण्याचा बुद्धाचा उपदेश सांपडतो. बुद्धाचा आणि तत्समकालीन पार्श्वाच्या परंपरेंतील वर्धमान तीर्थंकराचा परिग्रहासंबंधीं तपशिलाचा मतभेद होता; मुद्द्याचा मतभेद नव्हता. बायको, दासदासी, वतनवाडी इत्यादिक सर्व उपभोग्य वस्तूंचा त्याग करावा असा दोघांचाहि उपदेश असे. फक्त शरीराला जरूर लागणारें वस्त्रप्रावरण जवळ ठेवावें असें बुद्धाचें म्हणणें, व त्याचाहि त्याग करावा असें वर्धमान तीर्थंकराचें म्हणणें होतें. पण हा बौद्धांचा आणि जैनांचा अपरिग्रह त्यांच्या संघांपुरताच होता. पांचशें भिक्षूंनी आपल्या बायका

आणि दासदासी सोडून संघांत प्रवेश करावा, व दुसरीकडे एकाच राजानें त्यांच्याहिपेक्षां दुप्पट बायका, आणि चौपट दासदासी ठेवाव्या, असा ह्या अपरिग्रहाचा प्रकार होत असे. याप्रमाणें अपरिग्रहाचें क्षेत्र आकुंचित झाल्याकारणानें त्याजपासून इष्ट परिणाम होण्याऐवजीं अनिष्ट परिणाम घडून आले.

४१. बायका आणि दासदासी सोडून पुष्कळ बुद्धिमान् लोक भिक्षु आणि जैन साधु झाले, तरी निर्वाहाची व निवाऱ्याच्या जागेची त्यांना आवश्यकता होतीच; व ती सामान्य जनतेला पुरी पाडतां येणें शक्य नव्हतें. कां कीं, ह्या संघांची वाढ एकसारखी होत चालली होती. तेव्हां ह्या संघांना राजांकडून इनामें मिळविणें भाग पडलें. त्यायोगें ते परिग्रही बनले; आणि परिग्रहापासून उद्भवणारे सर्व दोष त्यांच्यांत शिरले. सारांश, परिग्रहापासून इतर जनतेप्रमाणें हे संघहि मुक्त राहूं शकले नाहींत. मात्र त्यांचा उपदेशांत तेवढा अपरिग्रह बाकी राहिला.

४२. बौद्ध आणि जैन सगळया परिग्रहांत स्त्री परिग्रह मोठा समजत असत. उघडच आहे कीं, एकदां बायको आली म्हणजे तिच्या मागोमाग घरदार, नोकर चाकर, बागबगीचे हें सगळें क्रमाक्रमानें यावयाचेंच. तेव्हां त्यांच्या मताप्रमाणें स्त्री परिग्रहासारखा दुसरा परिग्रह नव्हता; आणि म्हणूनच संघाच्या नियमाप्रमाणें कोणत्याहि रीतीनें स्त्रीशीं संबंध ठेवणें हा मोठा गुन्हा समजला जात असे. भिक्षुणीसंघांतील भिक्षुणींनाहि पुरुषांशीं कोणत्याहि रीतीनें निकट संबंध ठेवतां येत नसे. स्त्रीपुरुषांचा संबंध परस्परांना बाधक आहे, व त्याच्यापासूनच सर्व संसारदुःख वाढतें अशी त्यांची समजूत होती. परंतु अनुभवावरून असें दिसून आलें आहे कीं, अशा रीतीनें भिक्षूंचे आणि

भिक्षुणींचे संघ स्थापल्यानें उपायांपेक्षां अपायच जास्त घडून आले. प्रथमावस्थेंत हे संघ जरी नीतिमान् होते, तरी परिग्रही झाल्यानंतर त्यांची नीतिमत्ता बिघडत गेली; व त्यांतूनच अनेक तंत्रें, लिंगपूजा इत्यादिक बीभत्स प्रकारांचा प्रादुर्भाव झाला.

४३. अगदीं अलीकडे स्त्रीस्वातंत्र्याची कल्पना निघाल्यापासून, स्त्री हा परिग्रह नव्हे, या विचाराची एकसारखी अभिवृद्धि होऊं लागली आहे. जोंपर्यंत स्त्रीला परिग्रह समजण्यांत येईल, तों पर्यंत त्या समाजाची नैतिक उन्नति झाली, असें म्हणतां यावयाचें नाहीं. अहिंसेची आणि संस्कृतीची कसोटी म्हटली म्हणजे स्त्रीस्वातंत्र्यच होय. मनुष्याच्या हिंसक बुद्धीनें स्त्रियांना दास बनवलें. स्त्रियांच्या अन्तःकरणांत निस्सीम मातृप्रेम नसतें, तर त्यांनी हें दास्य कधींहि स्वीकारलें नसतें; आत्महत्येनें सगळ्या मानवजातीचाच अन्त करून टाकला असता. पडद्यासारख्या भयंकर प्रथांचा स्त्रियांनी अवलंब करूनहि जर आपणाला अद्यापि जिवंत ठेवलें असेल, तर तें केवळ या मातृप्रेमामुळेंच. स्त्रियांना अशा रीतीनें कोंडून टाकण्यांत मनुष्याच्या हिंसात्मक बुद्धीची मात्र पराकाष्ठा झाली आहे. तेव्हां अहिंसात्मक संस्कृतीचा जर पूर्णपणें विकास व्हावयाचा असेल, तर स्त्रीला परिग्रह न समजतां सर्वतोपरि स्वतंत्रता दिली पाहिजे. स्वतंत्र स्त्रियांच्या साहाय्यानें जी संस्कृति उदय पावेल तीच अहिंसात्मक, अतएव मानवजातीला सुखकारक आणि हितावह होईल.

४४. आजकाल पाश्चात्य देशांत जें स्त्रीस्वातंत्र्य आहे, तें वरपांगी आहे, असें आम्हास वाटतें. बहुतेक स्त्रिया आर्थिक दृष्टीनें पुरुषांवर अवलंबून असल्याकारणानें स्वतंत्र नसतात.

त्यांना आपले नवरे व्यसनी असले, तरी केवळ संततीच्या मोहा-मुळें त्यांच्याकडून सोडचिठ्ठी घेऊन मोकळें होतां येत नाहीं. एकाद्या बाईनें नवऱ्याला सोडचिठ्ठी दिली, तर ती कसा बसा आपला निर्वाह करूं शकेल. पण आपल्या मुलांचें काय होईल, या विवंचनेनें ती तसें करीत नाहीं, व आपल्या नवऱ्याचें दुर्वर्तन मुकाट्यानें सहन करते. कारकुनी वगैरे करून निर्वाह करणाऱ्या पुष्कळ स्त्रिया पाश्चात्य देशांत आहेत. पण त्याहि स्वतंत्र नाहींत. त्यांपैकीं एकाद्या बाईला एकादें मूल असावें अशी उत्कट इच्छा असली, तरी ती पुरी पाडतां येत नाहीं. त्यासाठीं पुरुषाचें कायमचें दास्य पतकरावें लागेल, या भयानें ती शेवटपर्यंत अविवाहित रहाते, व मातृप्रेमाला मुकते.

४५. सोव्हियट रशियांत स्त्रियांना खरें स्वातंत्र्य देण्यांत आलें आहे, आणि त्यावर सर्व भांडवलशाही देशांत एकसारखें काहूर माजून राहिलें आहे; स्त्रियांना राष्ट्रीय मालमत्तेंत दाखल करण्यांत आलें, अशी ओरड भांडवलशाही वर्तमानपत्रें करीत आहेत, व त्याचा प्रतिध्वनि दिल्लीपर्यंत पोंचला आहे.[1] ता० १२

---

१ कम्युनिस्ट लोक स्त्रियांना राष्ट्रीय करूं इच्छितात, ही ओरड फार जुनी आहे. इ० स० १८४८ सालीं मार्क्स आणि एंगल्स यांनी प्रसिद्ध केलेल्या कम्युनिस्ट जाहीरनाम्यांत पुढील मजकूर आढळतो.

"तुम्ही कम्युनिस्ट लोक स्त्रियांना राष्ट्रीय करूं पहातां, अशी एका कंठरवानें भांडवलवाल्यांनी ओरड चालविली आहे.

"भांडवलवाल्यांना स्त्रिया म्हणजे एक उत्पत्तीचें साधन वाटतें. संपत्तीचीं साधनें सार्वजनिक करावीं, असें जेव्हां ते ऐकतात, तेव्हां साह-जिकपणें त्यांना असें वाटतें कीं, जो इतर साधनांवर प्रसंग तोच स्त्रियां-वरहि येणार आहे.

सप्टेंबर ( १९३५ ) रोजीं, मध्यवर्ती कायदेमंडळांत भाषण करतांना नामदार सरकार म्हणाले, "सध्याच्या कायद्याप्रमाणें मालमत्ता जप्त करणें अगर उत्पादनाचीं साधनें राष्ट्रीय मालकीचीं करणें अशा तऱ्हेची कोणतीहि नवी कल्पना प्रतिपादण्याला शिक्षा सांगितलेली नाहीं; आणि स्त्रिया हें उत्पादनाचें साधनच आहे." ( ऑर्डर ऑर्डर असा आवाज ) श्री. सत्यमूर्ति—कायदेमंत्र्यांनाहि सभ्यतेच्या नियमाचें उल्लंघन करतां येत नाहीं. नामदार सरकार—ही कल्पना हिंदुस्थानांत प्रतिपादण्यांत आली, असें मी म्हटलें नाहीं. ती कांहीं पुस्तकांत प्रतिपादण्यांत आली आहे....

४६. सध्याचा अधिकारी वर्ग किती बेजबाबदारीनें व उर्मटपणानें वागतो, याचें हें उत्कृष्ट उदाहरण आहे. आमच्या ह्या कायदेमंत्र्यानें भांडवलशाही देशांतील सोव्हियटद्वेष्ट्या वर्तमानपत्रांपलीकडे दुसरीं कांहीं या विषयावरील पुस्तकें वाचलीं असतील हें संभवत नाहीं. तसें असतें तर हें विधान त्यांनी केलें नसतें. रशियामध्यें सर्व संपत्तीचे मालक जसे सर्व कामगार पुरुष आहेत, तशाच सर्व स्त्रियाहि आहेत. फरक एवढाच कीं, पुरुषांपेक्षां स्त्रियांना सवलती जास्त मिळतात. कामगार स्त्री गरोदर असली तर तिला बाळंतपणापूर्वी तीन महिने व नंतर तीन महिने अशी सहा महिने हक्काची पगारी रजा मिळते; आणि

---

"सध्या जी बायकांची केवळ साधनांत गणना केली जात आहे, ती नाहींशी करावी हें जें खरें ध्येय, त्याची त्यांना नुसती शंका देखील येत नाहीं."

या ओरडीला आजला ऐंशी नव्वद वर्षें होत आलीं. भांडवलवाले आणखी किती दिवस ती चालू ठेवणार आहेत, तें कोणी सांगावें ?

नंतर कामाच्या तासांत तिच्या मुलाची काळजी सरकारतर्फे सुशिक्षित दायांकडून घेतली जाते. तें मूल जरा मोठें झाल्यावर त्याच्या शिक्षणाची सर्व जबाबदारी सरकारच घेतें. एवढेंच नव्हे, तर दुपारच्या वेळीं त्याचें जेवणहि त्याला सरकारी शाळेंतच मिळत असतें. ज्या देशांत स्त्रियांना इतक्या सवलती आहेत, त्या देशांत स्त्रियांना राष्ट्रीय मालकीचें करण्यांत आलें आहे, किंवा कम्युनिस्ट इतर देशांतहि असेंच करूं पहातात, असें म्हणणें निव्वळ खोडसाळपणाचें समजलें पाहिजे. तसें म्हणण्यापेक्षां रशियांत पुरुषांना राष्ट्रीय मालकीचें करण्यांत आलें आहे, असें म्हटलें तर तें कदाचित् शोभेल. कां कीं, स्त्रियांना एवढ्या सवलती देण्याचा आणि भावी जनतेला उत्कृष्ट शिक्षण देण्याचा स्त्रियांपेक्षा जास्त भार पुरुषांवर आहे.

४७. नामदार सरकारांसारखीं विधानें इतर देशांतील अधिकारी माणसांनी केलेलीं आमच्या पहाण्यांत नाहींत. परंतु सर्व ठिकाणीं अधिकारी वर्गाची विचारसरणी मात्र एकच आहे. त्यांना मागसलेल्या वर्गावरच नव्हे, पण आपल्याच वर्गांतील स्त्रियांवरहि अधिकार गाजवण्याची संवय झालेली आहे; आणि त्यांच्या दृष्टीनें आपल्या ऐषआरामासाठीं व भावी युद्धांत तोफेच्या तोंडीं देण्यासाठीं नवीन प्राणी उत्पन्न करणारें स्त्री हें एक चालतें बोलतें यंत्र आहे! तेव्हां त्या यंत्रावर इतर यंत्रांप्रमाणें आपलाच अधिकार असावयास पाहिजे असें त्यांस वाटतें; व जे कोणी स्त्रीस्वातंत्र्याला उत्सुक असतात, त्यांच्यावर ते अशा रीतीनें तुटून पडतात.

४८. आजकाल जें जगांत प्राचीन वाङ्मय अस्तित्वांत आहे, त्यांत स्त्रीला परिग्रह मानतां कामा नये, हा विचार कोठें आढळत नाहीं. अर्थात् त्या काळीं स्त्रियांना स्वातंत्र्य मिळणें

शक्यच नव्हतें. 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति'[1] हें मनूचें वाक्य प्रसिद्ध च आहे. बौद्धांनी आणि जैनांनी भिक्षुणींचे आणि साध्वींचे संघ स्थापून स्त्रियांना बरेंच स्वातंत्र्य दिलें. परंतु तें त्यांच्या संघांपुरतेंच असे; आणि तें देखील अपत्यप्रेमाची किंमत देऊन त्यांना मिळवावें लागे. त्या विवाहबंधनांत बद्ध झाल्या, तर त्यांची गणना उत्कृष्ट संपत्तींत होत असे. अर्थात् वैदिक वाङ्मयाप्रमाणें श्रमणवाङ्मयांतहि स्त्रियांचा समावेश परिग्रहांतच केला आहे.

४९. मध्ययुगीन हिंदी ग्रंथकारांत एक तेवढा वराहमिहिर स्त्रियांची तरफदारी करणारा आढळतो. तो म्हणतो—

येऽप्यङ्गनानां प्रवदन्ति दोषान् वैराग्यमार्गेण गुणान्विहाय ।
ते दुर्जना मे मनसो वितर्कः सद्भाववाक्यानि न तानि तेषाम् ॥५॥
प्रब्रूत सत्यं कतरोऽङ्गनानां दोषोऽस्ति यो नाचरितो मनुष्यैः ।
धार्ष्ट्येन पुम्भिः प्रमदा निरस्ता गुणाधिकास्ता मनुनात्र चोक्तम् ॥६॥

बहिर्लोम्ना तु षण्मासान् वेष्टितः खरचर्मणा ।
दारातिक्रमणे भिक्षां देहीत्युक्त्वा विशुध्यति ॥ १३ ॥
अहोधार्ष्ट्यमसाधूनां निन्दतामनघाः स्त्रियः ।
मुष्णतामिव चौराणां तिष्ठ चौरेति जल्पताम ॥ १४ ॥[2]

( जे वैराग्यमार्गाचा अवलंब करून स्त्रियांचे गुण न पहातां दोष

---

१ अस्वतन्त्राः स्त्रियः कार्याः पुरुषैः स्वैर्दिवानिशम् ।
विषयेषु च सज्जन्त्यः संस्थाप्या आत्मनो वशे ॥
पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने ।
रक्षन्ति स्थविरे पुत्रा न स्त्री स्वातन्त्र्यमर्हति ॥
मनुस्मृति, अ० ९।२–३

२ बृहत्संहिता, अ० ७४

वर्णितात, ते दुर्जन आहेत, व त्यांचें तें बोलणें सद्धेतुक नाहीं, असें मला वाटतें ॥ ५ ॥ खरें बोला कीं, जो पुरुषांनी आचरला नाहीं असा कोणता दोष स्त्रियांमध्यें, सांपडतो ? केवळ धार्ष्ट्यानें पुरुषांनी स्त्रियांवर ताबा मिळवला. त्या पुरुषापेक्षां अधिक गुणी आहेत, असें मनूचेंहि म्हणणें आहे ॥ ६ ॥ जो आपल्या पत्नीचें अतिक्रमण करतो, त्याला प्रायश्चित्त म्हटलें म्हणजे त्यानें गाढवाचें चामडें लंव बाहेरच्या बाजूला करून पांघरावें, व सहा महिनेपर्यंत दारोदार भिक्षा मागावी ॥ १३ ॥ निष्पाप स्त्रियांची निंदा करणाऱ्या दुष्टांचें काय हें धाडस ? चोऱ्या करणाऱ्या चोरांनी 'चोरा थांब' म्हणून ओरडण्यासारखेंच हें आहे ॥ १५ ॥ ) [ बृहत्संहिता, अ० ७४ ]

५०. या तरफदारीबद्दल वराहमिहिराचें कौतुक करावें तेवढें थोडेंच वाटतें. तथापि, स्त्री हें अमूल्य रत्न आहे, अर्थात् त्याचें जतन अत्यंत प्रयत्नानें केलें पाहिजे, या कल्पनेपासून वराह-मिहिर मुक्त नव्हता.[1] अमेरिकेसारख्या भांडवलशाहीच्या शिखरावर चढलेल्या देशांत आजलाहि स्त्रीविषयींची कल्पना कमीजास्त प्रमाणानें अशाच प्रकारची आहे. तिच्या सुखासाठीं आणि ऐषआरामासाठीं वरिष्ठ वर्गांतील पुरुष आटोकाट मेहनत करीत असतात. आणि इतकें करूनहि वाटेल तेवढे काडीमोड होतातच ! याचें कारण असें कीं, केवळ अमूल्य रत्नांप्रमाणें जोपासना केल्यानें स्त्रियांची स्वातंत्र्यतृप्ति होत नाहीं. आपल्या कमाईवर राहतां आल्यावांचून स्त्रियांना खरें स्वातंत्र्य मिळालें

---

१. ह्याच अध्यायांत तो म्हणतो—

श्रुतं दृष्टं स्पृष्टं स्मृतमपि नृणां ह्लादजननं
न रत्नं स्त्रीभ्योऽन्यत् क्वचिदपि कृतं लोकपतिना ।

असें वाटणार नाहीं; आणि सध्याच्या भांडवलशाही जगांत मातृपद मिळवूं इच्छिणाऱ्या 'स्त्रियांना आपल्या कमाईवर अवलंबून रहातां येणें शक्य नाहीं.

५१. आर्थिक स्वातंत्र्याशिवाय स्त्रियांना खरें स्वातंत्र्य मिळणार नाहीं, या विचाराचा पुरस्कार कार्ल मार्क्स यानें केला; व आजला त्याचे अनुयायी बोल्शेव्हिक पुढारी तो विचार अंमलांत आणूं पहात आहेत. त्यांच्या मार्गांत पुष्कळ विघ्नें आहेत, यांत शंका नाहीं. त्यांत मुख्य विघ्न स्त्रियांचे संस्कार हें होय. हजारों वर्षें पारतंत्र्याच्या अंधारकोठडींत कोंडल्या गेलेल्या स्त्रियांना एकाएकीं प्रखर स्वातंत्र्याच्या सूर्यप्रकाशांत पाऊल टाकणें धोक्याचें वाटावें यांत नवल नाहीं. येथें आम्हास पॅरिस-मधील बास्तिल किल्यांत तीस वर्षेंपर्यंत कोंडलेल्या एका स्त्रीची गोष्ट आठवते. फ्रेंच राज्यक्रान्तीच्या आरंभीं सामान्य जनतेनें जेव्हां हा किल्ला पायासकट खणून टाकला, तेव्हां तेथें कोंड-लेल्या राजकीय कैद्यांबरोबर ह्या स्त्रीलाहि स्वतंत्रता मिळाली. पण ती सूर्यप्रकाश पाहून अतिशय घाबरून गेली व म्हणाली कीं, 'जर तुम्ही मला माझ्या अंधारकोठडींत नेऊन पोंचवलें नाहीं, तर मी कोणाचा तरी खून करून फांशी जाईन!' चिरकालपर्यंत अंगवळणीं पडलेले घातक संस्कार देखील माणसाला किती प्रिय होतात पहा!

५२. तेव्हां केवळ आर्थिक स्वातंत्र्यानें स्त्रीस्वातंत्र्याचा प्रश्न सुटेल असें नाहीं. त्यासाठीं स्त्रियांना व पुरुषांना सुशिक्षण मिळालें पाहिजे. स्त्रियांना आपल्या मातृपदाची योग्यता सम-जली पाहिजे; व स्त्रिया ह्या उपभोग्य वस्तु नसून त्या भावी पिढीच्या माता, अतएव पूज्य आहेत अशी पुरुषांमध्यें श्रद्धा उत्पन्न झाली पाहिजे. बोल्शेव्हिकांनी पहिली—स्त्रियांच्या

आर्थिक स्वातंत्र्याची—पायरी दृढ केली आहे; व दुसरी शिक्षणाची पायरी त्या मजबूत पायावर उभारण्याच्या बेतांत ते आहेत. दरम्यान स्त्री-पुरुषांकडून कांहीं नैतिक दोष घडून आले, तर ते क्षम्य आहेत. टवाळी करून बोल्शेव्हिकांच्या प्रयत्नांचा तिटकारा करणें अक्षम्य अपराध आहे. स्त्रीपरिग्रहापासून मानवजातीला सोडवण्याचा जर कोणी खराखुरा प्रयत्न केला असेल, तर तो मार्क्सानुयायी बोल्शेव्हिकांनीच होय; आणि यासाठीं आम्ही त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों.

५३ बुद्धकाळीं स्त्रियांच्या खालोखाल दुसरा परिग्रह म्हटला म्हणजे दासदासींचा समजला जात असे. बाबिलोनिया, इजिप्त, ग्रीस इत्यादि सर्व प्राचीन राष्ट्रांतून दासदासींची संस्था अस्तित्वांत होतीच. किंबहुना या दासांच्या संस्थेवरच त्या देशांतील सर्व संस्कृति अवलंबून असे. आमच्या इकडे या वर्गांतील लोक म्हटले म्हणजे शूद्र होत. वैदिक काळीं दासांप्रमाणेंच त्यांचाहि क्रयविक्रय होत असे. हळू हळू त्यांचें परिवर्तन निकृष्ट जातींत होत गेलें. कारण त्यांची संख्या इतकी वाढत गेली कीं, वरिष्ठ जातींच्या लोकांना त्यांना दास म्हणून आपल्या पदरीं ठेवणें अशक्य झालें. हाच प्रकार युरोपांत घडला. दासांची संख्या वाढत गेल्यावर त्यांची गणना कुळांत करणें भाग पडलें. त्या कुळांना जमीनीबरोबरच विकतां येत असे. हा प्रघात रशियांत १८६१ पर्यंत चालू होता.

५४. उत्तर अमेरिकेंतील इंग्लिश वसाहतींची वाढ होऊं लागली, तेव्हां या दासांच्या संस्थेचें जोमानें पुनरुज्जीवन झालें. दहा बारा इंग्रजी कंपन्यांनी दासांचा फायदेशीर व्यापार सुरू केला. या कंपन्या हत्यारबंद लोकांच्या मदतीनें आफ्रिकेंतील धडधाकट स्त्रीपुरुषांना व तरुण मुलांमुलींना पकडून जहाजांतून

अमेरिकेला नेत, आणि तेथील मोठमोठ्या बाजारांत त्यांची उघड-पणें विक्री करीत. हा अत्यंत क्रूरपणाचा व्यापार पुष्कळ वर्षें चालला होता; आणि अमेरिकेंतील जमीनदारांना ह्याबद्दल कांहींच वाटत नसे. अमेरिकेच्या स्वातंत्र्याचा पाया घालणारे जॉर्ज वाशिंग्टन यांजपाशीं देखील शेंकडों दासदासी होत्या.

५५. अमेरिकेंतून ह्या दास्याचा पाया खणून काढण्याचें श्रेय ॲब्राहम् लिंकनला मिळालें. त्याचें कारण दास्यामुळें गोऱ्या लोकांवरच कठिण प्रसंग येण्याचा संभव दिसूं लागला, आणि दास्याविरुद्ध असलेल्या उत्तरेकडील व पश्चिमेकडील संस्था-नांतील सर्व गोऱ्या लोकांचें नेतृत्व अकस्मात् लिंकनकडे आलें. उत्तरेकडील गोऱ्या लोकांचीं शेतें म्हटलीं म्हणजे लहान लहान असत, व तीं देखील सुपीक नव्हतीं. अर्थात् त्यांना दक्षिणेकडील दासांच्या मालकांनी चालवलेल्या अजस्र शेतीशीं स्पर्धा करतां येणें शक्य नव्हतें. दासांचे मालक आपलें धान्य स्वस्त दरानें विकूं शकत, व त्यामुळें उत्तरेकडील शेतकऱ्याच्या धान्याला बाजारांत किंमत अगदीं थोडी येत असे. यामुळें दक्षिणेकडील जमीनदार व उत्तरेकडील शेतकरी यांच्यामध्यें वैमनस्य वाढत जाणें साहजिक होतें.

५६. आयोवा वगैरे पश्चिमेकडील संस्थानें नुकतींच गोऱ्या लोकांनी वसविलीं होतीं, व दासांचे मालक आपल्या दासांना घेऊन त्या संस्थानांत प्रवेश करूं पहात होते. बेकार पण सुपीक जमिनी वाटेल तेवढ्या होत्या. परंतु एकदां हे दक्षिणेकडील दासांचे मालक आंत शिरले, तर आपल्या दासांच्या बळावर सर्व संस्थानेंच गिळंकृत करून टाकतील, असें तेथील गोऱ्या वसाहतवाल्यांना भय पडलें, व त्यामुळें त्यांची आणि उत्तरे-कडील शेतकऱ्यांची गट्टी जमली. अशा परिस्थितींत उत्तरे-

कडील व पूर्वेकडील संस्थानांतील लेखकांकडून दक्षिणेकडील दासांच्या मालकांवर जोराचे हल्ले होऊं लागले, व दिवसेंदिवस विरोध वाढत गेला. ह्या गडबडींत एकाएकीं एक गरीब शेत-कऱ्याचा मुलगा उत्तरेकडील व पूर्वेकडील गोऱ्यांच्या बहुमतानें अध्यक्ष निवडून आला. हाच अमेरिकेंतील सुप्रसिद्ध अध्यक्ष ॲब्राहम् लिंकन होय. दास्याची प्रथा दक्षिणेकडील अकरा संस्थानांच्या पलीकडे जाऊं नये, यासाठीं त्यानें प्रथमतः प्रयत्न चालविला. पण दक्षिणेकडील लोकांना तो प्रयत्न म्हटला म्हणजे दास्यविनाशाची पहिली पायरी आहे, असें वाटूं लागलें, व त्यांनी आपल्या स्वातंत्र्याचा झेंडा उभारला. चार वर्षें युद्ध चालून उत्तरेचा व पूर्वेचा जय झाला, आणि अमेरिकेंतील दास्यालाच नव्हे, तर सर्व सुधारलेल्या जगांतील दास्याला कायमची मूठमाती मिळाली.

५७. येणेंप्रमाणें सुधारलेल्या राष्ट्रांत जुन्या दास्यपद्धतीचा अंत झाला खरा, तरी दासपरिग्रहाची मनोवृत्ति अद्यापि नष्ट झालेली नाहीं. अमेरिकेंतील निग्रो लोक कायद्यानें जरी दास्या-पासून मुक्त झाले आहेत, तरी त्यांची परिस्थिति त्यांच्या दास-पूर्वजांइतकीच बिकट आहे. यत्किंचित् कारणावरून भर दिवसा मोठ्या गोऱ्या जनसमूहासमोर निग्रोंना जाळण्यांत येतें! याला अमेरिकेंत ( Lynching ) लिंचिंग ह्मणतात. गोऱ्या बायका देखील निग्रो लोकांना जाळण्यांत सामील होतात! इतर रीतीनेंहि निग्रो लोकांना पुष्कळ ताप भोगावा लागतो. एवढे कष्ट सोसून देखील निग्रो लोकांची दिवसेंदिवस अभि-वृद्धि होत चालली आहे; आणि कधींना कधीं ते आपला सूड उगवतील, असें गोऱ्या लोकांना भय वाटत आहे.

युरोपीय गोऱ्या लोकांत दासपरिग्रहाची लालसा

आफ्रिकेचे व मागसलेल्या एशिया खंडाचे लचके तोडण्यांत परिणत झाली आहे. सगळ्या काळ्या लोकांना पकडून आपले दास करण्याची जबाबदारी त्यांना नको आहे. काळ्या लोकांच्या देशांत जाऊन त्यांच्यावर ताबा मिळवावा व त्यांच्याकडून कच्चा माल तयार करवून युरोपांत आणावा, आणि आपल्या कारखान्यांच्या द्वारें पक्का माल तयार करवून अतोनात फायदा मिळवून गबर व्हावें, हें त्यांचें धोरण आहे. काळे लोक कच्चा माल तयार करतात एवढेंच नव्हे, तर त्यांना आधुनिक सुधारणांची चट लावली असतां त्यांच्या गोऱ्या मालकांनी तयार केलेला पक्का माल ते विकत घेतात. म्हणजे हे मागसलेले लोक एकाच काळीं दास आणि गिऱ्हाईकहि होतात; व पुन्हा यांना पोसण्याची जबाबदारी गोऱ्या मालकांवर रहात नाहीं.

५९. अमेरिकन मळेवाल्यांना जसा दासपरिग्रह बाधला, तशी त्याची ही नवी आवृत्ति युरोपीय गोऱ्यांना बाधणार आहे, यांत शंका नाहीं. दक्षिणेकडील संस्थानांनाच नव्हे, तर सर्वच संयुक्त संस्थानांना दास्याचें परिक्षालन आपल्या तरुण पिढीच्या रक्तप्रवाहांनी करावें लागलें. दास्यविमोचनाच्या युद्धांत लाखों तरुण अमेरिकन गोरे मारले गेले, हें इतिहासप्रसिद्धच आहे. युरोपीय गोऱ्या लोकांनी आपल्या पापक्षालनाला गेल्या महायुद्धापासून सुरुवात केली आहे. पण त्यांचीं रक्तस्नानें कधीं संपणार, हें सांगतां येत नाहीं. काळ्या लोकांवर ताबा मिळवण्याची त्यांची हांव कमी झालेली नाहीं; आणि जोंपर्यंत त्यांची ही दासपरिग्रह वासना अशीच राहील, तोंपर्यंत उत्तरोत्तर मोठमोठालीं रक्तस्नानें करून त्या पापवासनेचें त्यांना प्रक्षालन करावें लागेल.

६०. ह्या अभिनव दासवासनेंतून एक रशिया तेवढा

मोकळा झाला आहे. समरकन्द, बुखारा इत्यादि ठिकाणच्या मागसलेल्या लोकांवर झारशाहींत जे अत्याचार होत असत, ते सध्याच्या कम्युनिस्ट कारकीर्दीत अजीबात बंद झाले आहेत. एवढेंच नव्हे, तर ह्या लोकांना समानत्मतेच्या पायरीवर चढवण्याचे बोल्शोव्हिकांचे आटोकाट प्रयत्न चालू आहेत. या मुसलमानी देशांतील बायका पडद्यांत खितपत पडल्या होत्या. त्यांना बोल्शेव्हिकांनी एकदम पडद्यांतून बाहेर काढलें; आणि त्यांच्या शिक्षणाची सर्वतोपरि जबाबदारी आपल्या शिरावर घेतली. यासंबंधानें ज्या वाचकांना शक्य असेल त्यांनी Anna L. Strong या अमेरिकन विदुषीचें 'The Red Star in Samarkand' हें पुस्तक अवश्य वाचावें, आणि त्याची व मिस् मेयोच्या 'Mother India' ह्या पुस्तकाची तुलना करावी.

६१. परंतु मिस् मेयोची तारीफ करणाऱ्या भांडवलवाल्यांना हें बोल्शेव्हिकांचें कृत्य आवडावें कसें? बोल्शेव्हिक आपलें तांबडे साम्राज्य ( Red Empire ) सर्वत्र फैलावूं पहातात, अशी त्यांनी सारखी ओरड चालविली आहे. आधुनिक दासांना मुक्त करणें ही जर तांबडी साम्राज्यशाही, तर निग्रोंना मुक्त करणाऱ्या लिंकनला काळ्या साम्राज्यशाहीचा संस्थापक कां म्हणूं नये? तात्पर्य ह्या अभिनव दास्याचे दुष्परिणाम अद्यापि युरोपांतील भांडवलवाल्यांना जाणवलेले नाहींत. जोंपर्यंत आपल्या देशांतील बेकार लोकांना थोडेंबहुत वेतन देऊन स्वस्थ ठेवतां येतें, तोंपर्यंत त्यांना हें दास्य चालू ठेवतां येणें शक्य आहे. पण त्यांचा आपसांतील कलह कसा बंद पडावा? इंग्लंडला आणि फ्रान्सला यथास्थित दास आहेत; मग इटलीला कां असूं नयेत? आणि जर्मनीच्या ताब्यांतून

सुटून जे इंग्लंडच्या व फ्रान्सच्या ताब्यांत गेले, ते जर्मनीला परत कां मिळूं नयेत ?

६२. ह्या अभिनव दास्याचे दुष्परिणाम इतक्या लवकर जाणल्याबद्दल रशियन पुढाऱ्यांचें खरोखरच अभिनंदन केलें पाहिजे. सगळ्या जगाला ह्या दास्यांतून मुक्त करण्यास ते असमर्थ आहेत. तथापि आपल्या साम्राज्यांतून त्याचें त्यांनी उच्चाटन केलें आहे; आणि चीन देशाची त्यांतून सुटका व्हावी यासाठीं ते उत्कंठित दिसतात. यांत त्यांचा स्वार्थ असूं शकेल. दक्षिण अमेरिकेंतील लहान मोठ्या राज्यांना युरोपीय राजां-पासून मुक्त करण्यांत संयुक्त संस्थानांतील पुढाऱ्यांचा स्वार्थ होताच. पण तो उच्च दर्जाचा होता. आपल्या आजूबाजूला राजसत्ता बळावत गेली, तर आपल्या प्रजासत्ताक पद्धतीचा लोप होईल, हें त्यांना भय होतें; व याचसाठीं दक्षिण अमेरिकें-तील राष्ट्रांना युरोपीय राजांपासून स्वतंत्र होण्यास त्यांनी मदत केली. बोल्शेव्हिकांचा स्वार्थहि अशाच तऱ्हेचा आहे. चीन देश त्यांच्या सीमेला भिडलेला आहे. तेथें जपानी भांडवलशाहीची सत्ता स्थिर झाली, तर त्यापासून आपल्या समाजसत्तेला बाध येईल, असें त्यांना भय वाटत आहे; आणि केवळ आपल्या समाजसत्तेच्या रक्षणासाठीं चीनमध्येंहि ते समाजसत्ता स्थापन करूं पहात आहेत. अशा स्वार्थाला उच्च दर्जाचा स्वार्थ कोण न म्हणेल ?

६३. वरील विवेचनावरून असें दिसून येईल कीं, स्त्रीला काय किंवा दासदासींना काय, परिग्रहांत दाखल केल्यानें मनुष्यजातीवर अनेक संकटें ओढवतात. त्यांना सर्वथैव स्वतंत्रता देऊन समतेनें वागवणें हें मनुष्यजीवनाच्या विकासाला अत्यन्त आवश्यक आहे. बौद्धांच्या किंवा जैनांच्या समजुती-

प्रमाणें बायकामुलांना आणि दासदासींना सोडून संन्यास घेण्यानें ह्या दोन परिग्रहांपासून मनुष्यजातीची मुक्तता होणार नाहीं, हा इतिहासाचा अनुभव आहे. सर्व मनुष्यजात राहूं द्याच, पण हे श्रमण देखील ह्या परिग्रहांतून मुक्त होऊं शकत नाहींत. आरामिकांच्या आणि विहारसेवकांच्या रूपानें ते दास-परिग्रह स्वीकारतात, व त्यासाठीं खोटींनाटीं पुराणें रचून अतिपरिग्रही राजे लोकांची हांजी हांजी करण्याची त्यांच्यावर पाळी येते, हें दुसऱ्या विभागांत दर्शविण्यांत आलेंच आहे.[1] तेव्हां कार्ल मार्क्स आणि त्याचे अनुयायी समाजवादी जो मार्ग दाखवतात, तोच या बाबतींत योग्य वाटतो.

६४. स्त्री व दास यांच्यानंतर वतनवाडीच्या परिग्रहाचा प्रश्न येतो. सगळया बायकांना स्वतंत्रता मिळाली, काळया-गोऱ्यांमध्यें भेद न रहातां सर्व मनुष्य समान हक्काचे झाले, पण जमीन व उत्पादनाचीं इतर साधनें खासगी मालकीचीं राहिलीं, तर बायकांची आणि दासदासींची स्वतंत्रता अल्पकाळहि टिकावयाची नाहीं. जमीनीवर मेहनत करून पोट भरणाऱ्या सर्व कुळांचें जीवित जमीनदाराच्या हातांत रहाणार, व गिरणींत काम करणाऱ्या मजुरांचें जीवन गिरणीच्या मालकाच्या हातांत रहाणार, हें उघडच आहे. असें न व्हावें, यासाठीं बोल्शे-व्हिकांच्या म्हणण्याप्रमाणें जमीन, गिरण्या व त्यांना उपयोगी पडणारीं—ब्यांका, आगगाड्या वगैरे—सर्व साधनें सामाजिक मालकीचीं केलीं पाहिजेत.

६५. बौद्धांचा व जैनांचा उपाय या बाबतींतहि निरुपयोगी ठरला आहे. पुष्कळ माणसांनी वतनवाडी सोडून संन्यास घेतला,

---

१. वि० २।१०२–११९ पहा.

तर त्यापासून सर्व समाजाचें व कालांतरानें अशा संन्यासी संघांचेंहि नुकसानच होतें. जमिनीची लागवड करणारे कोणी तरी पाहिजेतच. सर्व स्त्रीपुरुषांनी जमिनी सोडून संन्यास घेतला, तर लवकरच सर्वांवर उपाशी मरण्याची पाळी येईल. पोटा-पाण्याची तरतूद करण्यासाठीं या संन्यासी संघांना राजे लोकां-कडून इनामें घ्यावीं लागलीं, व त्यायोगें त्यांचा अधःपात कसा झाला, हें दुसऱ्या आणि तिसऱ्या विभागांत विस्तारपूर्वक दाख-विलेंच आहे. अर्थात् वतनवाडीचा त्याग केल्यानें हा अपरिग्रह सिद्धीला जाणें शक्य नाहीं. जर सर्वांनाच जगावयाचें असेल, तर सर्वांनीच मेहनत केली पाहिजे. राजानें आणि अमीरउम-रावांनी भयंकर ऐषआरामांत व श्रमणब्राह्मणांनी ऐदीपणांत दिवस काढल्यानें श्रमजीवी समाजावर अतिशय ताण पडून त्याचा चुराडा होतो, व त्याचे दुष्परिणाम सर्वांना सारखेच भोगावे लागतात. तेव्हां वतनवाडीच्या परिग्रहाचा त्याग करा-वयाचा म्हणजे हा परिग्रह सामाजिक मालकीचा करावयाचा, हा जो समाजवाद्यांचा सिद्धान्त तोच मानवजातीच्या उन्नतीला हितकारक आहे.

## सत्याग्रह

६६. सत्याग्रह म्हणजे अहिंसा आणि सत्य ह्या दोन यामांच्या पायावर उभें राहून दुष्ट कायद्यांचा प्रतिकार करावयाचा, व त्यासाठीं ज्या आपत्ति भोगाव्या लागतील त्या संतोषानें भोगा-वयाच्या. परंतु ह्या सत्याग्रहाच्या द्वारें आम्ही जें स्वराज्य मिळवणार आहोंत तें कशा प्रकारचें, हें बहुतेकांना माहीत नाहीं; आणि सत्याग्रहाचे अधिनायक महात्मा गांधीहि या

संबंधानें विशदपणें खुलासा करीत नाहींत. त्यामुळें पुष्कळ लोक मोहांत पडले आहेत; व ते वेळोवेळीं महात्मा गांधीना खुलासा विचारतात. उदाहरणार्थ, गेल्या सालच्या (१९३४) जुलै महिन्यांत महात्मा गांधी संयुक्त प्रांतांत प्रवास करीत असतां तेथल्या जमीनदार लोकांनी त्यांना असा प्रश्न केला कीं, आपण जें स्वराज्य मिळवूं पहातां त्यांत आमचें काय होणार? त्यावर महात्माजींनी उत्तर दिलें कीं, 'तुम्ही जनतेचे पालक अहांत असें समजून वागलांत, तर स्वराज्यांत तुम्हाला कोणाचें भय बाळगावयाला नको.' त्याचप्रमाणें गांधीजी जेव्हां प्रसंग-वशात् एकाद्या संस्थानिकाचे पाहुणे होतात, तेव्हां 'संस्था-निकांनी रामराज्याचें उदाहरण डोळ्यांसमोर ठेवून वागावें' असा उपदेश करतात.

६७. महात्माजींच्या या उपदेशानें बऱ्या लोकांचें समाधान होत असेल. परंतु आमच्या सारख्या सामान्य माणसाला तो पटत नाहीं. इतिहासाच्या परिशीलनानें आमची समजूत अशी झाली आहे कीं, वर वर्णिलेल्या अपरिग्रहावांचून सत्य आणि अहिंसा कधींहि टिकाव धरून रहाणार नाहीं. राजे किंवा जमी-नदार यांचा आम्ही द्वेष करीत नाहीं. परिस्थितीनें त्यांना उत्पन्न केलें आहे. पण त्यांना आमचे पालक म्हणणें सर्वथैव अयोग्य आहे. त्यांच्या पूर्वजांनी केवळ हिंसात्मक बुद्धिबळानें संपत्ति कमावली; आणि हिंसेच्या बळावरच तिचें रक्षण होत आहे. अशा प्रकारें हिंसेंत मुरलेल्या लोकांना सत्याचे आणि अहिंसेचे पालक बनवणें म्हणजे चोराच्या हातांतच तिजोरीच्या किल्ल्या देण्यासारखें हास्यास्पद होईल!

६८. ख्रिस्ताजवळ एक तरुण संपन्न गृहस्थ आला आणि म्हणाला, 'सद्गुरुजी, मी चिरंजीव होण्यासाठीं कोणत्या चांगल्या

गोष्टींचें आचरण करावें ?' ख्रिस्त म्हणाला, 'मला तूं सद्गुरु कां म्हणतोस ? परमेश्वर तेवढा सत् आहे. तथापि तुला जर जीवनांत प्रवेश करावयाचा असेल, तर परमेश्वराच्या आज्ञा पाळ.' तेव्हां त्या तरुणानें विचारलें, 'त्या कोणत्या ?' ख्रिस्त म्हणाला, 'हत्या करूं नकोस, परदारागमन करूं नकोस, चोरी करूं नकोस, व असत्य बोलूं नकोस. आईबापांचा मान ठेव आणि शेजाऱ्यावर प्रेम कर.' तेव्हां तो तरुण म्हणाला, 'हे सर्व नियम मी लहानपणापासून पाळीत आहें. आतां माझ्यामध्यें उणीव ती कोणती ?' ख्रिस्त म्हणाला, 'तूं निर्दोष होऊं इच्छितोस, तर जा, आणि तुझी संपत्ति विकून जी किंमत येईल ती गरिबांना वांटून दे. त्यामुळें तुला दिव्य निधि मिळेल. आणि मजपाशीं येऊन माझा अनुयायी हो.' तें ऐकून तो तरुण खजील होऊन तेथून चालता झाला. कां कीं, त्याचा परिग्रह फार मोठा होता. तेव्हां ख्रिस्त आपल्या अनुयायांना म्हणाला, 'मी म्हणतों कीं, श्रीमंत माणसाला स्वर्गांत प्रवेश मिळणें कठिण आहे. आणि पुन्हा मी तुम्हाला सांगतों, उंट सुईच्या छिद्रांतून जाऊं शकेल, पण श्रीमंत मनुष्य ईश्वरी राज्यांत प्रवेश करूं शकणार नाहीं.' ( Matthew 19, 16-24 )

६९. महात्माजींनी अशाच प्रकारचा उपदेश आजकालच्या आमच्या राजे लोकांना आणि जमीनदारांना करणें योग्य आहे; आणि तो उपदेश करण्याला ते समर्थ आहेत. "बाबांनो तुमच्या पूर्वजांनी ही संपत्ति हिंसात्मक बुद्धिबळानें मिळवली, व आज तिचें रक्षण हिंसात्मक बळाच्याच आश्रयानें तुम्ही करीत अहां. हिंसात्मक बळ इंग्रजांच्या हातांत एकवटलें आहे; आणि त्यासाठीं इंग्रजांचा आश्रय करणें तुम्हाला भाग पडत आहे. अशी संपत्ति बरोबर घेऊन अहिंसेच्या आणि सत्याच्या साम्रा-

ज्यांत तुम्ही कसे याल? उंट सुईच्या छेदांतून जाईल, पण तुम्हाला अहिंसात्मक साम्राज्यांत प्रवेश करतां येणें शक्य नाहीं. तथापि आजच तुमची संपत्ति विकून टाकून ती गरिबांना वांटून दिली पाहिजे, असा आमचा आग्रह नाहीं. मात्र वेळ येईल तेव्हां अहिंसेचें आणि सत्याचें साम्राज्य स्थापण्यासाठीं सर्व संपत्तीचा त्याग करण्यास तुम्ही एका पायावर उभें असलें पाहिजे.

७०. "आमच्या स्वराज्यांत तुमच्या सारख्या परिग्रही माणसांना प्रवेश मिळाला, तर त्यांत अहिंसा आणि सत्य एक दिवसहि टिकाव धरून रहाणार नाहींत. तुमच्या परिग्रहाच्या रक्षणासाठीं आम्हाला आठहि प्रहर हिंसा करण्याला तयार रहावें लागेल. आणि तेवढ्यानें न भागल्यामुळें श्रमणब्राह्मणांनी जशीं खोटींनाटीं पुराणें रचलीं, तशीं तीं आम्हालाहि रचावीं लागतील; किंवा आजकालच्या अधिकारी वर्गाप्रमाणें सेफगार्डांच्या घटना व राष्ट्रसंघाच्या रचना कराव्या लागतील. ह्मणजे पुन्हा असत्याच्या आणि हिंसेच्या महापंकांत लोळण्याची आमच्यावर पाळी येईल. यासाठीं परिग्रही लोकांना आम्ही आमच्या स्वराज्यांत थारा देऊं इच्छीत नाहीं."

७१. त्यावर आजकालचे आमचे सुसम्पन्न लोक म्हणतील कीं, 'असें आहे तर आम्ही इंग्रजांची कास कां धरूं नये.' "पण गृहस्थहो! इंग्रजांची कास धरून तुमच्या इस्टेटी आणि संस्थानें तुम्ही चिरकाळ बाळगूं शकाल, हा तुमचा निवळ भ्रम आहे. इंग्रजांपेक्षां किती तरी पटीनें झारचें आणि रशियन अमीरउमरावांचें सामर्थ्य जास्त होतें. पण तें गेलें कोठें? जो झार कोट्यावधि लोकांना रणक्षेत्रांत मृत्युमुखीं पाठवूं शकला तो स्वतः बायकोपोरांसकट असहाय होऊन मरण पावला!

आजकाल रशियाचे ते उन्मत्त अमीरउमराव कोठें आहेत? पॅरिस, न्यूयॉर्क वगैरे शहरांत दरवानांची किंवा मोटार हाकण्याचीं कामें करून कसा बसा आपला निर्वाह करीत आहेत! पाश्चात्य भांडवलवाल्यांनी त्यांना एवढा तरी आश्रय दिलेला आहे. पण तुम्हाला तोहि मिळणें शक्य नाहीं. हिन्दुस्थान सोडून पळूण जाण्याची जर तुमच्यावर पाळी आली, तर तुम्ही एशियाटिक म्हणून तुम्हाला अमेरिकेंत प्रवेशच मिळावयाचा नाहीं; आणि युरोपांत प्रवेश मिळाला तरी दरवानाचीं आणि इतर कामें तुम्हाला कोणी देणार नाहीं. कां कीं, युरोपीय कामगारच बेकारीनें ग्रस्त झालेले आहेत. अशा परिस्थितींत तुम्ही इंग्रजांना शरण जाऊन जरी कांहीं काळ आत्मरक्षण करूं शकलां, तरी निर्भय राहूं शकणार नाहीं. आणि सतत भयभीतपणें काळ कंठणें हा तर नुसता नरकवास आहे. यांतून तुम्हाला मोक्ष पाहिजे असेल, तर तुमच्या परिग्रहाची वासना सोडा, व आमच्या बरोबर या. सर्व लोकांच्या सेवेंत जो अप्रतिम आनन्द आहे, त्याचे तुम्ही भागीदार व्हा."[1] हा उपदेश महात्मा गांधींच्या तोंडीं शोभणार नाहीं असें कोण म्हणेल?

---

१ विनयपिटकांतील चुल्लवग्गांत शाक्यांच्या भद्दिय राजाची गोष्ट आहे. इतर पांच शाक्य कुमार व उपाली न्हावी यांच्याबरोबर तो तरुणपणींच भिक्षु होऊन एकांतवासांत रहात असतां, 'अहो सुखं, अहो सुखं' असे उद्गार काढीत असे. ते ऐकून कांहीं भिक्षूंना अशी शंका आली कीं, त्याला आपल्या राज्यसुखाची आठवण होत असावी. भगवंताला ही गोष्ट समजली, आणि त्यानें भद्दियाला बोलावून आणून या प्रकरणीं चौकशी केली. तेव्हां भद्दिय म्हणाला, "भगवन्, मी राजा असतांना माझ्या रक्षणासाठीं राजवाड्यांत आणि राजवाड्याबाहेर,

७२. यावर परिग्रही संपन्न लोक सवाल करतील कीं, 'तुम्ही आमच्या जमिनी आणि संस्थानें जबरदस्तीनें खालसा करणार आहांत काय?' त्याला उत्तर असें:—हें तुमच्यावर अवलंबून राहील. तुमच्या अंतःकरणांत जर जनतेविषयीं कळकळ उत्पन्न झाली, परिग्रहांत पार्श्वाप्रमाणें आणि बुद्धाप्रमाणें तुम्हाला भय वाटूं लागलें, तर तुमच्या इस्टेटी हिरावून घेण्याचें कारणच

---

नगरांत आणि नगराबाहेर, देशांत आणि देशाबाहेर जय्यत तयारी ठेवण्यांत येत असे. असें असतांहि मी भयभीत, उद्विग्न, साशंक व त्रस्त वृत्तीनें रहात होतों. परंतु आतां मी अरण्यांत किंवा एकांतस्थळीं निर्भय, अनुद्विग्न, निःशंक व निस्त्रस्त वृत्तीनें संचार करीत असतों; आणि त्यामुळेंच माझ्या तोंडून 'अहो सुखं, अहो सुखं' हे उद्गार निघतात."

हा झाला राज्यसुखत्यागाचा आनंद. आणखी शांतिदेवाचार्य आपल्या बोधिचर्यावतारांत म्हणतात—

सर्वत्यागश्च निर्वाणं निर्वाणार्थि च मे मनः।
त्यक्तव्यं चेन्मया सर्वं वरं सत्त्वेषु दीयताम्॥

(सर्वस्वाचा त्याग हेंच निर्वाण, आणि त्याची मी इच्छा धरतों. जर सर्वस्व मला सोडावयाचें आहे, तर तें प्राणिमात्रांच्या हितासाठीं द्यावें हें बरें.)

मुच्यमानेषु सत्त्वेषु ये ते प्रामोद्यसागराः।
तैरेव ननु पर्याप्तं मोक्षेणारसिकेन किम्॥

(प्राणिमात्र दुःखांतून मोकळे झाले असतां जे आनंदसागर मिळतील, तेवढ्यानें तृप्ति होणार नाहीं काय? अरसिक मोक्ष कां हवा?)

मनुष्यजातीसाठीं आपल्या लहान मोठ्या इस्टेटींचा त्याग केल्यानें आमचे धनिक लोक अशा अप्रतिम आनंदाचे वांटेकरी होणार नाहींत काय?

रहाणार नाहीं. जपानांत पुष्कळसे मांडलिक राजे होते, व ते आपापल्या अधिकारासाठीं आपसांत भांडत होते. पण जेव्हां त्यांच्यामध्यें राष्ट्रप्रेमाची जोत जागृत झाली, तेव्हां त्यांनी मिक्याडोच्या द्वारें आपले सर्व अधिकार स्वदेशार्पण केले. त्यांच्यापेक्षां तुम्ही हीन अहांत अशी आमची समजूत नाहीं. ज्या देशांत पार्श्व व बुद्ध यांसारखे त्यागी तत्त्वज्ञ आणि अशोकासारखे प्राणिमात्रांच्या सेवेंत दक्ष रहाणारे राजे जन्मले, त्या देशांतले तुम्ही राजेरजवाडे व जमीनदार लोक अशा थोर विभूतींचें अनुकरण करण्यास असमर्थ अहांत, असें आम्हास वाटत नाहीं. केवळ स्वदेशासाठींच नव्हे, तर सर्व मानवजातीच्या उन्नतीसाठीं तुमच्या या यःकश्चित् परिग्रहाचा त्याग करण्यास तुम्ही उत्कंठित व्हावयास पाहिजे. जर हा त्याग तुम्ही अमलांत आणून दाखविलात, तर तुमची कीर्ति जगाच्या इतिहासाच्या अंतापर्यंत अजरामर होऊन राहील. पण तुम्ही आपलपोटे होऊन आपल्या इस्टेटी संभाळून बसलांत, तर तुमच्याबद्दल आदर कोण बाळगील ? तुम्ही ही हीन वृत्ति सोडावी, व महात्मा गांधी म्हणतात त्याप्रमाणें हिंदुस्थानचे खरे पालक किंवा मार्गदर्शक व्हावें, यासाठीं आम्ही तुम्हाला जागृत करण्याचा शक्य तेवढा प्रयत्न करूं, व त्याला यश येईल अशी आशा धरून चालूं.

७३. जसा राजेरजवाड्यांचा, जमीनदारांचा व इतर धनिकांचा संपत्तिपरिग्रह, तसाच किंवा त्याहूनहि जास्त सामान्य लोकांचा सांप्रदायिकतापरिग्रह आमच्या देशाला जाचक होत आहे. सांप्रदायिकता अफीण आहे, हें जें समाजवाद्यांचें म्हणणें, त्याची आम्हास चांगलीच प्रतीति येत आहे. परंतु सांप्रदायिकतेचें व्यसन कमी करण्याकरतां राष्ट्रीयतेचें नवें व्यसन लावून

घेणें योग्य नाहीं. सांप्रदायिकता ही जर अफीण, तर राष्ट्रीयता ही दारू आहे, आणि तिचे दुष्परिणाम पाश्चात्य देशांत व जपानांत कसे घडून येत आहेत, हें आम्हीं पहातच आहोंत. तेव्हां धनिकांना संपत्तिपरिग्रहापासून, सामान्य जनतेला सांप्रदायिकतापरिग्रहापासून व अनुकरणशाली शिक्षित वर्गाला राष्ट्रीयतापरिग्रहापासून सोडविणें हें आमच्या पुढाऱ्यांचें प्रमुख कर्तव्य आहे. निदान ह्या सर्व परिग्रहांतून ते स्वतः तरी मुक्त असले पाहिजेत. स्वतःच परिग्रहांत रुतले गेले असतां त्यांतून ते इतरांचा उद्धार करतील, हें संभवत नाहीं. सत्याग्रह सिद्धीस जाण्यास ह्या परिग्रहांचें व त्यांपासून मुक्त होण्याच्या साधनांचें ज्ञान आणि तदनुरूप आचरण अत्यावश्यक आहे.

# प्रज्ञा आणि अहिंसा

७४. पशुपक्ष्यादिकांमध्यें एक प्रकारचें ज्ञान असतें. पण त्याला प्रज्ञा म्हणतां येत नाहीं. पूर्वानुभवानें ज्या ज्ञानाचा विकास होतो त्याला प्रज्ञा म्हणतात. ती फक्त मनुष्यजातींतच आढळते. हत्ती वगैरे पशु पांच हजार वर्षांपूर्वी कळप करून रहात असत, तसे ते आजलाहि रहातात. निरनिराळ्या जातीचे पक्षी जशीं आपलीं घरटीं पांच हजार वर्षांपूर्वी बांधीत, तशीं तीं आजलाहि बांधतात. म्हणजे ह्या पशुपक्ष्यांच्या ज्ञानाची त्यांच्या पूर्वानुभवानें अभिवृद्धि होत नाहीं. पण माणसाचें असें नाहीं. त्याला आपल्या पूर्वानुभवाचा अत्यन्त उपयोग होतो. माणसाजवळ आपल्या संरक्षणासाठीं शिंगें, नखें इत्यादिक साधनें नाहींत. तरी केवळ ह्या प्रज्ञेच्या बळावर माणूस निरनिराळीं शस्त्रें पैदा करून आपलें संरक्षण करण्यास समर्थ

होतो. प्रज्ञेचा विकास होण्यास जशी पूर्वानुभवाची, तशी सामाजिक घटनेचीहि आवश्यकता आहे. एकट्याच मनुष्याच्या अनुभवानें ज्ञानाचा विकास होऊं शकत नाहीं. त्याच्या अनुभवाचा उपयोग समकालीन किंवा त्याच्या पश्चात् येणारे लोक करतात, व त्याच्या योगें मनुष्यसमाजाच्या प्रज्ञेचा सतत विकास होतो.

७५. परंतु प्रज्ञेच्या मानानें जर अहिंसेचा विकास झाला नाहीं, तर तिजपासून हवा तितका फायदा होत नसतो. समजा, एका टोळीला नवीन शस्त्रांचा शोध लागला, व ते त्याच्या योगें शिकार वगैरे करून आपला निर्वाह करूं लागले, पण त्यांच्या अहिंसेचा अर्थात् दयेचा त्या मानानें विकास झाला नाहीं, तर ते जें वर्तन पशूंशीं, तेंच इतर टोळ्यांशीं करतात. म्हणजे इतर दुर्बळ टोळ्या हातीं लागल्या, तर त्यांना ते मारून टाकतात. आणि कांहीं टोळ्यांतील लोक तर आपल्या शत्रूंचें मांस देखील खातात ! तात्पर्य, प्रज्ञा मनुष्यसमाजाच्या उन्नतीला कारणीभूत अतएव तारक होते खरी, पण दयेच्या जोडीनें ती चालूं लागली नाहीं, तर मारकहि होते.

७६. हा प्रकार आधुनिक मनुष्यसमाजांतहि दिसून येत आहे. आस्ट्रेलियामध्यें आणि अमेरिकेमध्यें गोऱ्या लोकांनी जाऊन तेथील मूळ रहिवाशांचा जवळ जवळ निःपात करून टाकला आहे. आफ्रिकेंतील निग्रोंचा त्यांनी संहार केला नाहीं, तरी त्यांच्यावर फार जुलुम केले आहेत. त्यांनी लाखों निग्रोंना पकडून अमेरिकेंत नेऊन विकल्याचा उल्लेख आम्ही वर केलाच आहे.[1] हिन्दुस्थानांत त्यांना इतका कहर करतां आला नाहीं,

---

१ वि० ५।५४.

तरी सम्पत्तिशोषणाच्या रूपानें त्यांनी येथेंहि पुष्कळ अत्याचार केले आहेत. आणि हें सगळें कां? तर आपल्या प्रज्ञेच्या योगानें ते पुढें सरसावले, पण त्यांची दया आपल्या देशापुरती-च राहिली. या दोन्ही गुणांमध्यें जें समत्व पाहिजे होतें, तें उत्पन्न करतां न आल्यामुळें त्यांच्याकडून हे अत्याचार घडले, व सध्या घडत आहेत.

७७. सामाजिक विकासाचें उत्कृष्ट ज्ञान असलेला तत्त्ववेत्ता कार्ल मार्क्ससारखा दुसरा क्वचितच झाला असेल. परन्तु त्याला देखील युरोपियनांची संकुचित वृत्ति भोंवली. सगळया जगांतील पीडितांच्या संघटनेनें पीडकांना दूर सारून एक अत्यन्त सुखावह सामाजिक संघटना तयार करतां येईल, असें त्यानें शास्त्रीय पद्धतीनें सिद्ध करून दाखविलें. परन्तु ह्या कार्यांत अहिंसेचा उपयोग करतां येईल, असें त्यास मुळींच वाटलें नाहीं. सर्व जगांतील पीडित लोकांनी एक होऊन पीडकांचा संहार केला पाहिजे, असें त्याचें म्हणणें होतें. आणि त्यास अनुसरूनच रशियन क्रान्ति घडून आली आहे.

७८. सगळे पीडित किंवा मजूर जर एकवटले, तर पीडकांना मारण्याची जरूरच रहाणार नाहीं. परंतु मार्क्स ज्या संस्कृतींत जन्मला तिची परंपराच अशी आहे कीं, कोणी तरी विरोधी असल्याशिवाय तिला चैनच पडत नाहीं. पाश्चात्य संस्कृतीचे आद्य प्रवर्तक ग्रीक. त्यांची सगळी संस्कृति आपल्या शहरापुरती होती. अर्थात् इतर शहरांतील लोकांशीं त्यांचा पूर्ण विरोध होता. आधुनिक युरोपांत त्या संस्कृतीचें पर्यवसान राष्ट्रीयत्वा-मध्यें झालें. आपल्या राष्ट्रासाठीं कोणतेंहि कुकृत्य करणें योग्य आहे, अशी युरोपियन राष्ट्रांतील लोकांची समजूत. ग्रीक लोकांना इतर शहरें जशीं विरोधी वाटत, तशीं ह्या राष्ट्रांना

इतर राष्ट्रें विरोधी वाटतात; व अशा चढाओढीशिवाय संस्कृतीची उन्नति होणार नाहीं, असें त्यांतील पुढारी लोक प्रतिपादन करतात. याच्यावर कार्ल मार्क्सनें जो तोडगा काढला तो हा कीं, सर्व मजूर वर्गाला एकवटून त्याला भांडवलवाल्यांवर घालावें. म्हणजे हा जो राष्ट्रां-राष्ट्रांमध्यें विरोध आहे तो भांडवलवाले आणि मजूर यांच्यावर नेऊन टाकावा. एकदां भांडवलशाही नष्ट झाली कीं, मग हा विरोध आपोआपच लय पावणार. कांट्यानें कांटा काढण्यासारखी ही युक्ति आहे.

७९, परंतु ह्या युक्तींत एक भय आहे, तें हें कीं, कांट्यांनें कांटा काढीत असतांना पहिला कांटा निघण्यापूर्वी दुसरा कांटा मोडला आणि त्याचें टोंक आंत राहून गेलें, तर पहिल्यापेक्षां जास्ती दुःख व्हावयाचें. ही स्थिति आज इटलींत आणि जर्मनींत उत्पन्न झाली आहे. राष्ट्रीयत्वाचा कांटा काढण्यासाठीं समाज-वादाच्या कांट्यानें प्रयत्न केला. पण पहिला कांटा न निघतां हा दुसरा कांटाहि त्यांतच जाऊन सामील झाला.

८०. सशस्त्र क्रान्ति करून भांडवलवाल्यांना मारा, असें म्हणण्यापेक्षां 'भांडवलवाल्यांसाठीं शस्त्र ग्रहण करूं नका,' हा टॉलस्टॉयचा उपदेश अधिक हितावह होता. रशियन क्रान्तीला यश येण्यास कांहीं अंशीं हाच उपदेश कारण झाला. झार लोकांना जबरदस्तीनें समरांगणांत पाठवूं शकला. पण जेव्हां लोक लढूं इच्छीनात, तेव्हां झारशाही आपोआपच कोलमडून पडली. महायुद्धारंभींच जर सर्व पाश्चात्य राष्ट्रांतील मजुरांनी अशा प्रकारें सत्याग्रह केला असता, तर तें युद्ध एका आठवड्यांतच आटपलें असतें; व भांडवलवाल्या सत्ता-धिकाऱ्यांचा वर्ग झारशाहीप्रमाणें आपोआपच ढांसळला असता. कार्ल मार्क्सच्या प्रश्नेला महात्मा गांधींच्या अहिंसेची जोड

मिळाली असती, तर पाश्चात्य राष्ट्रें महायुद्धाच्या घोर संकटांत सांपडलींच नसतीं.

८१. आमच्या इकडे पार्श्व आणि बुद्ध यांनी अहिंसेचा प्रवाह बहुजनहिताकडे वळविला. परंतु राजकीय क्षेत्रांत त्याचा प्रवेश न झाल्यामुळें तो सांप्रदायिकतेच्या डबक्यांमध्यें कोंडला गेला, व त्याच्या सभोंयतीं पुराणांचें जंगल माजलें. त्या प्रवाहाला गति देऊन राजकीय क्षेत्राकडे वळविण्याचा महात्मा गांधींचा प्रयत्न खरोखरच अभिनंदनीय आहे. परंतु दिशाभूल झाल्यामुळें तो मध्येंच खोळंबला. हें एका अर्थी बरें झालें. कारण तो तसाच पुढें जाता, तर राष्ट्रीयतेच्या गर्तेंत पडून अपायकारक झाला असता. अहिंसेला समाजवाद्यांच्या प्रज्ञेची जोड मिळाली, तरच हा तिचा प्रवाह योग्य दिशेकडे वळेल, व मानवजातीच्या कल्याणाला कारणीभूत होईल.

---

# आधारभूत ग्रन्थांचें स्पष्टीकरण

ऋ० = ऋग्वेद.

महाभारत, औंध. श्रीपाद दामोदर सातवळेकर यांनी केलेल्या हिन्दी भाषान्तरासहित. शके १८४५--१८५४.

महाभारत, कुंभकोण. संस्कर्ते टी. आर्. कृष्णाचार्य व टी. आर्. व्यासाचार्य. निर्णयसागर प्रेस. सन १९०६—१९०९.

बृहत्संहिता, वराहमिहिरकृत. लक्ष्मीव्यंकटेश्वर प्रेस. मुंबई शके १८४८.

श्रीमञ्जुश्रीमूलकल्प, याचा एक भाग. त्याचें इंग्रजी नांव—

Imperial History of India, by K. P. Jayaswal. Lahore 1934.

श्रीकाललोकप्रकाश, विभाग ३—४. श्रीजैनधर्मप्रसारक सभा, भावनगर सन १९३४.

तत्त्वसंग्रह. बडोदें सन १९२६

---

तिपिटक, सयामराष्ट्रीय संस्करण. बौद्धवर्ष २४७०.

जातक-अट्ठकथा. Edited by V. Fausboll. London 1877-1896.

---

कबीरसाहबका बीजक. व्यंकटेश्वर प्रेस. शके १८२६.

तुकारामाची गाथा. निर्णयसागर प्रेस. सन १९१७.

---

A History of Sumer and Akkad, by L. W. King. London 1916.

A History of Babylon, by L. W. King. London 1915.

Myths of Babylonia and Assyria, by Donald A. Mackenzie. London.

Buddhist Records of the Western World (Si-Yu-Ki) Transtaled by Samuel Beal. London 1906.

Alberuni's India. Translated by E. C. Sachau. London 1910.

The Early History of India, by Vincent A. Smith. Oxford 1924.

Political History of Ancient India, by Hemchandra Raychaudhuri. Calcutta 1927.

Ancient India, by Krishnaswami Aiyangar. London 1911

Mediaeval India, by S. Lane-Poole. London 1926.

Vaishnavism Shaivism And Minor Religious Systems, by Sir R. G. Bhandarkar. Poona 1928.

A Peep into the Early History of India, by Sir R. G. Bhandarkar. Taraporevala Sons. Bombay 1930.

The Outline of History, by H. G. Wells. London.

टीपः—यांशिवाय ज्या ग्रन्थांचे आधार घेतले आहेत, त्यांच्या स्पष्टीकरणाची विशेष आवश्यकता वाटत नाहीं.

वि० म्हणजे ह्या पुस्तकाचा विभाग. उदाहरणार्थ पृष्ठ ३६ वरील टिपेंत वि० ११४८—५४ म्हणजे विभाग १, कलम ४८ पासून ५४ पर्यन्त.

# शुद्धिपत्रक

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ११ | १ | सुमेरियांतीक | सुमेरियांतील |
| ,, | १६ | पुरव्याचा | पुरूरव्याचा |
| १७ | २४ | तोंडं | तोंड |
| २९ | ४ | अल्यामुळें | असल्यामुळें |
| ,, | १६ | प्रयत्न | प्रयत्न |
| ३४ | १४ | स्वीरली | स्वीकारली |
| १५६ | १० | ‘ऐड्डक’ | ‘एड्डक’ |
| १६० | २३ | माशीदी | मशीदी |
| २०४ | टीप | Forward | Foreword |
| २१० | १४ | मेत्रीचित्तानें | मैत्रीचित्तानें |
| २१५ | १५ | जणतोस | जाणतोस |
| २७५ | १७ | अवध्या | अवध्या |